# खून चढला !

अपराध सत्यकथा संग्रह

लेखक

भ. म. भादुले, एम्. ए.
पोलीस इन्स्पेक्टर, नागपूर



प्रकाशक

शशीकांत प्रकाशन
गांधीबाग, नागपूर-२

# खून चढला !

अपराध सत्यकथा संग्रह

लेखक

भ. म. भादुले, एम्. ए.

पोलीस इन्स्पेक्टर, नागपूर

प्रकाशक

शशिकांत प्रकाशन

गांधीबाग, नागपूर-२

**प्रकाशक :**
शशिकांत भगवान भादुले
शशिकांत प्रकाशन
गांधीबाग, नागपूर–२



**मुखपृष्ठ :**
मदन बक्षी
राज स्टुडिओ, सीतामंदिर
नागपूर

**मुखपृष्ठ छपाई**
पोरवाल ऑफसेट प्रिंटिंग
कामठी



**प्रथमावृत्ती**
विजयादशमी १९०३
दि. ८–१०–१९८१

**मूल्य**
एकवीस रुपये

**मुद्रक :**
म. पां. बनहट्टी
नारायण मुद्रणालय
धनतोली, नागपूर–१२

# "खून चढला"चे संबंधात थोडेसे

खून, खूनाचा प्रयत्न, दरोडा, घरफोडी, चोरी, असे संगीन गुन्हे; प्रशांत जलाशयात दगड टाकल्यावर अनेक तरंग उठतात; त्याप्रमाणे नागरिकांच्या शांततामय जीवनात खळबळ माजवून सोडतात. अपराध्याशी प्रभावीपणे तोंड देता यावे; म्हणून त्यांच्या वेगळ्या जगताचा परिचय व्हायला हवा.

सामान्य जनताजनार्दनास अपराध्यांचं वेगळं जग असवं याची जाणीवही झालेली नाही.

यातील घटना, प्रसंग रेखाटताना केवळ कल्पनाविलासाचा आधार घेतलेला नसला; तरी काही ठिकाणी पात्रांची नावं वेगळी दिली आहेत. पोलिस तपासात जे आढळून आलं, जे दुसऱ्याकडून माहीत पडलं, ते रेखाटलं आहे. कुणाच्या नावात साम्य आढळून आल्यास, गैरसमज होऊ नये. गुन्हेगारांचीच ती नावं आहेत.

अपराधीवृत्ती असलेल्यांचा हृदयपालट सहसा होत नाही; म्हणून पोलिसांना सहकार्य देऊन गुन्हेगारांचं पारिपत्य करणे, ही आजची गरज आहे.

पोलिसखात्यानं चालविलेल्या लोकप्रिय "दक्षता" मासिकानं लेखणी हातात घ्यायला उत्तेजन दिलं. हा कथासंग्रह मी सादर करू शकलो, त्याचं श्रेय पोलिस महानिरीक्षक श्री. एस्. के. चतुर्वेदी, महाराष्ट्र राज्य व 'दक्षता' मासिक यांना द्यावं लागेल. पोलिस महानिरीक्षकांचे कार्यालयातून मंजुरी आल्याने वाचकांचे हाती "खून चढला" हा कथा संग्रह सादर करू शकलो. संगीन अपराध प्रकाशात आणताना पोलिस चातुर्याप्रमाणे जनतेनं दिलेल्या अमोल सहाय्याचा देखील उल्लेख आलेला आहे.

हे पुस्तक प्रकाशित करण्यात बालविद्या प्रकाशनाचे श्री. अनंतराव हिवसे व नारायण मुद्रणालयाचे श्री. मधुसूदन बनहट्टी यांनी जे अनमोल साहाय्य केले त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

भगवंतराव भाडुले
पोलीस इन्स्पेक्टर

# कथानुक्रम

एक

# खून चढला !

खून केल्यावर खुनी माणसाला कैफ चढतो, नशा येते. त्यालाच खून चढला असे म्हणतात. खून केल्यावर काही काळ तरी तो एका वेगळ्या वातावरणात वावरत असतो. त्याला अडविण्याची हिम्मत होत नाही. एक खून केला तरी फाशी होणार अन् दहा खून केले तरी फाशीच होणार. कोणी आडवा आला तर त्यालाही यमसदनाला पाठविण्यास तो मागेपुढे पहात नाही. खून चढल्याचं पहाणं पोलिसांच्या नशिबी सहसा येत नाही. पाल पाहिल्यावर विंचू जशी नांगी टाकतो तसं पोलिसांना पाहिलं की खुनी माणसाचा कैफ कोठल्या कोठे मावळून जातो. याचा प्रत्यय मला सन १९६८ साली मी पातूर पोलीस स्टेशनला फौजदार म्हणून काम करीत असताना आला.

पातूर हे गांव अकोला जिल्ह्यात आहे. पातूर ते बाळापूर जाण्याऱ्या रस्त्यावर बाभूळगांव लागते. बाभूळगावहून आलेगांवकडे जाणारा फाटा फुटतो. बाळापूरकडे व आलेगांवकडे जाण्याऱ्या येण्याऱ्या एस्. टी. बसेस बाभूळगांववरून जातात. या बसेस थांबण्यासाठी वेगळं एस्. टीं. स्टॅण्ड नाही. रस्त्याच्याकडेला तीन, चार झोपडीवजा हॉटेल्स् आहेत. त्यातल्यात्यात शेषरावचं हॉटेल बऱ्यापैकी आहे. या हॉटेलसमोर एस्. टी/ पॅसेंजरला बसण्याची सोय शेषरावने केली होती. एका दगडात दोन पक्षी मारले होते. एकतर स्टॅण्डवर आलेल्या पॅसेंजरची बसण्याची सोय होत होती व त्यांना चहापाणी दिल्यानं

त्याच्या हॉटेलची विक्री होत होती. एस्. टी. बसेस येण्याची वेळ झाली की शेषरावचं हॉटेल माणसांनी फुलून जात असे. एस्. टी. चे टाईम-टेबल लावण्याची कुणाला गरज वाटत नव्हती. 'काय शेषराव ! बाळापूरची एस्. टी. केव्हा येणार ?' कुणी असा प्रश्न विचारला की शेषराव एस्. टी. च्या टाईमिंगचा पाढा म्हणून दाखवायचा, 'बाळा-पुरचा सकाळचा ९ चा टाईम गेला, आता बाराचा टाईम येणार हाय'. असं तो म्हणायचा. एस्. टी. चं वेळापत्रक तोंडपाठ म्हणून दाखवा-यचा. एस्. टी. च्या ड्रायव्हर, कंडक्टरला फुकट चहा भेटायचा. एस्. टी. गाडी नेमकी शेषरावच्या हॉटेलसमोर थांबायची. आलेगांवकडे जाणारे पॅसिंजर बाभूळगावलाच खास तयार केलेल्या शेषरावच्या हॉटेल-समोरील बाकड्यावर विराजमान होत. आलेगावकडं जाणारी एस्. टी. येईपर्यंत त्यांच चहापाणी होई. गेल्या दहा वर्षात बाभुळगावला खून म्हणून काय असतं हे मा ीत नव्हतं.

दुपारचे तीन वाजण्याची वेळ होती. बाळापूर, आलेगांवकडे जाणाऱ्या पॅसेंजरनी शेषरावचं हॉटेल नेहमीप्रमाणं फुलून गेलं होतं. हॉटेलसमोरच्या खास बाकड्यावर माणसं बसली होती. पुंजाजी कुणबी चुपचाप येऊन हॉटेलसमोरच्या बेंचावर बसले. त्यांची नजर कुणाला तरी शोधीत होती. पुंजाजीला पाहून शेषराव म्हणाले,

'काय पुंजा आबा ! आज इकडं कसं येनं केलं ?' पुंजाजीला पाहून शेषरावला नवल वाटलं. कधी न येणारा पुंजा आबा हॉटेल समोर येऊन कां बसला आहे ? परगांवी जाणार असता तर सामान बरोबर दिसलं असतं. पुंजाजीने उत्तर दिलं, 'पावनं यायच्यात म्हनून वाट पहात बसलोय. शेषरावनं विचार केला, कुणी पाहुणे येणार असतील पातूरहून म्हणून पुंजा आबा बसला असेल.

पुंजाजी क्षणाक्षणाला अस्वस्थ होत होता. मधूकर पाटलाची बैठक शेषरावच्या हॉटेलात नेहमीची असायची. घरी शेतीवाडीत राबणारी

माणसं असल्यानं गावात सोडलेल्या सांडासारखा तो फिरत राहायचा. त्याचे सोबती बरोबर असायचे. शेषरावच्या हॉटेलात चहापाणी करून एस्. टी. च्या पॅसेंजरचं अवलोकन करायचं, तशात एकादं पाखरं दिसलं तर पहायचा खडा टाकून. असा त्याचा वेळ जात असे. एस्. टी. बस यायच्या टाईमाला मधूकर पाटील शेषरावच्या हॉटेलात येतो हे सर्वांना माहीत होतं. बदला घेण्याची भडक्ती आग घेऊन पुंजाजी हॉटेलसमोर आला व मधुकरची प्रतीक्षा करीत बसला होता. मधूकर अजून आला नव्हता. तो हॉटेलच्या समोरील एका वाकावर कोपऱ्यात चूपचाप बसून राहिला. अन्यायाचा सूड घेण्याची आग क्षणाक्षणाला वाढत असण्यानं तो मधूकर ज्या वाटेनं यायचा तिकडे पहात बसला होता. बकरीचं मांस तोडण्याचा धारदार सुरा त्यानं धोतराच्या आंत कमरेवर खोचून ठेवला होता. मधूनच त्याचा हात कमरेकडे जात होता.

त्याला जास्त वेळ प्रतिक्षा करावी लागली नाही. मधू पाटील हसत खिदळत, त्याच्या दोन मित्रासोबत तेथे आला. ते तिघेही शेषरावच्या हॉटेलात गेले. झोपडीवजा हॉटेलच्या ओसरीत टेबल व लाकडी बेंच होते. आत जाताच त्याचे दोन्ही मित्र बेंचावर बसले. मधुकरनं टेबलावर ठेवलेला पाण्याचा ग्लास हातात घेतला अन् हॉटेलच्या बाहेर चूळ भरावी म्हणून बाहेर जाऊ लागला. त्याला काय माहीत की प्रत्यक्ष काळ पुंजाजीच्या रुपानं त्याची वाट पहात बसला आहे. स्टॅण्डवरील बरेच पॅसेंजर गाडीची वाट पहात बसलेले होते. त्या गर्दीमुळं मधुकरचं लक्ष बेंचावरील कोपऱ्यावर बसलेल्या पुंजाजीकडे गेले नाही. पुंजाजीचे लक्ष मधुकरच्या हालचालीकडे होतं. ग्लास हाती घेऊन मधूकर चूळ भरण्याकरिता ओसरी ओलांडून प्रवेशद्वाराजवळ आला. याच संधीची वाट पुंजाजी पहात होता. नऊ इंच धारदार पातं असलेल्या सुऱ्याला हात घालून त्याने कमरेचा सुरा हातात घेतला. विजेच्या चपळाईने मधुकरच्या समोर जाऊन त्याच्या डाव्या छातीवर आपलं बळ एकवटून त्याने सपकन् वार केला. छातीच्या डाव्या बाजूच्या बरगड्यातून सुऱ्याचं पातं आरपार जाऊन काळजाला

भिडलं. पुंजाजीनं सुरा बाहेर ओढून काढला, तेव्हां रक्ताचं कारंज त्याच्या अंगावर उडालं. काळजाला छिद्र पडल्याने मधुकरला ओरडता देखील आलं नाही. त्याच्या उजव्या हातातला पाण्यानं भरलेला ग्लास खाली पडून फुटला, तेव्हा त्याचा खळूकन् आवाज झाला. छातीवर झालेल्या जखमेतून भळभळ रक्त वाहत होतं. पुंजाजीच्या एकाच फटक्यानं काम बजावलं होतं. एक पाऊल मागं सरकून मधूकर जमिनींवर पडला. त्याचा धप्कन् आवाज झाला. त्याचवेळी मधू पाटलाचं प्राणरूपी कबूतर फडफड करीत उडून गेलं. तरीपण पुंजाजीची प्रतिशोधाची भडकती आग शमली नव्हती. त्याच्या डोळ्यावर कैफ चढला होता. खून केल्यानंतर नशा चढून गेली होती. मधुकरच्या रक्तानं भरलेला सूरा त्याच्या उजव्या हातात होता. उजवा हात वर करून तो मोठ्यानं ओरडला, "भागो यहाँसे नहीं तो मार डालूंगा !"

मधूकर सोबत आलेले त्याचे टारगट मित्र मागच्या दारानं पळून गेले. माणसानं फुलून गेलेलं एस्. टी. स्टॅण्ड अचानकपणे घडलेल्या या प्रकारानं ढवळून निघालं. हॉटेलातली गिऱ्हाइकं चहा पिता पिता चहाचा कप टेबलावर ठेवून काय घडतं आहे हे पहात होती. हॉटेलसमोरच्या बेंचावरून हॉटेलात काय चाललं हे स्पष्ट दिसत होतं. सर्वच लोक हवालदील होऊन पहात होते. 'भागो यहाँसे नहीं तो मार डालूंगा' असा त्याचा आवाज कानी पडताच प्रत्येकजण भानावर आला. प्रत्येकजण उठून पळू लागला. हॉटेल समोरची माणसं विखुरली गेल्यावर पुंजाजीनं मधुकरच्या प्रेताकडं तुच्छतेनं पाहिलं. प्रेताला लाथेनं ठोकरून दिलं त्यानं. प्रेताचे पाय धरून फरकटत प्रेत हॉटेलच्या ओसरीवर आणलं. हॉटेलात काय चाललंय हे दूरून काहीजण पाहत होते. प्रेताच्या छातीवर बसून डाव्या हातानं पुंजाजीनं मधुकरच्या प्रेताचे केस पकडले. उजव्या हातातील सुऱ्यानं बकऱ्याचा गळा कापावा तसा त्या प्रेताचा गळा कापला ! सूड घेण्याची भडकलेली आग शांत होईर्यंपत त्यानं मधू पाटलाच्या प्रेताच्या गळ्यावर सुरा चालवला. बाभुळगावात खून झाल्याची वार्ता वणव्यासारखी पसरली. पुंजाजीनं मधू पाटलाचा खून

केला या वार्तेवर त्यांचा भरवसा बसत नव्हता. सर्व गांव त्याला ओळखत होतं. सहा एकर जिराईतावर गुजराण करीत होता तो. कपडेही साधेच असायचे. गांधी टोपी, एक सदरा व धोतर हा त्याचा वेष असे. वर मान करून चालताना तो कधी दिसला नाही. किरकोळ शरीरयष्टी असलेला पुंजाजी एकलकोंडया स्वभावाचा होता. कामाव्यतिरिक्त तो कोणाशी गप्पागोष्टी करीत नव्हता. मुंगीला मार म्हटलं तर तो मारणं शक्य नव्हतं. शेतीवर काम करावं, मोजुलमरीही करावी अन् पोटाची खळगी भरावी असं त्याचं जीवन होतं.

हरणानं वाघाची, सापानं मुंगसाची, सश्यानं लांडग्याची, विंचवानं पालीची शिकार करणं जितकं अशक्य तितकंच पुंजाजीनं, गावातल्या टोळभैरवाचा म्होरक्या मधूकर पाटील याचा खून करणं अशक्य आहे असं गावकऱ्यांना वाटत होतं. खुनाची वार्ता ऐकून गावकरी शेषरावच्या हॉटेलच्या बाजूस समोरच असलेल्या ग्रामपंचायतीसमोर जमू लागले.

पुंजाजीने मधुकरच्या प्रेताचा गळा कापल्यानंतर रक्त ठिपकत असलेला सुरा हातात घेऊन तो हॉटेलच्या बाहेर पडला. हॉटेलच्या जवळच पानठेला होता. पानठेल्याच्या आजूबाजूस काही माणसं काय होतंय हे पहात बसले होते, 'भाग जाव यहाँसे' अशी आरोळी पुंजाजीनं ठोकली. खून चढलेला खुनी जिवावर उदार झालेला असतो. त्याला जिवाची भीती नसते. ज्यांच्याशी वैर असेल त्याला ठार मारण्यास तो मागेपुढे पहात नाही त्याच्या अंगात राक्षस संचारला होता. पानलावाल्याची त्रेधा उडाली. उठून पळत जाताना पानठेल्यावर अडकवलेल्या गॅसबत्तीस धक्का लागून ती खाली पडून फुटली. पानाची करंडी उलटून पानं विखूरली गेली. ग्रामपंचायतीसमोर जमलेले गावकरी रस्ता दिसेल तिकडे पळू लागले. बाभूळगावातील लोक आपापल्या घराना आतून कडया लावून बसले.

वाळभुगांवच्या पोलीस पाटलानं कसातरी थरथरत्या हातानं रिपोर्ट तयार करून जानू कोतवालाकडं दिला व ते म्हणाले, 'जानू, सायकलीनं पातूर ठान्यात जा, सायबाला म्हनावं तयारीनं या पुंजाजीला खून चढलाय आनखीन खून करील तो. रिपोर्ट देऊन त्यानला घेऊन ये सोबत बंदुकधारी शिपाई घ्या म्हनावं.

जानू म्हणाला, 'जी हो' सायबाला घेऊन गेतो मी. पाणवठयाच्या रस्त्यानं जातो मी स्टॅण्डवर धूम चालवलीय पुंजा आवानं, असं म्हणून त्यानं सायकलीवर टांग टाकली व निघून गेला.

सायंकाळचे ४।। वाजले असतील. पातूर पोलीस स्टेशनच्या प्रशस्त प्रांगणात खुर्ची टाकून मी बसलो होतो. कडुनिंबाचे मोठाले वृक्ष असल्याने वातावरण हवेशीर होतं. वाभूळगांवचा जानू कोतवाल सायकलीवरून आला. पोलीस स्टेशनच्या फाटकातून आत आल्यावर स्टॅण्डवर सायकल लावली. हातात कागद घेऊन मी बसलो होतो त्या दिशेनं तो आला. त्यानं गुन्हा घडल्याची खबर आणली असावी हे मी ताडलं. तो समोर येताच मी त्यास विचारलं 'काय रे जानू' ? कसला रिपोर्ट आणला आहेस'

'साहेब, खुनाचा रिपोर्ट आणलाय. मधू पाटलाचा खून झालाय. शेषरावच्या हॉटेलात त्याची लाश पडलीया. पोलीस पाटलाने रिपोर्ट दिलाय' असं म्हणून त्यानं पोलीस पाटलाचा रिपोर्ट माझ्या हाती दिला. खुनाचा रिपोर्ट आल्याचं पाहून मीं स्वत:ला सावरलं. काळजाची धडधड वाढली.

पोलीस पाटलांनं लिहिलं होतं–मोटार स्टॅण्डवरील शेषरावच्या हॉटेलात मधूकर पाटलाचा खून पुंजाजीनं केला आहे. त्याची लाश हॉटेलात पडलेली आहे. पुंजाजीला खून चढलाय. तो हातात सुरा घेऊन गावात फिरत आहे. पानपट्टीच्या दुकांनावर सुरा घेऊन गेला

होता. हॉटेलवाले व पानपट्टीवाले पळून गेले आहेत. तो आणखीन खून करण्याची शक्यता आहे. मधू पाटलाच्या टोळीतील लोकांचा तो तपास करीत असावा. तरी आपण घटनास्थळावर येऊन त्याचा बंदोवस्त करावा.

पोलीस ठाण्यातील कर्मचाऱ्यांना मर्डरचा रिपोर्ट आल्याचं माहीत पडलं. बाभुळगांवच्या पोलीस पाटलानं पाठवलेल्या रिपोर्टाची नोंद घेतली. नोंद घेत असताना, पुंजाजी आणखी एखादा खून करील कां ? त्यानं मधूकर पाटलाचा खून कां केला असावा ? खून करून खूनी अपराधी बहुधा पळून जातो. हा पुंजाजी हातात सुरा घेऊन गावात कां फिरत असावा ? असे एक ना दोन अनेक प्रश्न सतावीत होते. शक्य तितक्या वेगानं तपास करून पुंजाजीस, पकडायचं होतं. रिपोर्टाची नोंद घेतल्यावर मी जानूस विचारलं, 'जानू, पुंजाजीनं पाटलाचा खून कां केला?' 'मला माहीत नाही जी ऽऽ' जानू त्याला म्हणाला. विचारपूस करीत वेळ घालवण्यात अर्थ नव्हता. खून चढलेला गुन्हेगार पकडणं सोपं नव्हतं. त्याच्या दृष्टीनं एक खून केला काय अन् दहा खून केले काय एकच होते. कारण शिक्षा मिळणार ही माहीत झाल्यावर परिणाम भोगायाची तयारी असते. युनिफॉर्म चढवून लोड केलेलं रिव्हॉल्व्हर कमरेला लावलं. ते पाहून जानू म्हणाला, 'पो. पाटलांनी सांगितलंय की बंदूकधारी शिपाई संगं घ्या' 'ठीक आहे, मी पहातो. असं म्हणून मी आर्म पार्टी बरोबर घेतली.

पातूरहून निघून एस्. टी. बसनं बाभूळगावला आलो. स्टॅण्डवर दिसणारी नेहमीची गर्दी दिसली नाही. शेषरावचं हॉटेल उघडं दिसलं. बाकीची हॉटेलं, पानपट्टीची दुकानं बंद होती. सगळीकडं सामसूम होतं. शेषरावच्या हॉटेलात लाश पडली असल्याचा रिपोर्ट होता म्हणून तिथं गेलो. आजपर्यंत मी अनेक खुनाच्या केसमधली प्रेतं पाहिली होती परंतु असलं भीषण दृश्य पाहण्यात आलं नव्हतं. अंगावर रोमांच उभे

रहावेत असं ते दृश्य होतं, मधुकरच्या प्रेताचा गळा आरपार कापला गेला होता. मानेचा भाग शिल्लक असल्यानं शीर पूर्णपणे धडावेगळं झालं नव्हतं. प्रेताच्या डाव्या बाजूच्या छातीवर सुऱ्यानं भोसकल्यामुळं आरपार छिद्र पडलेलं दिसत होतं. प्रेतावरचे कपडे रक्तानं भिजून गेले होते. प्रेताभोवती रक्ताचं थारोळं जमा झालेलं होतं. डोळ्याकडे पाहवत नव्हतं कारण डोळे उघडे असून वटारल्यासारखे दिसत होते. प्रेताची राखण करण्यास कॉन्स्टेबलला सांगून पुंजाजीचा शोध घेण्यासाठी मी निघालो. स्टॅण्डवरून गावात जाण्याच्या रस्त्यानं जात असताना असं दिसून आलं की गावातली घरं आतून बंद होती. पुंजाजीच्या घरी पहिलं. त्याची पत्नी व मुलं रडत बसली होती. घरात तो मिळून आला नाही. त्याला शोधून काढण्यास जास्त वेळ लागला नाही. गावातल्या मारुतीच्या मंदिराकडे जाणाऱ्या रस्त्यावर त्याची समोरासमोर भेट झाली. पोलीस यायच्या आत गुन्हेगार फरार होतात हा नेहमीचा अनुभव. परंतु येथे तर पोलीस समोर दिसत असताना देखील पुंजाजीनं पळून जाण्याचा प्रयत्न सुद्धा केला नाही याचं आश्चर्य वाटलं. त्याला पाहताच मी झटकन् कमरेचा लोड केलेला रिव्हॉल्व्हर हाती घेतला, न जाणो तो आमच्यावरच हमला करील असं वाटलं होतं ! आम्हाला पाहून त्यानं काही हलचाल केली नाही. 'पुंजाजी' हातातला सुरा खाली ठेव असं मी म्हणताच त्यानं सुरा खाली ठेवला. तो निःशस्त्र झाला होता.

त्याच्याजवळ जाऊन मी म्हणालो, 'हात पुढे कर'. त्यानं हात पुढं करताच बेड्या ठोकण्यात आल्या. सर्कशीतल्या वाघानं रिंग मास्टरचे हुकूम पाळावेत, त्याप्रमाणे तो माझे हुकूम पाळीत होता. हातकड्या घालून झाल्यावर त्याच्याकडं क्षणभर टक लावून पाहिलं, तो म्हणाला, 'माझं काम झालं आहे. अन्यायाचा बदला घेतला मी. आपण आपलं काम करा. आपण विचाराल ती माहिती देतो. रक्तलांछित सुरा मी हजर केला आहे. अंगावरचे कपडे ही रक्ताचे डाग असल्यानं काढून देतो. त्यानं जमिनीवर ठेवलेला सूरा मी जप्त करून ताब्यात घेतला. सूऱ्याच्या पात्यावर रक्त लागलेलं होतं. त्याची उची ५१ फूट

असावी. डोकीस आखूड फेटा, अंगात रक्ताचे डाग असलेला पांढराशर्ट, धोतर नेसलेला असा, अंगानं सडपातळ असलेला पुंजाजी माझ्यासमोर शांतपणे उभा होता. त्याच्या डोळयावरचा खुनाचा कैफ पार उतरून गेला होता. त्याला पाहून तो खुनी अपराधी आहे असं वाटत नव्हतं. त्याचं वय पन्नाशीच्यावर असावं तर मधुकरचं वय तिशीच्या आंतलं होतं. मधूकर तरुण तर होताच पण अंगानं मजबूत बांध्याचा होता. पुंजाजीला अटक करण्यात आली होती. त्याला ग्रामपंचायत ऑफीसात नेण्यात आलं.

पुंजाजीनं मधुकर पाटलाचा खून कां केला ? असं कोणतं कारण घडलं होतं की, मधुकर मरण पावल्यावर देखील त्याच्या छातीवर बसून गळा कापला होता ?'

त्याला मी पहिला प्रश्न केला, 'मधकर पाटलाचा खुन तू कां केलास ? माझा प्रश्न ऐकून त्याच्या डोळ्यात अश्रू तरारले. खुनाच्या कैफाची जागा अश्रूनं घेतली होती. माझी उत्कंठा वाढत होती. 'सांग पुंजाजी ! मधुकरचा खून तू कां केलास ?'

त्यानं सांगण्यास सुरुवात केली, 'मधूकर पाटलानं लई अन्याय केला शेतीवर राबून मी पोट भरतो. कमला माझी तरुण मुलगी हाय. गेल्या वर्षी तिचं लग्न केलं. पोरीचं नशीबच खोटं तिच्या नवऱ्याला दारुचं व्यसन जडलं होतं. दारुच्या नशेत तिला मारझोड व्हायची. माझी लेक दिसायला दहाजाणीत उजवी हाय तिला चांगलं स्थळ मिळावं म्हणून प्रयत्न केला पण अखेर व्यसनी माणसाच्या हातात पडली. एका वर्साच्या आंत तिचं देखणंपण पार करपून गेलं. रोजच्या जाचाला कंटाळून गेली. म्या तिला घरी आनलीं ती परत न पाठविण्यासाठी.'

'नवऱ्यानं टाकलेली बाई म्हणून गावकरी तिच्याकडे पाहू लागले. घरी आल्यावर ती शेतावर काम करू लागली. गोरीगोमटी लेक पाण-वठ्यावर जाऊ लागली. मधू पाटील तिचा पिच्छा करायचा. तो अव्वल

दर्जाचा जुगारी अन् शराबी होता. त्याच्या वाटेला जायची कोणाची हिम्मत व्हायची न्हाई. पोरीनं माझ्यापासून हे लपवून ठेवलं होतं. कारन असं की, तिला वाटे मधू पाटील मला मारहाण करील. त्याची हिम्मत वाढत गेली. कमलानं त्याला अनेकदा समजावून सांगितलं की, तिच्या इज्जतीशी खेळू नगं. त्या मोकाट सुटलेल्या टोळभैरवावर कांही परिणाम झाला नाही. तिची वाट अडवणं, सिनेमातली गाणं म्हननं असं त्याचं चालूच होतं.'

'माझ्या कानावर आलं तेव्हा मी मधू पाटालाकडं गेलो. त्याला विचारलं 'तू हे चाळे कां करतोस ?आम्ही गरीब आहोत पण आम्हाला इज्जत प्यारी हाय. तू कमलाचा नाद सोडून दे, तुझं लग्न झालंय. दोन मुलं हैती तवा हे बरं न्हाई.' माझं बोलण ऐकून तो हसला व म्हणाला, 'पुंजा जा इथून मला सांगू नको गिन्यान. कोन तुज्या कमलीकडे पहातो.'

'जातो मी पन पुन्हा कमलीच्या वाटं जाऊ नकोस' असं बजावून मी परत आलो. त्याचे चाळे बंद न होता अधिकच वाढले'.

'एके दिवशी मी घरी आलो तेव्हा घरात कमला रडत बसली होती. तिनं सांगितलं 'आबा, मधू पाटलाची मजल अंगाला हात लावण्यापर्यंत गेली आहे. माझा नाद सोडा मी लगीन झालेली बाई आहे. आज ना उद्या सासरी जाईन'.

तो म्हणाला, 'नवऱ्यानं टाकलेली तू ! नवऱ्यानं सोडलं म्हनून काय झालं. मी हाय की' असं म्हणून तो माझ्याजवळ आला. कशीबशी सुटका करून घेतली.'

कमलानं रोजचं या तक्रारी कराव्या, रडावं असं चालू झालं,

'आज सकाळी मी अजून शेतावर जायचाच होतो. कमला पाण-

वठ्यावरून परत घरी आली. तिचा ब्लाऊज फाटला होता. लुगडं फाटलं होतं. काय झालं कमला ! मी विचारलं.

तिनं सांगितलं, मी पाठवठ्याकडं जात होते. मधू पाटलानं पाठलाग सुरू केला. 'कमले ! ए कमले !' हे बघ मी काय आनलय असं म्हणून नवीन शिवलेला ब्लाऊज मला दाखवला. मी पुढं जाऊ लागले. तो जवळ आला अन् म्हणाला, 'ए कमले हा तुला खुलून दिसेल बघ. अंगात घालून दाव जरा 'असं म्हणून त्यानं उरोजाकडे हात लावला. धावा ! धावा ! असं मी मोठ्यानं ओरडले. त्यानं मिठी मारण्याचा प्रयत्न केला. अंगातला ब्लाऊज फाटून चिंध्या झाल्या, गळ्यातलं मंगळसूत्र तुटून खाली पडलं. हातातल्या बांगड्याचा चुरा झाला. माझा आरडा-ओरडा ऐकून बाजूच्या शेतात काम करणारे बाया व गडी धावले पन कोणी पुढं आलं नाही. माणसांना पाहून त्यानं मला सोडलं व म्हणाला, 'आज माझ्या तावडीतनं सुटलीस. 'पुन्हा पाहून घेतो.' असं म्हणून तो निघून गेला. साऱ्या गावा देखत माझ्या छातीला हात लावला त्याचं कोन काय करणार ! आपण पडलो गरीब उद्या तो काय करील त्याचा नेम नाही.'

कमलानं सांगितलेली हकीगत ऐकून तळपायाची आग मस्तकाला गेली. 'पोरी, तुझ्या इज्जतीला हात घालणाराचा बदला, घेतल्याविगर घरात पाऊल ठेवणार नाही.' अस म्हणून मी घरातली मटन कापण्याची धारदार सुरी घेतली. दोघी मायलेकींनी माझे पाय धरले. बाहेर मी जाऊ नये म्हणून आडव्या पडल्या. त्यांना बाजूला सारून मी सुरी घेऊन घराबाहेर पडलो. मधुकरला कायमचाच खतम् करण्याचं ठरवलं होतं मी' त्याने सांगितलेली हकीगत मी शांतपणानं ऐकून घेतली.

त्याला मी विचारले, 'खून केल्यावर सुरा हातात घेऊन गांवभर कां हिंडत होतास !

त्याने उत्तर दिले, 'मधूकर पाटील माझ्या तरण्या मुलीच्या इज्जतीशी खेळला म्हणून माझं डोकं भडकलं होतं. तो तर एकाच फटक्यात खलास झाला. तेवढ्यावर समाधान झालं नाही. लोकांना सुरा दाखवून पळवून लावलं अन् मग प्रेताच्या छातीवर बसून बदला घेतला. दुसऱ्या कुनाला मारणार नव्हतो. माजं काम झालं. आपण जे काय करायचं ते करा. मला फासावर लटकवलं तरी चालेल.'

पुंजाजीने खून कां केला हे त्याच्या जबानीवरून स्पष्ट झाले होते. मी पुढील तपासास लागलो.

प्रेत शेपरावच्या हॉटेलात असल्यानं तेथे गेलो. प्रेताचा पंचनामा केला व प्रेत पोस्टमॉर्टेम करिता पाठवलं. आता विचारपूस कोणाला करावी हा प्रश्न निर्माण झाला. ज्या ठिकाणी गुन्हा झाला तेथे कोणीच हजर नव्हते. पुंजाजी पकडला गेल्यानं गावातील लोकांची भीती नाहीशी झाली. हळूहळू गावातील लोक जमू लागले.

हॉटेलवाल्या शेषरावला बोलावून मी विचारले, 'शेषराव, तुझ्या हॉटेलात हा प्रकार झाला आहे. तो तू जे पाहिलंस त्या प्रमाणं सांग.'

शेषराव म्हणाला, 'मी त्यावेळी हॉटेलात नव्हतो, दूध आनायला गेलो होतो तेव्हा खून झाला. मी कांही पाहिलं नाही.'

आणखी एक–दोघांकडे विचारपूस केली. प्रत्येकजण या ना त्या कारणावरून खून झाला त्या वेळी आपण त्या ठिकाणी हजर नव्हतो, त्यामुळे खून कसा झाला, काय झालं हे माहीत नसल्याचं प्रतिपादन करीत होता. शेषरावच्या हॉटेलात काम करणारी पोरं बोलावून आणली. त्यांच्याकडं विचारपूस करता कोणी दूध आणायला गेला होता, कोणी पाण्याची घागर घेऊन पाणी आणण्यास गेला तर कोणी चहाची

ऑर्डर घेऊन बाहेर गेला होता. कोणालाच कांही माहीत नव्हतं. पोलीसांच्या झंझटीत पडलं की कोर्ट कचेरीची पायरी चढवी तर लागणारच, याशिवाय मधुकरच्या टोळक्यातले काळभैरव मारहाण करण्याची भीती होती. भरदिवसा पाचपन्नास माणसासमक्ष खून झाला असताना कोणी तो खून होताना पाहिल्याचं सांगत नव्हता. प्रत्यक्षदर्शी एकही पुरावा मिळत नव्हता.

असा तपास करून भागण्यासारखं नव्हतं. लोकांना विचारपूस करण्याअगोदर शेषरावच्या हॉटेलात कोण बसले होते, बेंचावर कोण कोण बसले होते, याची माहिती काढून मगच साक्षीदारांना बोलावण्यात यावं असा विचार माझ्या डोक्यात आला. ही माहिती पुंजाजीलाच विचारून घ्यायची असं मी ठरवलं. पुंजाजीला अटक करून पोलीस पहऱ्यात ग्रामपंचायत ऑफीसात ठेवण्यात आलं होतं. तिथं मी गेलो.

पुंजाजीला मी म्हणालो, 'पुंजा आबा ! जे होऊ नये ते तुमच्या हातून झालं. पोलिसाकडं धाव घेतली असती तर मी तुमच्या मदतीस आलो असतो. मधूकर पाटलाचा मी बंदोबस्त केला असता. आम्हाला आता सर्व कांही माहीत पडलंच आहे. त्यात खरं काय ते तुमच्या तोंडून ऐकायचं आहे. तुम्ही बेंचावर येऊन बसला होता त्यावेळी तुमच्या शेजारी कोण कोण लोक बसले होते.' पुंजाजीला वाटलं पोलिसांना सर्व कांही माहीत झालंच आहे तेव्हा आता कसलाही आडपडदा ठेवण्यात काय अर्थ ? त्याला त्याच्या शेजारी कोण लोक बसले होते, तो बसला होता त्याच्या उजव्या बाजूच्या बाकड्यावर कोण बसले होते, हॉटेलात कोण कोण बसले होते, त्या सर्वांची नावे विचारून त्या नावाचे टिपण घेतलं. शेषराव हॉटेलवाला हॉटेलातच होता. ही मिळालेली माहिती घेऊन मी शेषरावच्या हॉटेलसमोर मला मिळालेल्या माहितीवरून साक्षीदारांना बोलावलं. खून होण्याचे अगोदर ते ज्या जागेवर बसले होते तेथे त्यांना बसवण्यात आलं. शेषरावला तो ज्या ठिकाणी उभा होता तेथे उभं केलं. ते सर्व एकमेकाकडं पाहू लागले. त्यानंतर अटक केलेला

आरोपी पुंजाजी याला तो ज्या ठिकाणी बसला होता, त्या ठिकाणी बसवण्यात आलं. पुंजाजीनं मधूकर कुठं उभा होता, त्याचेवर कसा सुऱ्याचा वार केला, तो कसा खाली पडला त्याचं प्रात्यक्षिक करून दाखवलं साक्षीदार मनातून खजील झाले होते. शेषराव हॉटेलवाल्याकडे एक जळजळीत कटाक्ष टाकून विचारलं, 'काय शेषराव ! आली कां लक्षात तुमची जागा, आतातरी बरोबर खरं ते सांगणार की नाही. खरं सांगितलं नाही तर पुंजाजीच्या तोंडून सर्व जणांची नावं ऐकायला मिळतीलच.'

'होय साहेब, मी याच ठिकाणी हॉटेलातच उभा होतो. पुंजाजीच्या हातातलं अवजार पाहून मी याच ठिकाणी उभा राहिलो. क्षणार्धात त्यानं मधुकरच्या छातीवर वार केला. धाडकन् मधू खाली पडला, भितीनं मी हॉटेलच्या मागचं दार उघडून पळून गेलो. मला जे माहीत आहे, ते मी सर्व सांगितले' शेषराव म्हणाला.

बाकीच्या साक्षीदाराचं उसनं अवसान पार खचून गेलं होतं. बेंचावर, बाकड्यावर बसलेल्या सर्वांनी खून होत असताना पाहिलं होतं. ते सर्वजण त्यांनी जे पाहिलं त्याप्रमाणं सांगू लागले. प्रत्यक्षदर्शी साक्षीदार भरपूर मिळाले. त्या सर्वांच्या जबान्या घेण्यात आल्या.

पुंजाजीनं ज्या सुऱ्यानं खून केला होता तो सुरा व त्याचे रक्ताचे डाग असलेले कपडे यापूर्वीच जप्त करण्यात आले होते.

पुंजाजीला पोलीस बंदोबस्तात पातुरला पाठवीत असताना त्याची मुलगी कमला तिथं आली. तिच्यासोबत तिची आई आली होती. कमलाचं वय वीस वर्षाचं असावं कुणाचही लक्ष वेधलं जावं असं तिचं सौंदर्य होतं, तिच्या टपोऱ्या डोळ्यातनं अश्रू गालावर ओघळत होते. तिच्या अब्रूच्या रक्षणाकरिता त्याग करणारा पिता जेलमध्ये जाणार होता. त्याला डोळे भरून पाहण्याची आस उराशी बाळगून त्या आल्या होत्या.

'साहेब, पुंजा आबाला भेटू द्या.' तिनं मला विचारलं. त्या दोघीना ही मी पुंजाजी बरोबर बोलण्याची परवानगी दिली.

'आबा ऽ काय केलंत हे ! जाऊ नका म्हणून सांगितलं पन ऐकलं नाही. आमची फिकीर करू नका. मी अन् आई शेतावर काम करू दोघा लहान भावांना सांभाळीन मी.' बोलताना तिचा कंठ दाटून येत होता. तिची आई धाय मोकलून रडू लागली. वातावरण असं कांही झोलं की पोटात गोळा उठल्यासारखं वाटू लागलं.

'कमले रडू नको. माजं काय होणार हे ठावं होतं मला. माजं काम मी केलं. फासावर जायला तयार हाय. माजी वाट पाहू नका. पोरांना सांभाळा,' मुलांची आठवण झाल्यावर मात्र पुंजाजीला गहिवरून आलं. दोघींनी आवेगानं पुंजाजीला मिठ्या मारल्या, त्याच्या पायाचं दर्शन घेतलं. जातो आम्ही !' असं म्हणून त्या निघून गेल्या. डोकं सुन्न झालं होतं. पुंजाजीनं असं करायला नको होत. मधूकरचंही घर बसलं अन् पुंजाजीच्या घराचीही वाताहत झाली होती. त्यानं कायदा हातात घ्यायला नको होता ! नको होता ! मधुकरचा बंदोबस्त त्याला कायद्याने करता आला असता, असे विचार मनांत येत होते.

असे विचार चालू असतानाच एस्कॉर्टच्या कॉन्स्टेबलस्‌नी पूंजाजीस नेलं.

या गुन्ह्याचा तपास पूर्ण करून पुंजाजी विरुद्ध मी त्यानं जाणून बुजून मधूकर पाटलाचा खून केला म्हणून दोषारोपपत्र न्यायालयात दाखल केलं. अकोला येथील सेशन्स कोर्टात ही केस चालली. आरोपी पुंजाजी याच्या विरुद्ध भक्कम पुरावा दाखल करण्यात आला. सेशन्स कोर्टाने पुंजाजीला जन्मठेपेची शिक्षा ठोठावली.

दोन

# शालीग्रामला जन्मठेप कां झाली ?

रात्रीच्या अंधारांने लपेटलेलं वाडेगाव हळूहळू उजळून निघू लागलं होतं चंमचम चमकणाऱ्या चांदण्या ज्यावर आहेत, असं काळं वस्त्र पारधान केलेली चंद्रमुखी रजनी, पूर्व क्षितीजावर आदित्याचे आगमन होणार आहे, हे पाहून लाजत, मुरडत निघून गेली. 'घन:श्याम 'सुंदरा' या भुपाळीत शाहीर होनाजी बाळानं सकाळच्या वेळचं वर्णन केल्या प्रमांणे वाडेगावात जो तो आळस झटकून आपल्या उद्योगास लागण्याच्या तयारीत होता. तशात सकाळच्या प्रहरी गुजरी बाजारात गारुड्यानं पुंगी वाजवून खेळाला सुरुवात केली होती. दूध घालण्यासाठी निघालेले गवळी, शेतीवर जाणारे खेडूत, पुंगीचा आवाज ऐकून खेळ पाहू लागले होते गारुड्याचा खेळ नुकताच कुठे सुरू झाला होता. इतक्यात एस. टी. स्टॅण्डकडे जाणाऱ्या रस्त्यावरून दुधाची घागर सायकलीस अडकवून एक गवळी म्हणाला, 'मारत्या, खेळ काय पाहात बसलास, चिंचोल कराचा खून झालाय. रस्त्यावर त्याचं प्रेत पडलंय'

'खून' हा शब्द कानी पतताच गारुड्याची वाजणारी पुंगी बंद पडली. ही वार्ता कानी पडताच खेळ पाहाण्यास जमलेले खेडू रस्त्यावर पडलेले प्रेत पाहाण्यास जाऊ लागले. गेल्या दहाबारा वर्षात वाडेगावला खुनाची घटना घडली नव्हती गारुड्यानं आपलं चंबूगबाळं आवरून खेळ बंद केला. मारुती कोतवालही एस. टी. स्टॅन्डकडे जाणाऱ्या रस्त्याकडं निघाला.

हमरस्त्यावर मध्यभागी प्रेत पडलेलं होतं. प्रेताच्या पोटातील आंतडी जखमेतून बाहेर डोकावू लागली होती. डोळे वटारलेल्या स्थितीत तसेच राहिले असल्यानं, चेहरा भीतीदायक वाटत होता. हातांची बोटे वाकलेली असून छातीच्या डावे बाजूस व पोटावर भोसकल्याच्या खुणा होत्या. प्रेताच्या आसपास लोक जमू लागले होते. रामचन्द्र चिचोल-करांचं प्रेत असल्याचं मारुती कोतवालानं ओळखंले व तेथून तो पाट-लाच्या वाड्याकडं गेला.

रामराव मानकर, पोलीस पाटील सकाळचा चहा आटोपून बैठकीत येऊन सुपारी कातरु लागले होते. घाई घाईनं बैठकीच्या पायऱ्या चढीत कोतवाल येत असल्याचं पाहून त्यांनी सुपारी कातरणं थांबविलं. ते कोतवालाकडे पाहून म्हणाले, ' मारत्या, काय खबर आणलीस ? ' धापा टाकीत आलेल्या मारुती कोतवालानं सांगितल; ' रामचन्द्र चिचोलकराचा कुणीतरी खून केला आहे. स्टॅण्डकडं जाणाऱ्या रस्त्यावर त्यांचं प्रेत पडलंय. खुनाची खबर ऐकून पाटील गडबडून गेले. कातरलेली सुपारी व अडकित्ता पानदानात ठेवीत ते म्हणाले, ' प्रेत तू पाहून आलास का ? खून कोणी केला म्हाईत पडलं का ?'

' प्रेत पाहून आलाय मी पन खून कोणी केला हें म्हाईत पडल न्हाई ' मारत्यानं उत्तर दिले.

' चल वर ! प्रेत कुठं पडलंय दाव तरी ! औट पोस्तावर खबर देन्याआदीपाहून घेतलेलं बर !' असं म्हणून ते अुठले. ते दोघेही स्टॅण्डकडे जाणाऱ्या रस्त्यावर आले. त्यावेळी त्यांना रस्त्यावर जमलेले लोक दिसले. ' पाटील आले ! पाटील आले !' अशी कुजबुज झाली. पाटलांना लोकांनी वाट करून दिली. प्रेत पाहून ते उद्गारले ' रामचन्द्र चिचोलकराचंच प्रेत हाय' जमलेल्या गावकऱ्याकडे पहात ते पुढे म्हणाले, ' कोणी खून केला त्याचा?' सर्वजण एकमेकांच्या तोंडाकडं पाहू लागले. थोडावेळ शांतता पसरली त्या शांततेचा भंग करीत मानकर पाटील म्हणाले, '. मारुत्या, तू या प्रेताजवळ थांब कुनाला प्रेताजवळ येऊ देऊ नको. मी पोलीस औटपोस्तावर जाऊन खबर देतो.'

'व्हय जी ऽ' असं म्हणून कोतवालानं संमती दिली. पाटील पोलीस औटपोस्टाकडे खबर देण्यासाठी निघून गेले.

अकोला जिल्ह्यातील, वाळापूर या तालुक्याचे ठिकाणापासून पातूरकडे जाणारा रस्ता आहे. या दोन्ही गावांना जोडणाऱ्या रस्त्याचे मध्ये वाडेगाव लागते. एस. टी. रस्त्याचे कडेला थांबते. त्या ठिकाणी तीनचार हॉटेलस् असून सिनेमा थिएटरही आहे. या सिनेमा थिएटरला लागून पोलीस औटपोष्ट आहे. पोलीस औटपोष्टात नेमणुकीस असणाऱ्या पोलीस कॉं पांडूरंग सकाळची वेळ असल्यानं स्टॅण्डवरील हॉटेलच्या बाहेर ठेवलेल्या लाकडी बेंचवर चहा पीत बसलेला होता. चहा पिता पिता त्याला रामराव पाटील औटपोष्टाकडे येताना दिसले चहाची बशी टेबलावर ठेऊन त्यानं, ' पाटील ! पाटील ! ' अश्या हाका मारून पाटलाचं लक्ष वेधून घेतलं. कॉं. पांडूरग यास हॉटेलसमोरील बेंचवर बसलेला पाहून पोलीस पाटील त्याचेजवळ आले.

' या पाटील, चहा घ्या ' असं म्हणून पांडुरंगन हॉटेलातील पोराला ऑर्डर दिली, 'नाम्या' आणखी एक सिंगल घेऊन ये,' ' च्या मागवू नका. गावात खून झालाय तेची खबर द्यायला आलोय' पाटलानी खुलासा केला.

' काय म्हणता, खून झालाय, कुणाचा खून झालाय ?'

' रामचन्द्र चिंचोलकराचा कुणीतरी खून केलाय. त्याचं प्रेत रस्त्यावर पडलं आहे. ठाण्यात फोन करून दरोगा साहेबांना कळवा ही खबर,' पोलीस पाटील व कॉन्स्टेबल पांडूरंग यांचे संभाषण चालू होते. त्यांच्या बोलण्यात ' खून ' शब्द आलेला, तेथे बसलेल्या गिऱ्हाकांनी ऐकला. हॉटेलच्या गल्ल्यावर बसलेल्या. सदा पाटलाचे कान टावकारले गेले. गिऱ्हाकांनी आपसातील बोलण थांबवून ते दोघे जण काय बोलतात याकडे लक्ष्य देऊन ऐकू लागले. चहाचा कप घेऊन येणारा नाम्या जागच्या जागीच थांबला. प्रत्येकाची जिज्ञासा जागृत होऊन ते कान देऊन त्यांचे भाषण ऐकू लागले कॉं. पांडूरग म्हणाला, ' जमादारसाहेब फिरतीवर

गेल्यात, दरोगा साहेबांना फोन करून कळवितो.' 'असे म्हणत तो जागचा उठला. ते दोघेही औटपोटा मध्ये ठाण्यात खबर देण्यासाठी गेले.

मी त्या वेळी बाळापूर पोलीस स्टेशन सबइन्सपेक्टर म्हणून काम करीत होतो. ता. १-९-१९७१ ही तारीख माझ्या चांगलीच स्मरणात राहिली आहे. तपास कामातील चिवटवणाची कसोटी दाखविण्याचा प्रसंग, त्या दिवशी घडलेल्या गुन्ह्याचे तपासात आला. खून केलेल्या आरोपीकडून, त्याने ज्या विळ्याने खून केला होता, तो काढून घेण्यात, जो चिवटपणा दाखवावा लागला, तो मी विसरणे शक्य नाही !

त्या दिवशी सकाळी ७-३० वाजण्याची वेळ असावी. कमरेभोवती टॉवेल गूंडाळून मी बाथरुममध्ये जाण्याचे तयारीत होतो. बाळापूरच्या ठाणेदाराचे सरकारी क्वार्टर उंच टेकडीवर असल्याने क्वार्टरकडे कोणी येऊ लागल्यास दुरूनच दिसते. स्नान करण्यासाठी बाथरुममध्ये जाण्याचे तयारीत असताना, युनिफॉर्ममध्ये असलेला कॉन्स्टेबल गजानन झपझप पावले उचलीत क्वार्टरकडे येताना दिसला. त्याची वाट पहात मी थांबलो. टेकडी वर चढून आल्यावर त्याला धाप लागली होती. त्याची छाती, धाप लागल्यानं वर खाली, वर खाली होत होती. व्हरांड्यात येऊन तो म्हणाला, ' कॉ. पांडुरंगने वाडेगावहून फोन केला आहे. त्यानं कळवलं आहे की वाडेगावला खून झाला आहे. ठाणेदारसाहेबांना फोनवर बोलवून घ्या.'

' मी आता ठाण्यात येतोच ! पुढे जा,' असे म्हणून मी युनिफॉर्म चढविला. माझे व कॉ. गजाननचे संभाषण घरातील, मंडळींनी ऐकलं होतं. 'निदान आंघोळ तरी अटोपून घ्यायची होती, सौ. म्हणाली.

' मला आत्ताच निघायला पाहिजे. ठाण्यात टेलीफोन चालू ठेवला आहे.' असे म्हणून मी बाहेर पडलो. पोलीस स्टेशनमध्ये येताच रिसीव्हर कानाला लावून म्हणली, 'पोलीस स्टेशन ऑफिसर बोलतोय '.

तिकडून आवाज आला, ' कॉ. पांडूरंग बोलतोय, मानकर पाटील औटपोष्टात आले आहेत. त्यांनी संगितलंय की वाडेगावला रामचन्द्र चिचोलकराचा खून झाला असून त्याचं प्रेत रस्त्यावर पडलं आहे. औट पोस्टाचे जमादार फिरतीवर गेले आहेत. मी एकटाच आहे.'

' मी वाडेगावला निघतोच आहे. तू घटनास्थळावर जाऊन प्रेताची राखण कर. कुणी खून केला, काही समजले का ?'

' नाही. कोणी खून केला ते समजले नाही. मी घटनास्थळावर जात आहे.' असं म्हणून पांडूरंगनं फोन बंद केला. मी कॉ. पांडूरंगनं फोनवरून दिलेल्या खबरीची नोंद रेकॉर्डला घेतली. पोलीस स्टेशनमध्ये हजर असलेल्या स्टाफला ही वार्ता कळली होती. प्रत्येकाच्या हालचालीत तेजी आली होती. वाडेगाव औटपोष्टाचे जमादार शिवाजीराव, बाळापूरला आले असल्याचं समजलं. त्यांनाही ठाण्यात बोलवून घेण्यात आले. ते ऑफिसात येताच मी म्हणालो, 'वाडेगावला खून झाला आहे. तपास-पार्टीसह निघायचे आहे. तुम्ही एस. टी. स्टॅण्डवर थांबून गाडी येताच परत सांगायला या.'

' ठीक आहे. मी स्टॅण्डवर जातो. ' असं म्हणून ते स्टॅण्डवर निघून गेले. ते जाताच मी टेबलाचे खणाजवळ असलेले बटन दाबून बेल वाजविली. क्राईमचे काम पाहाणारे हे. कॉ. सोनाजी आले. त्यांना मी सांगितले, 'तपास पार्टीमध्ये निवडक स्टाफ ठेवा. तपासात किटबॉक्स, दोन हातकड्या, दोन वागदोर, लिहिण्याचे साहित्य असलेले दफ्तर असे सामान बरोबर घ्या. खुनाचा गुन्हा असल्यामुळे आर्मगार्ड रायफलीसह बरोबर न्यावा लागेल. वाडेगावला जाणारी एस. टी. इतक्यात येईलच, तेव्हा ही कामे झटपट उरकली पाहिजेत.'

'जी ऽ साहेब' असं म्हणून ते आपल्या कामास लागले.

टेबलाच्या खणाजवळचं बटन पुन्हा दाबलं गेलं. बेल वाजताच पहारा देणारा शिपाई अंबादास आत आला. तो आत येताच त्याला मी सांगितले, 'क्राईम सेक्शनमधील गुन्हेगारांची माहिती असलेली फाईल घेऊन ये.'

हा हुकूम ऐकताच, तो परत गेला. त्यानं मला हवी असलेली फाईल थोड्याच वेळात आणून दिली. पुन्हा बेल वाजविली गेली. हेड कॉ. सोनाजी आत आले व म्हणाले, ' तपासपार्टी तयार आहे. आर्मगार्डही तयार ठेवला आहे. हातकड्या, वागदोर, किटबॉक्स हे साहित्य स्टॅण्डवर पुढे पाठवून दिले आहे. '

' ठीक आहे. स्टॅण्डवर वाडेगावला जाणारी बस आली की निघतोच. ' असे मी म्हटल्यावर ते निघून गेले. ऽ थोड्या वेळाने हेड कॉन्स्टेबल शिवाजी आले व म्हणाले, एस. टी. गाडी स्टॅण्डवर आली आहे. तपास-पार्टी, आर्मपार्टी स्टॅण्डवर पाठविली आहे. चला आपण निघू. '

त्यानंतर मी लवाजम्यासह वाडेगावला जाऊन पोहोचलो. मानकर पाटील हे वाडेगावच्या एस. टी. स्टॅण्डवर आमचीच वाट पहात बसले होते. पोलीस पार्टीसह एस. टी. मधून आम्ही उतरल्याचं पाहून त्यांना हायसं वाटलं असावं. त्यांच्या चेहऱ्यावरून तसं वाटलं. ' पाटील, घटना स्थळाकडे चला ' असे मी म्हणाल्यावर ते पुढे व त्यांचे मागे फौज-फाटयासह, मी जाऊ लागलो. सरकारी शासनाच्या अवाढव्य मशनरीचा, पोलीस पाटील म्हणजे एक लहानसा पुर्जाच असतो. एखाद्या मशिनचा लहानसा पुर्जा जरी काढला तरी ती मशिन बरोबर चालत नाही. अगदी तसंच आहे पोलीस पाटलासंबंधी. रस्त्याचे कडेला जमलेल्या गावकऱ्यांकडं पहात पाहात ते पुढे चालत होते. आपल्या पिळदार मिशांवर मधून मधून हात फिरवीत जणु ते सुचवीत होते की केवळ माझ्यामुळेच फौजफाटयासह फौजदार गावात आले आहेत.

मेनरोडला जोडणारा गावातील रस्ता आल्यावर आम्ही वळसा घेऊन त्या रस्त्याला लागलो. रस्त्यावर एके ठिकाणी माणसांची गर्दी दिसली. कॉ. पांडूरंग आम्हाला पाहून पुढे आला. त्याने सॅल्यूट ठोकून अभिवादन केलं. त्याच्या अभिवादनाचा स्विकार करून मी पुढे गेलो. गर्दीतील लोक पांगले. गेले. तेव्हा रस्त्याचे मधोमध पडलेलं प्रेत दिसलं. रक्ताच्या थारोळ्यात पडलेलं, ते प्रेत पसस्तीस वर्षाच्या तरुणाचं होतं.

डोळे वटारलेल्या स्थितीत असल्यानं चेहरा भयानक दिसत होता. प्रेत पाहून झाल्यावर, हेड कॉ. शिवाजीराव यांना मी म्हणालो, ' प्रेताचा पंचनामा करायचा आहे. दोन पंच बोलवा. '
' जी ऽ साहेब' असे म्हणून त्यांनी तेथे जमलेल्या लोकांतून दोन सद्‌गृहस्थांना पंच म्हणून बोलावलं प्रेताची ओळख पटविणे हा महत्वाचा भाग असतो म्हणून मी पाटलाना म्हणालो, ' प्रेताची ओळख पटवून घ्यायची आहे, म्हणून मयताच्या पत्नीस बोलावून घ्या. ' त्यांनी लगेच कोतवालास हुकूम सोडला, ' मारत्या ' ' चिंचोलकराचे घरी जाऊन त्याच्या लक्ष्मीस घेऊन ये. म्हणावं दरोगासाहेबांनी बोलावलंय. ' पडल्या फळाची आज्ञा समजून कोतवाल निघून गेला. थोड्या वेळानं तो मयताच्या पत्नीस घेऊन आला. आपला उर बडवून घेत, कपाळाचे कुंकू पुशीत, रडत ओरडत, ती घटनास्थळावर आली. आपल्या पतीची अवस्था अशी झालेली पाहून तिनं प्रेतावर स्वत:स झोकून दिलं. तिचा हंबरडा ऐकून मन विदीर्ण झालं. तपासकाम तर बाजूला राहून गेल तिला आवरणं कठीण झाल. तिच्या दु:खाचा आवेग ओसरल्यावर तिनं पंचासमक्ष ते प्रेत आपल्या पतीचे असल्याचं सांगितल.

प्रेताच्या डोक्यापासून तपासणीस सुरुवात केली. डोकीवर कोठेही मार नव्हता. डोळ्यातून जीव निघून गेला असल्यानं डोळे विस्फारलेल्या स्थितीतच होते. अंग तपासून पाहण्यास शर्टाची अडचण होत असल्यानं, तो काढून टाकला. शर्टावरही दोन ठिकाणी भोके पडली होती. प्रेताचे डाव्या छातीवर व पोटावर तीक्ष्ण शस्त्राच्या जखमा होत्या. पोटावरील जखमेतून आतडीबाहेर डोकावत होती. प्रेताचे गुप्त इंद्रीय पाहून झाल्यावर प्रेत उलट, सुलट करून बारकाईनं तपासून पाहून प्रेताच्या स्थितीचे वर्णन पंचनाम्यात करण्यात आले. पंचनामा लिहून झाल्यावर घटनास्थळावरील रक्तमिश्रित माती व साधी माती असे दोन वेगवेगळे नमूने घेण्यात आले. दोन कॉन्सटेबल बरोबर देऊन प्रेत पोस्टमॉर्टेम करिता बाळापूरला रवाना करण्यात आले.

प्रेत पाठवून झाल्यावर कॉं. पांडुरंगला मी विचारलं, ' खून कोणी केला याची बातमी मिळाली आहे का ?'

तो म्हणाला, ' मी प्रेताची राखण करीत होतो. खून कोणी केला हे अद्यापी समजून आलेलं नाही. ' ' खून कोणी केला असावा?' हे मोठे प्रश्नचिन्ह माझ्यासमोर उभे होते. रहदारीच्या रस्त्यावर खून झालेला होता. या रस्त्यानं रात्री, पहाटे किंवा दिवस निघताना कुणाचे जाणे-येणे असते याची माहिती मिळविल्यास, हा प्रश्न सुटेल असं वाटल्यानं मी पोलीस पाटलांना विचारलं, ' पाटील, हा खून मध्यरात्रीनंतर झाला असण्याची शक्यता आहे. रात्री बारा वाजता सिनेमाचा दुसरा खेळ सुटतो. त्या वेळेनंतरच हा खून झालेला आहे. रात्री बारा ते सकाळी सातचे दरम्यान या रस्त्यानं नियमीतपणे कोण जात येत असतं, त्यांची नांवे मला पाहिजे आहेत. '

' साहेब, हा गावाचा हमरस्ता आहे. मोटार स्टॅण्डवर जाणारे, शेतीवर जाणारे, दूध विकणारे याच रस्त्यावरून जातात. आपण सांगितलेल्या वेळी या रस्त्यानं कोण जात असतात, त्यांची नांवे काढून लिस्ट बनवून देतो. ' असं म्हणून ते आपल्या कामगिरीवर निघून गेले. एका तासाचे अवधीतच त्यानी पंधरा नावे असलेली लिस्ट आणून दिली. या सर्वांना चौकीवर बोलावून घेण्यात आलं. या पंधरामाणसांपैकी सहा जणांना या गुन्ह्याची हकीगत माहीत होती. सहा जणांपैकी एकास चौकीच्या आंतील रुम मधे बोलावून घेण्यात आलं.

' आपले नांव काय? ' मी सुरुवात केली.
' माझे नाव आनंदराव पाटील '.
' आपण शेतावर जातांना याच रस्त्यावरून जात असता काय?'

' होय, मी याच रस्त्यानं जातो. ' असं आनंदराव यांनी सांगितल्यावर,मी मुद्याला हात घालीत स्पष्टपणे विचारलं, ' आपण हा खुनाचा

प्रकार पाहिला आहे काय?' पाहिला असल्यास, तुम्ही जे पाहिलं असेल त्याप्रमाणे जबाब द्या.'

'मी हा प्रकार पाहिला आहे. असे सांगून त्यांनी जे पाहिले' त्याप्रमाणे सांगण्यास सुरुवात केली, 'आज नेहमी प्रमाणेसकाळी ७ वाजताच्या सुमारास शेतीवर जाण्यासाठी या रस्त्यानं चाललो होतो. चिंचोलकरांच्या घरासमोरील झाडाचे आडोश्यास शालीग्राम पल्हाडे उभा होता. इतक्यात रामचन्द्र चिंचोलकर घरा बाहेर पडला. तो गुजरी बाजाराकडे जाऊ लागला. शालीग्राम झाडाआडून बाहेर आला व चिंचोलकराच्या मागोमाग चालू लागला. चिंचोलकरास त्याची चाहूल लागल्यानं, त्यांनी मागं वळून पाहिलं. इतक्यात विजेच्या चपळाईनं शालीग्रामनं हातातील विछव्यानं त्याचे छातीवर वार केला. माझ्या पाठीमागील बाजूनं शालीग्रामचा मुलगा पळत आला. हा काय प्रकार ोत आहे, हे पाहून मी जागचे जागीच उभा राहिलो. रमेशनं चिंचोलकारास धरलं. तेव्हा शालीग्रामनं पुन्हा एक वार केला. मेलो ! मेलो ! धावा, असं तो ओरडत होता. पोटावर घाव बसल्यानं त्याचं ओरडणं बंद झालं. त्याच्या छातीतून व पोटातून रक्ताचे कारंजे उडाले. निमिशार्धात हा प्रकार माझ्यासमोर झाल्यानं माझे अंगावर भीतीनं काटे उभे राहिले. शालीग्रामचे हातातील तीक्ष्ण अवज़ार पाहून पुढे जाण्य ची माझी हिम्मत झाली नाही. रमेशच्या व शालीग्रामच्या कपड्यांवर रक्त उडालं होतं. पोटावर विछव्याचा वार होताच, रामचन्द्र ज़मिनीवर कोसळून पडला. तो खाली पडताच मी तेथून पोबारा केला.

आनंदरावांना मी विचारलं, 'रामचन्द्रचा खून त्यांनी का केला असावा ? हे आपणास सांगता येईल का ?'

'तसे सांगता येणार नाही, कारण त्यांचे कोणत्या कारणावरून वैर होतं त्याची मला माहिती नाही' आनंदराव अुतरले.

आनंदरावाप्रमाणेच बाकीच्या पाच जणांनी खून होताना जी घटना

घडली ती पाहिलेली होती. त्यांना हा खून का झाला त्याचे कारण सांगता आले नाही. त्यांच्या जबाबावरून शालीग्रामचा मुलगा रमेश हा खून होत असताना, तेथे आला व त्याने मयत रामचन्द्र यास धरून ठेवले होते. रमेश व शालीग्राम यांनी संगनमत करून खुनाचा कट रचला असण्याची शक्यता होती. या गुन्ह्यात दोन्ही आरोपी खून करुन फरारी ाले होते. गावाबाहेर पळून जाण्याइतका देखील अवसर त्याना मिळालेला नव्हता. तपास पार्टीमधील स्टाफला मी त्यांचा शोध घेण्यास गावात रवाना केलं.

प्रेतासोबत पाठविलेले दोन कॉन्स्टेबल परत आले होते. परत येताच त्यांनी पोस्टमॉर्टेम नोटस् माझ्याकडे दिल्या. त्यात रामचन्द्र चिंचीलकारास, तीक्ष्ण शस्त्राने झालेल्या जखमेतून रक्तस्त्राव झाल्याने त्यास मरण आल्याचे नमूद करण्यातं आलं होतं.

तपास पार्टीने दोन्ही गुन्हेगारांचा शोध घेतला. परंतु वाडेगावात त्यांचा मागमूसही लागला नाही. डोक्यात विचाराचं काहूर उठलं. विचारांची संगती जुळवून पाहू लागलो. हे दोन्ही गुन्हेगार नातेवाईकाकडे जाण्याची शक्यता कमी होती. त्यांच्या अंगावरील कपडे रक्ताने भरलेले होते. ते कपडे धुवून टाकण्याचा संभव होता. वाडेगावच्या हद्दीवर मण नदी वाहाते. मण नदीच्या पैलतीरावर झाडाझुडपांचे जंगलच आहे. नदीवर जाऊन त्यांनी कपडे धुतले असावेत, असा विचार येताच मी हेड कॉ. शिवाजी व दोन कॉन्स्टेबलस् तिकडे पाठवून दिले. या पोलीस पार्टीनं नदीच्या पलीकडील जंगलांत जाऊन दोन्ही आरोपींना अटक करण्यात यश मिळविलं.

हात त वेडद्या अडकविलेले दोन्ही गुन्हेगार माझ्यासमोर उभे करण्यात आले. त्यांच्या वयावरून कोण शालीग्राम व कोण रमेश हे ओळखू येत होते. शालीग्रामकडे पाहून त्यानं खुनासारखा भयंकर गुन्हा केला असे वाटत नव्हतं. गोलसर चेहरा, सरळ नाक, अंगाने काटकुळा, असा

शालीग्राम दिसण्यात सौजन्यशील वाटत होता. मयत रामचन्द्र याच्या तुलनेत तो कस्पटासारखा वाटत होता. अंगाने सशक्त असलेल्या रामचन्द्रला त्याने ठार मारावे ही घटना म्हणजे हरिणाने वाघास, सर्पाने मुंगसास मारावं, त्याप्रमाणे घडून आली होती. प्रश्न उरला होता तो हा की, आपल्यापेक्षा बलवान असलेल्या शत्रूवर शालीग्रामने वार करून जाण्यासारखे काय कारण घडले होते ? प्रतिशोधाच्या धडकत्या आगी-मुळचं तो रामचन्द्रवर मात करू शकला असावा,

आरोपी शालीग्राम याचे डोळ्यास डोळा भिडवून मी त्यास विचारलं, ' रामचन्द्र चिचोलकराचा खून तुम्ही दोघांनी मिळून केला आहे.'

तो म्हणाला, 'गुन्हा मी एकट्याने केला आहे. रामचन्द्रचा खून करावा म्हणून मी घराबाहेर पडत असताना रमेशने मला विरोध केला होता. रमेशनं गुन्हा केलेला नाही, त्याला सोडून द्या.' आपला मुलगा रमेश यास वाचविण्याकरिता, तो आपल्यावर सर्व जबाबदारी घेत होता. रमेशला तो खून करणार आहे हे माहीत होते व त्याने घटनास्थळावर येऊन रामचन्द्र यास मागील बाजूनं जाऊन धरून ठेवले होते. असा पुरावा तपासात रेकॉर्डवर आला होता.

शालीग्राम यास मी विचारलं,' तू ज्या विळ्यानं खून केला आहेस, तो विळा कोठे ठेवला आहेस ?' त्यानं उत्तर देण्यास वेळ लावला. काय सांगावं हा संभ्रम त्याचे मनात होता. काय सांगावे याची मनात तो जुळवा-जुळव करीत होता. खोटे बोलायचे असले की आरोपी असेच वेळ लावतात. मी त्याचे चेहऱ्याकडे पहातच होतो, त्याच्या मनातली खळबळ चेहेऱ्यावर स्पष्ट दिसत होती.

तो म्हणाला, ' रामचन्द्रचा खून करून मी पळत नदीकडे गेलो होतो. नदीच्या प्रवाहात रक्ताने भर- लेला विळा फेकून दिला. तो नदीच्या प्रवाहात वाहून गेला असेल, असे वाटते. ' एका कसलेल्या आणि मुरब्बी पोलीस अधिकाऱ्यासमोर तो धादांत खोटे बोलत होता. लोखंडी वजनदार

पदार्थ वाहत्या प्रवाहात टाकला तरी, तो वाहून जात नाही. तो खोटे बोलत आहे हे ओळखूनही चेहऱ्यावर तसे दिसू दिले नाही. त्याला मी विचारलं, ' बिछवा पाण्याच्या प्रवाहाबरोबर वाहूनही जाण्याची शक्यता आहे. हे गृहीत धरू, परंतु तुझ्या कपड्या वसेल रक्ताचे डाग तू धुवून टाकल्यासारखे दिसतात. '

' होय साहेब, नदीवर जाऊन रक्ताचे डाग असलेले कपडे धुतले आहेत. तेच कपडे वाळवून अंगात घातले आहेत.' रक्तांचे डाग असलेले कपडे धुतले तरी त्यावरील रक्त संपूर्णपणे निघून जात नाही म्हणून मी त्यास कपडे काढण्यास सांगितले. दुसरे कपडे घालून, त्यानं धुवून घातलेले कपडे पंचासमक्ष जप्त केले. कपडे जप्त केल्यानंतर मी त्यास विचारलं, ' शालीग्राम, तुझं म्हणणं आहे की, तू नदीच्या प्रवाहात बिछवा फेकून दिला आहे. ज्या ठिकाणी बिछवा टाकून दिलास ते ठिकाण दाखव. '

' चला दाखवितो ' असं त्यानं म्हणल्यावर, आम्ही मागोमाग जाऊ लागलो. नदीच्या पैलतीरावर त्यानं आम्हास नेलं. नदीच्या पात्रांत मांड्यापर्यंत पाणी होते. त्यानं किनाऱ्यावर उभे राहून ज्या ठिकाणी बिछवा टाकला, ते ठिकाण दाखविले. नदीचा तळ स्पष्ट दिसत होता. तेथे बिछवा दिसून आला नाही.

' या ठिकाणीच बिछवा टाकला होता, तो पाण्याच्या प्रवाहासोबत वाहात पुढे गेला असावा,' असं तो म्हणाला

त्याचा रागरंग पाहून हा आरोपी बऱ्या बोलानं कांही सांगणार नाही असं मला वाटलं. विचारपूस करण्याच्या अनेक पद्धती उपलब्ध आहेत. त्या पद्धतीचा अवलंब केल्याशिवाय, तो बिछवा कोठें ठेवला हे सांगणार नाही व गुन्ह्याची खरीहकीगतही सांगणार नाही, हे नक्की समजून आले. त्या दोन्ही आरोपींची सात दिवसांची पोलीस कस्टडी रिमांड घेण्यात आली. रिमांड मिळाल्यावर विचारपूस करण्यात नवीन जोम आला. तपास पार्टीत सामील असलेला स्टाफ, त्यास आळीपाळीनं

तेच ते प्रश्न सारखे विचारीत होता. त्याला मुळीच उसंत दिली नाही. रात्रीही त्याला तेच ते प्रश्न विचारून झोपदेखील येऊ दिली नाही. शालीग्रामचा टिकाव लागला नाही. दुसऱ्याच दिवशी त्यानं सांगितलं, 'खून करून पळून जात असताना, आमचे मोहल्यातील विहिरीत बिछवा फेकून दिला आहे. ती विहीर मी दाखवितो.' दहा फूट व्यास असलेल्या या विहिरीत पाणी भरपूर होते. या विहीरीतून बिछवा शोधून काढणे म्हणजे आमच्या चिकाटीची कसोटीच होती. धीमर लोकांना बोलावून विहिरीचा तळ बुडचा घेऊन शोधण्यास सांगितले. चार–पांच तास प्रयत्न करूनही बिछवा मिळू शकला नाही. विहिरीतील पाणी पूर्णपणे बाहेर फेकून देण्याच्या निर्णय घेतला. या विहिरीवर चार ठिकाणी इलेक्ट्रिक पंप बसविण्यात आले व पंपाच्या साह्याने विहिरीतील पाणी बाहेर काढण्यास सुरुवात केली. सतत सात तासांनी विहिरीचा तळ दिसू लागला. पाणी एक–दोन फूटच शिल्लक असेल. त्यावेळी बिछवा मिळाला. त्या बिछव्यास नऊ इंच लांबीचे तीक्ष्ण पाते व लाकडी मूठ होती. तो बिछवा जप्त करून ताब्यात घेतला. खुनी इसमाने ज्या हत्यारानं खून केला होता ते हत्यार काढून दिलं होतं.

बिछवा काढून दिल्यावर मी शलीग्राम यास विचारलं, 'तू बिछवा कोठे टाकला होता ते खरे सांगितलेस. आता तू चिंचोलकराचा खून का केलास ते खरे सांग.'

तो म्हणाला, 'रामचन्द्र चिंचोलकराची नियत चांगली नव्हती. जंगलातील वाघास माणसाच्या रक्ताची चटक लागली की तो माणसाची शिकार शोधीत हिंडतो, तसे रामचन्द्र चिंचोलकरास तरण्याताठ्या पोरींना एकटं गाठून त्यांचेवर बलात्कार करण्याची चटक लागली होती. तो सधन शेतकरी असल्यानं पैशा–अडक्यालाही कमी नव्हते. शेतीवर काम करण्यास येणाऱ्या स्त्रियांमध्ये ज्या स्त्रिया त्याचे मनामध्यं भरतील, त्यांना हेरून ठेवीत असे. त्या नंतर हेरलेलं सावज, त्याची गडीमाणसं जाळयात अडकवित असत. अब्रू चव्हाट्यावर येईल, पती घरात घेणार

नाही, समाजात स्थान राहणार नाही, या भितीनं त्या स्त्रियांवर अत्याचार झाले, त्यांनी या प्रकाराची वाच्यता केली नाही.'

'माझा मोठा भाऊ दौलतराव याचं शेत, रामचन्द्राच्या शेताचे बाजुलाच आहे. आम्ही एकत्र राहातो. शेतीच्या कामांवर घरची बायामाणसंही जात असतात. परवाचीच हकीगत आहे. दौलतरावांची मॅट्रीकच्या वर्गात शिकत असलेली तरुण व सुस्वरुप मुलगी पुष्पाही दिवस डुबण्याचे सुमारास शेतावरून घरी एकटीच परत जात असताना संधी साधून या लांडग्यानं झडप घातली. तिनं आरडाओरडा केला. तिचं ओरडणं ऐकून बाजुच्या शेतातील कामवाल्या बाया धावून आल्या. कदाचित बाजुच्या शेतांत बाया काम करीत आहेत हे त्यांचे लक्षात आलं नसावं. बाया धावत येत आहेत हे पाहून त्यानं पोबारा केला. तिच्या अंगावरील पातळ व ब्लाऊज ठिकठिकाणी फाटलेला होता. तिच्या गालांवर, गळ्यावर, छातीवर त्याच्या नखाचे ओरखडे उठलेले होते. रोज मजूरी करणाऱ्या बायांनी तिला घरी पोहचतं केलं. झालेला प्रकार तिच्या आईला व वडील दौलतराव यांना समजला परंतु त्यांनी माझ्यासमोर या प्रकरणाची वाच्यता केली नाही. मला हा प्रकार माहीत पडला तर काही कमी-जास्त प्रकार होऊ नये म्हणून त्यांनी मला सांगितले नाही. खून होण्याचे एक दिवस अगोदर गावांत चाललेली कुजबूज कानांवर आली,'

'घरी आलो तेव्हा भाऊ व त्याची मुलगी पुष्पा ही पण होती. दौलतराव यांना मी म्हणालो,' 'रामचन्द्र चिचोलकरानं आपल्या पुष्पावर अत्याचार केल्याची कुजबूज गावात ऐकली आहे. आपण मला या बाबतीत काहीच सांगितले नाही.'

'तुला सांगून तरी काय उपयोग ? गेलेली अब्रु पुन्हा परत येत नाही' असे म्हणत असताना भाऊच्या डोळ्यांत पाणी आलं.

'पुष्पाकडे पाहात मी विचारलं,' 'पुष्पा, काय प्रकार झालाय ते सांग.'

पुष्पाने खाली मानघालून सांगितले 'त्या दिवशी मी शेतावरून परत येत होते. नेहमी कोणीतरी माझ्यासोबत राहात असे. त्या दिवशी माझ्या सोबत कोणी नव्हतं, रामचन्द्रने माझ्यावर पाळत ठेवली असावी. रस्त्यानं जात असताना मागून कुणीतरी आल्याची चाहूल लागल्यानं पाठीमागे पाहिलं. रामचन्द्र चिंचोलकार येत होता. मी मागं पाहताच त्यानं झडप घालून माझे तोंड दाबण्याचा प्रयत्न केला. त्याचे हाताला चावा घेऊन मी जोराने आरडा-ओरड केली. माझी आरडा-ओरड चालू असताना तो माझे तोंड दाबण्याचा प्रयत्न करीत होता. ओढाताणीत माझे ब्लाऊज व पातळ फाटून गेलं. शेतीवर काम करणाऱ्या बाया धावून आल्यानं माझी सुटका झाली. तो पळून गेला.' असा प्रकार तिनं कथन केला. माझ्या नसांनसांमधून रक्त सळसळू लागलं होतं. प्रतिशोधाची आग भडकून उठली. पुष्पा व भाऊ दौलतराव यांच्या डोळ्यातील अश्रू पाहून माझे तोंडून उद्‌गार बाहेर पडले, 'भाऊ ! चिंचोलकारास यमसदनास पाठविल्याशिवाय राहणार नाही.'

'शालीग्राम, 'त्याचा परिणाम काय होईल माहीत आहे ना!' भाऊ म्हणाले. भाऊनी मला परोपरीनं विनवून माझ्या निश्चयापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला परंतु त्याचा काही उपयोग झाला नाही.

'दुसऱ्याच दिवशी दिवस निघण्याचे आत चिंचोलकराचे घरासमोरील झाडाआड लपून त्याची वाट पाहात थांबलो. बिछवा माझ्या कमरेस खोचून ठेवलाच होता. तो सकाळी घराबाहेर पडताच मी त्याचे मागे निघालो. माझी चाहूल लागताच त्यानं मागं वळून पाहिलं, तेवढयातं मी बिछव्यानं त्याचे छातीवर, पोटावर वार केले. अन् त्याच वेळेस रमेश तेथे आला. तो गुन्हेगार नाही.'

शालीग्रामनं दिलेली जबानी रेकॉर्ड करण्यात आली. या गुन्ह्यात सहा साक्षीदारांनी हा प्रकार पाहिलेला होता. आनंदराव पाटलाप्रमाणेच त्यांनी झालेला प्रकार वर्णन करून सांगितला होता. ज्या

बिछव्यानं शालीग्रामने खून केला होता, तो हस्तगत करण्यात यश मिळविले होते.

दोन्ही आरोपीच्या अंगावरील रक्ताने भरलेले कपडे, मयत रामचंद्र याचे अंगावरील रक्तरंजित कपडे, बिछवा या वस्तू विशेषज्ञाकडे तपासणीकरिता पाठविण्यात आल्या.

तपास पूर्ण करून दिनांक १८।११।१९७१ रोजी दोन्ही आरोपी-विरुद्ध दोषारोपपत्र, भा. द. वि. ३०२, ३४ प्रमाणे न्याय दंडाधिकारी वर्ग १ बाळापूर यांचे कोर्टात दाखल केले. ही केस कमिट होऊन अॅडि. सेशन्स ज्जज, आकोला येथे पाठविण्यात आली. तेथे ही केस चालून दिनांक १३-५-७२. रोजी पया केसचा निकाल लागला. विद्वान न्यायाधीशांनी आरोपी शालीग्राम यास दोषी ठरवून जन्मठेपेची सजा दिली. आरोपी रमेशला संशयाचा फायदा मिळून तो सुटला.



तीन

# खुनाचा प्रयत्न

पोलीस लॉकअप मध्ये ईश्वरदास सेवाराम आणि त्यांचे साथीदार यांना बंद करण्यात आलं होतं. कुंदनलालच्या खुनाचा प्रयत्न केल्याचा आरोप त्यांच्यावर होता. त्यानं खून करण्याचा प्रयत्न कां केला याची हकीकत मला त्याच्याच तोंडून माहीत करून घ्यायची होती.

' ईश्वरादसला हजर करा ' मी हुकूम सोडला. माझा हुकूम ऐकून दोन कॉन्स्टेबल्स् लॉकअप रूमकडे ईश्वरदासला माझ्यासमोर आणण्यासाठी गेले. खळ् खळ् असा वेड्यांचा आवाज कानी येऊ लागला. ईश्वरदासला ते घेऊन येत होते. त्याला माझ्यासमोर उभं करण्यात आलं. त्याला मी आपादमस्तक न्याहळून पाहिलं. त्याचे डोळे दारु प्यालेल्या माणसांसारखे, धूद होते. त्याचं वय पन्नाशीच्या आसपास असावं. त्याचा वर्ण काळा अन् चेहेरा लांबट होता. शरीरयष्टी अगदीच किरकोळ वाटत होती.

' तुझं नांव काय ?' मी विचारलं.

' ईश्वरदास सेवाराम.'

कुंदनलालला ठार मारण्याचा प्रयत्न कां केलास ?' त्याच्या नजरेला-नजर भिडवून मी विचारलं.

'हा माणूस अत्यंत नीच आहे. तो मरायला पाहिजे होता. माझा संसार धुळीला मिळवला त्यानं. माझ्याप्रमाणे अनेकांचे संसार पार

विस्कटले त्यानं. मोहिनी घालून माझ्या पत्नीला वश केलं. चार मुलं आहेत मला. तो चिडून बोलत होता.

' तुझ्या पत्नीला समजायला पाहिजे होतं. चार मुलं असलेल्या बाईनं असं करावं हे पटत नाही, खरं वाटत नाही.'

' खरं आहे हे ! मी माझ्या डोळ्यांनी पाहीलं आहे. मोलमजुरी करून मी पोट भरतो. संगतीने दारु प्यायचं व्यसन जडलं मला. व्यसनापायी पैसा खर्च होऊ लागला. माझी पत्नी रंजना पोरवाल विडी फॅक्टरीत कामाला जाऊ लागली. एक दिवस देशी दारुच्या गुत्त्यावर कुंदललाल भेटला. तिथंच त्याची व माझी पहिली ओळख झाली. आम्ही दोघांनी देशी दारु घेतली. दोघांचं बिल द्यायला माझ्याकडं पुरेसे पैसे नव्हते. कुंदनलालनं बिल चुकवलं. मला हायसं वाटलं. चांगला माणूस भेटल्याचा आनंद झाला. त्याची ओळख झाल्यावर त्याच दारुच्या गुत्त्यावर तो येऊ लागला. एक दिवशी त्यानं सांगितलं, 'चार बर्षापूर्वीच माझी पत्नी मरण पावली आहे. दोन मुलं आहेत. त्यांना मी त्यांच्या मामाकडे ठेवलं आहे. घरी एकटाच असतो. तुझी घरभाडे भरण्याची ताकद नाही. माझ्या घरी येवून रहा, घर भाडं म्हणून एक पैसादेखील मी घेणार नाही.'

मी त्याला म्हणालो, 'तू म्हणतोस ते ठीक आहे पण तुझं घर मला रहायला दिलंस तर तू कुठं राहशील ?'

'तो म्हणाला, 'मी एकटा जीव आहे. व्हरांड्यात आडोसा केला आहे. तिथं झोपत जाईन.'

'त्याचा विचार मला एकदम पसंत पडला. दारु प्यायला पैसे उपयोगात आणता येतील. लग्न होऊन वीस वर्षे होऊन गेली आहेत. माझी पत्नी रंजना ही चार मुलांना घेऊन कुंदनलालच्या घरात राहिली तरी तिच्या नीतीमत्तेत फरक येईल असं वाटण्याजोगं नव्हतं. मी घरी आल्यावर रंजनाला माझा विचार कळवला. ती म्हणाली. 'आपण

महिन्याला पंचवीस रुपये भाडं भरतो आहोत. हे पंचवीस रुपये वाचतील. त्याचं घर पटलं नाही तर दुसरीकडे जाता येईल आपल्याला.'

'दुसऱ्याच दिवशी आम्ही भाड्याचं घर खाली केलं कुंदनलालचं घर दोन खोल्याचं होतं. घरापुढं व्हरांडा होता. व्हरांड्याला आडोसा होता. तिथं बाज टाकून कुंदनची झोपण्याची व्यवस्था होत होती. दोन खोल्यात आम्ही सामान लावलं. सामान तरी आमच्याकडे काय होतं? एक विणलेली बाज, स्वयंपाकाची पाच–सात भांडी, चार ट्रंका असं सामान होतं. कुंदनलाल म्युनिसीपॅलिटीत स्वीपरचं काम करीत होता. सकाळी ६ वा. निघून जात होता कामावर. एका माणसासाठी वेगळा स्वयंपाक कशाला हवा? म्हणून मीच त्याला आमच्या घरी जेवण करण्याचा आग्रह केला. घरचा किराणा, धान्य तो आणून टाकीत होता. व्हरांड्यात त्यानं छोटी खोलीच तट्या लावून करून घेतली होती. हातात पैसा खेळू लागल्यानं दारू पिण्याची माझी संवय वाढू लागली. रात्री दहा, अकरा वाजता मी येत असे. कुंदनलाल व्हरांड्यात झोपलेला असे, बिडी कारखान्यातून ती सायंकाळी सहा वाजता परत येत असे. दारुच्या गुत्त्यावर कुंदनलाल अधून मधून यायचा. तो भेटला की भरपूर दारु प्यायला मिळायची. मला जादा चढलेली असायची. तो मधूनच निघून जायचा. त्याच्या या वागण्याचा मला संशय आला.'

'एके दिवशी मी ठरवलं, रात्री अकरा वाजेपर्यंत गुत्त्यात पडून रहायचं नाही. त्या दिवशी मनाचा निश्चय करून दारू प्यालो नाही. रात्री आठच्या सुमारास घराकडे आलो. व्हरांड्यात पडलेल्या बाजेवरचं अंथरूण रिकामचं पडलं होतं. कुंदनलाल नव्हता. खोलीचा दरवाजा लावलेला होता. दरवाज्याजवळ गेलो. दरवाज्याच्या फटीतून आंत पाहिलं, खोलीतल्या कोपऱ्यात कंदील जळत होता. त्याची वात बारीक केल्यानं मंद प्रकाश खोलीभर पडलेला होता. माझी पत्नी रंजना, चार मुलांची आई, विवस्त्र अवस्थेत कुंदनलालच्या कुशीत विसावली होती. कुंदनलालच्या दोन्ही हातांनी तिच्या कमरेभोवती विळखा घातलेला

होता. तिच्या गोऱ्यापान पाठीवर तिचे केस रुळत होते. त्यांची कुजबुज चालू होती. मी कान देऊन ऐकलं. 'बस्स झालं तुमचं, दूर व्हा बघू. व्हरांड्यात जा' रंजना कुजबुजली. आतून खळखळून हसण्याचा आवाज झाला. 'त्याला काय भितेस. दारू पिऊन पिऊन छातीचं खोकं झालंय त्याच्या. इतक्या लवकर घरी कधी आलाय कां ? पडला असलं दारुच्या गुत्त्यात. परवा तर घरीच आला नव्हता. मीच दारू पाजली होती त्याला.' असं म्हणून त्यानं रंजनाला अधिकच जवळ ओढून घेतलं होतं. दरवाज्यावर जोरानं लाथ मारावी असा विचार मनात आला. बाजेखाली अंथरुणावर माझी चार मुलं शांतपणे झोप घेत होती. कुंदनलाल म्हणत होता ते खरं होतं. दारू पिऊन पिऊन माझ्या छातीचं खोकं झालं होतं. दरवाज्यावर लाथ मारून काय साध्य होणार ? कुंदनलाल माझ्यापेक्षा कितीतरी पटीने ताकतवान होता. मलाच त्यानं मारझोड केली असती. माझ्या चारी मुलांनी कोणता गुन्हा केला होता ? निदान मुलांकडं पाहून तरी तिनं असा व्याभिचार करायला नको होता.' असं म्हणून त्यानं माझ्याकडे पाहिलं. त्याला म्हणायचं होतं, मी कुंदनलाल धडा शिकवला तो बरोबर आहे.

त्याच्या सांगण्यात सत्यता होती यात शंकाच नाही. वयानं पंचेचाळीस वर्षाची असलेली चार मुलांची आई व्यभिचार करीत होती. सत्यसृष्टीत अशी आई असू शकते याचं कटू प्रत्यंतर आलं होतं.

मातेच्या थोरवीचे विचार आले की या कवितेच्या ओळी आठवतात
'आई म्हणोनि कोणी, आईस हाक मारी
स्वामी तिन्ही जगांचा, आईविना भिकारी ।'

क्षणभर स्तब्धता पसरली: मनात याच ओळी येत होत्या. व्यभिचारी रंजनानं 'आई' या पवित्र शब्दाला काळीमा लावला होता.

भानावर येऊन मी ईश्वरदासला म्हणालो, 'हे पाहिल्यावर तू काय केलंस ?'

'कुंदनला धडा शिकवायचं ठरवलं. दारावर लाथ मारण्याचा विचार सोडून दिला. मुलं जागी झाली असती. आपली आई विवस्त्र अवस्थेत कुंदनसोबत प्रणयचेष्ठा करीत होती हे, त्यांना समजलं असतं. एक ना एक दिवस त्यांना समजणारच आहे. रंजनाला मारून चार मुलं पोरकी करणं तितकसं पटलं नाही. तिच्याविषयी घृणा निर्माण झाली. आल्या पावली जड अंत:करणानं परत गेलो. स्टेशनसमोरच्या धर्मशाळेत रात्र घालवली. रात्रभर अंगाची लाही लाही होत होती. सारी रात्र जागून काढली, 'ईश्वरदास बोलत होता. माझं मन दुसरीकडेच भरकटत चाललं होतं. क्षणिक सुखासाठी रंजनानं आपल्या लहान मुलांची पर्वा केली नव्हती. ईश्वरदासनं मुलाकडे पाहून राग आवरला होता. ईश्वरदासनंच आईची जागा भरून काढली होती.

मन एकदा विचारात डुंबून गेलं की परत आपल्या जागेवर येणं कठीण असतं. पतीचा आधारस्तंभ काळानं अकाली झडप घालून नेल्यावरही दु:खानं खचून न जाता आम्हा तिघा लहान भावंडांना आपल्या उबदार पंखाखाली, अनेक आघात सहन करून, निवारा देणारी माझी आई मला आठवली. 'स्वामी तिन्ही जगांचा आईविना भिकारी' या पद्यपंक्ती मनात घोळू लागल्या. माझी आई व रंजना या दोघीत जमीन-अस्मानाचं अंतर भासू लागलं. विचारांचा वेग आवरता घेतला. ईश्वरदासच्या बोलण्याकडे लक्ष्य दिलं.

तो म्हणाला, 'सारी रात्र धर्मशाळेत जागून काढल्यावर, कुंदनच्या घरी राहायचं नाही असं मी ठरवलं. गवळीपुऱ्यात गेलो. पंचवीस रुपयात जागा भाड्यानं मिळाली. सकाळी नऊ वाजता घरी आलो. कुंदनलाल नगरपालिकेच्या कामावर निघून गेला होता. रंजना बिडी कारखान्यात जाण्याचे तयारीत होती. माझ्या नजरेत तिरस्कार भरलेला होता. कपाळावर रेषा उमटल्याचं पाहून ती म्हणाली, 'रात्रभर कुठे होता ?' मी उत्तर देण्याचं टाळलं.

'आज काय झालंय तुम्हाला ?' पुन्हा ती म्हणाली.

'जागा बदलायची आहे. दुसरीकडे जागा पाहून ठेवली आहे. एक क्षणभर देखील या घरात रहायचं नाही. गवळीपुऱ्यात जागा घेतली आहे.' असं म्हणून मी तिच्याकडे पाहिलं. माझा विचार तिला रुचला नसावा. तिच्या कपाळावर आठ्यांचं जाळं पसरलं.

'इतकी घाई कां झाली ? महिन्याला पंचवीस रुपयाची बचत होत असताना जागा बदलायची लहर कां आली आहे ?' तिचं बोलणं मला असंख्य काटे रुतावेत त्या प्रमाणं बोचत होतं. मागचा पुढचा विचार न करता मी तिच्या श्रीमुखात भडकावून दिली. तिला माझ्या अश्या वागण्याची अपेक्षा नव्हती. थोबाडात चापट बसल्यानं ती गडबडून गेली. रडण्यास सुरुवात केली. मुलं शाळेत गेली होती.

'सामान आवर अगोदर नाहीतर परिणाम चांगला होणार नाही' असं मी निक्षून सांगितल्यावर तिनं घरातल्या सामानाची आवराअवर केली. सायकल–रिक्षा बोलावून नवीन जागेत सामान नेवून लावलं. कुंदनच्या घराला कुलूप लावून शेजाऱ्याकडे किल्ली ठेवली. जागा बदल्यावर रंजनाच्या वागणुकीत बदल होईल असं वाटलं होतं. ही आशा फोल ठरली. कुंदनलालकडे तिचा जबरदस्त ओढा होता. रात्रीचा समय होताच, ती कुंदनला भेटायला जायची. भरल्यागत तिची अवस्था व्हायची. त्याला भेटण्यासाठी ती बेचैन व्हायची. लग्न झाल्यानंतर वीस वर्षात तिनं असले थेर केले नव्हते. कुंदनलालला मोहिनी विद्या अवगत असल्याचं मला समजलं. त्याची पत्नी मरण पावल्यावर त्यानं मोहिनी विद्येचा प्रयोग एक, दोन स्त्रियांवर केल्याचं कांही जणानी सांगितलं. दूध पिताना मांजर डोळे मिटून घेतं. दूध पिताना आपल्याला कोणी पहात असेल याची जाण त्याला येत नाही. रंजना आणि कुंदनलाल यांचे अनैतिक संबंध चव्हाट्यावर आले. लोकांना तोंड दाखवायला मला लाज वाटू लागली. अशोक नगरातले माझे मित्र बाबूराव बोरकर, रामरतन, मधूकर टेलर, रामदास, गणपत, नारायणदास, यांना मी कुंदनलाल व रंजना यांच्या प्रकरणाची माहिती दिली. आम्ही त्याला

ठार मारण्याचा घाट रचला. नीच कुंदनलाल मरायला पाहिजे होता. पुढं काय घडून आलं हे आपणास माहीत आहे.' असं म्हणत असताना त्याच्या दोन्ही गालावरून अश्रू ओघळले.

'ईश्वरदास, तू कायदा हातात घ्यायला नको होतास. तुला प्राय-श्चित्त भोगावं लागेल' मी म्हणालो.

'मोहिनी विद्येवर आपला विश्वास बसणं शक्य नाही. या विद्येला कायद्यात स्थान नाही हे मला माहीत आहे. कायद्यानं मी दोषी आहे. प्रायश्चित्त भोगायच्या तयारीनंच आम्ही त्याचा खून करण्याचं ठर-वलं होतं.'

कुंदनलालचा खून करण्याचा प्रयत्न ईश्वरदासनं कां केला हे मी त्याच्याच तोंडून ऐकलं. मोहिनी विद्येचा प्रश्न उपस्थित झाला होता. भारतीय दंड संहितेत अथवा इतर कोणत्याही कायद्यात अशा विद्येच्या वापराविरुद्ध तरतूद करण्यात आलेली नाही. मोहिनी विद्येनं कुणालाही वश करता आलं तर शाळा, कॉलेजे ओस पडतील. अप्रतीम सौंदर्यशाली स्त्रियांवर असे प्रयोग करून त्यांना वश करण्यासाठी मोहिनीविद्या आत्म-सात करण्यासाठी शाळा – कॉलेजात न जाता, या विद्येचा अभ्यास करतील. सामर्थ्यशाली मनावर मोहिनी विद्या चालणं शक्य नाही. रंजनावर मोहिनी विद्येचा असर झाला असावा असं ईश्वरदासच्या बोल-ण्यात आलं होतं. एक तर ती कुंदनलालच्या संपर्कात आली. व्यसनी पती तिचं समाधान ते काय करणार ? हातभट्टीची दारु पिऊन खिळ-खिळं झालेलं त्याचं शरीर पाहून तिच्या मनात घृणा उत्पन्न झाली असावी. ईश्वरदासची आर्थिक स्थिती हलाखीची होती. संसारात त्याचं लक्ष्यच नव्हतं. घरात किराणा वस्तू तसंच धान्य आणून द्यायचा, तो कुंदनलालच. तीच त्याची मोहिनी विद्या होती.

ईश्वरदासचं म्हणणं ऐकून घेतल्यावर मी त्याला पुन्हा लॉकअप मध्ये बंद केलं.

या गुन्ह्याची हकीगत दिनांक २५–१–१९७६ साली घडली आहे. त्यावेळी मी कामठी पोलीस स्टेशनला पोलीस निरीक्षक म्हणून नेमणुकीस होतो. नागपूर पासून दहा किलोमिटर अंतरावर हे गाव असल्यानं; नागपूर शहराचा भाग असल्यासारखा आहे. मिलीटरी कँपमुळे या गावाला महत्त्व आलेलं आहे. रात्रीचा साडेसात वाजण्याचा सुमार झाला असावा. पोलीस ठाण्यातल्या कामाचं स्वरुप वेगळं आहे. सकाळी साडे-दहा वाजता सुरू होणारी ऑफिसेस सायंकाळी पाच वाजेपर्यंत चालू असतात. पाचनंतर मात्र ऑफिसेस सुटलेली असतात. ऑफिस सुटल्या-वर त्यात काम करणाऱ्यांच्या मनावरचं दडपण दूर झालेलं असतं. त्यातले कोणी मोकळ्या हवेत फेरफटका मारायला जातात, तर कोणी चौकातल्या पानपट्टीच्या दुकानावर घुटमळत असतात. शाळा–कॉलेजेही सुटलेली असतात. हॉटेलमधून सिनेसंगिताच्या रेकार्ड लावल्यानं सिनेमा-संगीत ऐकू येत असतं. बाजारातील रस्ते गजबजून गेलेले दिसतात. पोलीस स्टेशनमध्ये या वेळेला वेगळंच वातावरण असतं. रात्रीची साडे-साताची वेळ महत्वाची असते. या वेळेला 'पीक अवर्स' असं म्हणता येईल. टेबलावरील फोन क्रिंगऽड्क्रिंग असा आवाज करीत असतो. बाहे-रुन कॉलस् येत असतात.

रिसीव्हर उचलला की ऐकू येतं, 'कोण बोलतय ?'

'मी पोलीस स्टेशन ऑफिसर बोलतोय. आपण कोण ?'

'मी कमल टॉकीजचा मॅनेजर बोलतोय. गवळीपुऱ्यातले काही गुंड तिकीट न काढताच डोअरकीपरला धक्के देऊन थिएटरमध्ये घुसले आहेत. कारवाई झाली पाहिजे'.

'कोण, मॅनेजर साहेब बोलताय,. बन्दोबस्त करीत आहे. दोन कॉन्स्टेबलस् पाठवित आहे.' असं म्हणून क्रेडलवर रिसीव्हर ठेवताच पुन्हा घंटी वाजते. रिसीव्हर कानाला लावला जातो.'

'कोण बोलतंय ?'

'मी प्रेमलाल अग्रवाल बोलतोय. लालाओळीत दोन माणसात झगडा चालू आहे. बहुतेक ते दारुच्या नशेत असावेत. शिपाई पाठवून द्या.'

'लालाओळीत मी दोन शिपाई पाठवित आहे. मारामारी करणाऱ्यांना पोलीस ठाण्यात घेऊन येतील ते' असे म्हणून रिसीव्हर खाली ठेवला.

'पिक अवर्स' असल्यामुळे या ना त्या कारणावरून रिपोर्ट देण्यासाठी माणसं येत असतात. अशा वेळी पोलीस स्टेशनमध्ये हजर असावं लागतं.

फोनची घंटी वाजल्यानं रिसीव्हर उचलून कानाला लावला. मी म्हणालो, 'पोलीस इन्सपेक्टर कामठी बोलतोय,'
तिकडून आवाज आला. 'मी डॉक्टर सेनगुप्ता बोलतोय.'
'गुडऽइवीनींग, काय खबर आहे डॉक्टर ?'

'स्टॅबिंगची केस अॅडमिट झाली आहे. पोटावर जखम आहे. या जखमेतून नऊ इंच लांबीची आतडी बाहेर आली आहेत. केस सिरीयस असल्यानं नागपूरला घेऊन जावं लागेल. पोलीस केस असल्यानं मी खबर दिली आहे.' डॉक्टर सेनगुप्ता म्हणाले.

'डॉक्टरसाहेब, मी दवाखान्यात येत आहे. फर्स्टएड चालू ठेवा. अॅडमिट झालेल्या पेशन्टच नांव काय ?'

'अॅडमिट झालेला इसम बेशुद्ध अवस्थेत आहे. त्याच्याबरोबर त्याला आणून भरती करणारी बाई त्याचं नांव कुंदनलाल असल्याचं सांगते आहे. अॅम्ब्युलन्स मी तयार ठेवली आहे. त्याला मेयो हॉस्पीटलला लवकर पाठवलं तर तो जगण्याची शक्यता आहे.'

'ठीक आहे ! मी स्वतः कारवाई करतो आहे. निघालोच मी, 'असं म्हणून मी रिसीव्हर ठेवला.

नऊ इंच आतडी बाहेर आलेली सिरीयस केस जगेल असं मला

वाटत नव्हतं. कामठीच्या मेडिकल ऑफीसरने स्टॅबिंग केसची खबर दिल्याची इन्ट्री घेतली. कुंदनलाल हा बेशुद्ध असल्यामुळे त्याचे पोटावर कोणी चाकू मारला हे समजल नव्हतं. ठाण्यात हजर असलेले पोलीस हेड कॉन्स्टेबल व कॉन्स्टेबल यांना बरोबर घेऊन पोलीस जीपने दवाखान्यात येऊन थडकलो. कुंदनलालचा मरणापुर्वीचा जबाब मला घ्यायचा होता. डॉक्टर सेनगुप्ता यांना मी विचारलं, 'कुंदनलाल याला काही प्रश्न विचारायचे आहेत.'

'तो बेहोश असल्यामुळं त्याला विचारपूस करता येणार नाही. चला त्याला पाहून घ्या.' असं म्हणून डॉक्टर जागचे उठले. त्यांचेबरोबर मी ड्रेसिंग हॉलध्ये प्रवेश केला. ड्रेसिंग हॉलमधल्या टेबलावर कुंदनलाल याला झोपवण्यात आलं होतं. त्याचे कपडे रक्तानं लाल झालेले होते. त्याचं पोट फाडून, फूटबॉलमध्ये हवा भरतांना कव्हरच्या फाटक्या जागे-तून आतल्या ब्लॅटरचा फुगा बाहेर येतो, त्याप्रमाणं कुंदनलालची आतडी बाहेर आलेली होती. त्याच्या पायजम्यावरही जखमेतलं रक्त ओघळून रक्ताचे डाग पडलेले होते. मेयो हॉस्पीटलमध्ये त्याला हालवणं आगत्याचं होतं.

डॉक्टरला मी म्हणालो, 'ॲम्ब्युलन्समध्ये टाका याला. याच्याबरोबर आमचे दोन कॉन्स्टेबल मेयो हॉस्पीटलला जातील.'

डॉक्टर सेनगुप्ता यांनी वेगाने हालचाली केल्या. कुंदनलालला स्ट्रेचर-वर टाकून ॲम्ब्युलन्स मध्ये ही स्ट्रेचर ठेवण्यात आली. त्यानंतर त्याला दवाखान्यात घेऊन येणारी बाई बसली. नागपूरच्या दिशेनं ॲम्ब्युलन्स निघून गेली. कुंदनलालला दवाखान्यात आणलं गेलं त्यावेळी तेथे माणसं जमलेली होती. त्यांनी मला कुंदनलालचं घर अशोकनगर मध्ये असून तेथे त्याला भोसकण्यात आलं. ही माहिती दिली.

भारतीय दंड विधान धारा ३०७ प्रमाणे कुंदनलालचा खून कर-ण्याचा प्रयत्न केल्याचा आरोप ईश्वरदासवर होता. ॲम्ब्यूलन्स निघून

गेल्यावर मी पोलीस स्टेशनला परत आलो. गुन्ह्याची नोंद रेकॉर्डला घ्यायची होती. ईश्वरदासनं व त्याच्या साथीदारांनी कलम ३०७, १४७, १४८, १४९. ४५२, ३२३ प्रमाणे गुन्हा केल्याची नोंद घेतली.

ईश्वरदासनं व त्याच्या साथीदारानी कायदा हातात घेतला होता. त्याच्या विरुद्ध पूरावा गोळा करायला सुरवात केली. कुंदनलालला दवाखान्यात भरती करताना अशोक नगरची कांही माणसं आली होती. त्याना मी विचारल ' तुमच्या पैकी हा प्रकार कोणी पाहीला आहे कां ? ज्यानं पाहीला असेल त्यानं पुढं याव. ' त्याच्यातून एक जण पुढं आला आणि म्हणाला, ' मी हा प्रकार पाहिला आहे. '

' आपलं नांव काय ? ' मी विचारलं.

' माझं नांव किसन खंडारे, अशोक नगरात कुंदनच्या घरा जवळ रहातो. '

' काय पाहीलं असेल ते सांगा, ' मी म्हणालो.

' मोल मजूरीचं काम करतो. दिवसभर काम करून घरी परत आलो होतो. सायंकाळची वेळ होती. जेवण करून विश्रांती घ्यायचा विचार होता. ताट वाढून आलं. जेवण करायला बसलो होतो. दोन घास खाल्ले असतील नसतील इतक्यात धांवा ! धांवा ! असा कोणीतरी ओरडल्याचा आवाज कानी पडला. जेवणाचं ताट तसंच ठेवून मी ऊठू लागलो. लक्ष्मी म्हणाली, ' जेवत्या ताटावरून उठून बाहेर जाऊ नका. दारूच्या धुंदीत कुणीतरी ओरडलं असेल. नेहमीचंच आहे हे. ' बाहेरून आवाज येतच होता. मी जेवत्या ताटावरून उठलो. हात धुवून बाहेर आलो. कुंदनलालच्या घरासमोर आठ, दहा माणसं जमलेली दिसली. त्याच्या घरा समोर इलेक्ट्रीकचा खांब आहे. लाईट जळत होता. लाईटच्या प्रकाशात ही माणसं कुंदनलालला मारहाण करीत असल्याचं दिसलं. कोण असावीत ती माणसं ? मी थोडा पुढे गेलो. मधूकर टेलर (२) रामदास (३) गणपत पांडुरंग (४) रामरतन (५) नारायणदास दामा (६) बाबुराव बोरकर (७) वसंत सुका (८) देवीदास रामा (९) भीमराव पोहोरे (१०) रंजनाचा पती ईश्वरदास

या सर्वांना मी ओळखलं. कुंदनला घराबाहेर फरफडत बाहेर आणीत असताना धावा ! धावा ! असं रंजना ओरडत होती. त्यांच्यापैकी कांहीच्या हातात लाठ्या होत्या तर कांहीच्या हातात अवजारं होती. कुंदनला घरासमोर ओढीत आणल्यावर त्यानी मारहाण करण्यास सुरवात केली. ' मरे रे बाप,! मरे रे बाप! ' असं तो ओरडू लागला. अशोक नगरातील बरीच मंडळी जमली पण सोडवा सोडवी करायची हिम्मत कोणाची होईना कारण त्यांच्या हातात लाठ्या, चाकू अशी हत्यारं होती. आपल्या डोळ्या देखत मारहाण चाललेली पाहून मला वाईट वाटलं त्यांच्या तावडीतून कुंदनला सोडवायाचं मी मनात ठरवलं ' काय चालवलंय ? सोडा त्याला, ' असं म्हणत मी पुढे गेलो. मी जवळ येत आहे हे पाहून मधूकर टेलर म्हणाला, ' कोई बीच में आया तो मार डालेंगे. ' मधूकर टेलरच्या हातात चाकू होता. आणखी पुढं जायचं धाडस झालं नाही. कुंदनचं ओरडणं ऐकून अशोक नगरातले लोक काय चाललंय हे पहायला जमू लागले. मधूकर टेलर, नारायण, रामदास यानी कुंदनला मागील बाजूनं जावून धरून ठेवलं. बाबुराव बोरकर हा कुंदनच्या समोर होता. क्लीक असा आवाज झाला. रामपुरी चाकूचं पातं बाहेर आलं. बाबुरावनं हात वर करून कुंदनच्या पोटावर चाकू मारला. पोटावर वार होताच कुंदनचं ओरडणं बंद झालं. त्या सरशी ज्यानी कुंदनला पकडून ठेवलं होतं, त्यानी पकड ढिली केली. ' धप् ' असा आवाज झाला. कुंदन जमीनीवर कोसळला होता. रंजनाबाई धावत आली, कुंदनच्या अंगावर ओणवी झाली. तिलाही मारहाण करायला त्यानी सुरवात केली. ती त्या मारानं बाजूला जाऊन पडली. लोक चारी बाजूनी जमा होत होते. कुणी तरी म्हणालं, ' पहाता काय पकडा त्यांना. ' आता आपली धडगत नाही असं पाहून त्यानी पळण्यास सुरुवात केली. मधूकर टेलर जमावाच्या हाती लागला. लोकानी त्याला चांगला चोप देऊन इलेक्ट्रीकच्या खांबाला बांधून ठेवला आहे. लोकानी त्याचं तोंड फुटे पर्यंत मारलं आहे. बाकीचे सर्व जण पळून गेले आहेत. अशोक नगरला चला.'

किसन खंडारे यांची जबानी घेतल्यावर निळया रंगाच्या लाईट व्हॅन मधून मी अशोक नगरात स्टाफसह गेलो. शेकडो लोक त्या ठिकाणी जमा झाले होते. कबूतरांचा थवा उडून जावा तशी जमलेली माणसं पोलीस व्हॅन आलेली पहाताच पांगू लागली. मधूकर टेलरला दोरखंडानं बांधून ठेवलं होतं. त्याच्या अंगावरही ठिकठिकाणी मार लागलेला होता. मधूकरला मोकळे करण्यात आले. 'प्रथम त्याची झडती घ्या,' असं मी सुचविताच ह्याची झडती घेण्यात आली. त्याच्या पँटच्या उजव्या बाजू कडील खिशात खटक्याचा रामपुरी चाकु मिळाला. तो चाकू जप्त करून ताब्यात घेण्यात आला. 'त्याच्या तोंडाचा दारु प्याल्याचा वास येतोय' एक कॉन्स्टेबल म्हणाला. 'त्याच्या हातात हातकडी घाला व त्याला दवाखान्यात न्या.' असं मी म्हणाली. त्याच्या अंगावरील पांढऱ्या शर्टावर रक्ताचे लाल डाग उठून दिसत होते. पायजाम्या वरही रक्ताचे डाग दिसले. त्याचे दोन्ही हात रक्ताने माखले गेले होते.

'दयाराम, त्याचे रक्ताचे डाग असलेले कपडे जप्त करा' मी हेड्कॉन्टेबल दयारामला सांगितले. लोकानी त्याना पकडून ठेवलं नसते तर त्यानं रंजना बाईस भोसकलं असतं तसच तो पळून गेला असता. त्याचे रक्तानं भरलेले कपडे जप्त करण्यात आले. त्याला अटक करून त्याची पोलीस कस्टडीत रवानगी करण्यात आली. त्याच्या अंगात चालण्या इतके देखील त्राण राहीले नव्हते.

'दयाराम, त्याला दवाखान्यात नेवून औषधोपचार करा. पोलीस गाडी-तून न्या त्याला,' मी म्हणालो. त्याला पोलीस व्हॅन मधून पाठविण्यात आले.

·

लाईटच्या खांबा पासून कुंदनचं घर जवळज होते. ईश्वरदासनं त्याच्या नऊ साथीदारानी घरात घुसून त्याला मारहाण करीत बाहेर काढलं होतं. त्याच्या घरात गेल्याची साक्ष त्याच्या घरातली परिस्थितीच देणार होती. त्याच्या घराच्या भिती खुज्या होत्या. घराचा दरवाजा इतका अरुंद होता कीं एका वेळी फक्त एक माणूस आत जाऊ शकेल. घरात प्रवेश करताना खाली वाकून आंत जावं लागलं. दरवाज्याची

ऊंची पांच, साडेपांच फुटाची असावी. खोलीत अंधार होता. समोरचं कांही दिसत नव्हतं. शेजारच्या घरातनं कंदील मागवून घेतला. अशोक नगरातल्या वस्तीतील बहुतेक घरातून मिणमिणत्या चिमण्या आणि कंदील जळत असताना दिसत होते. घरा जवळ इलेक्ट्रीक लाईट होता पण घरात इलेक्ट्रीक लाईन घेण्याची ऐपत नव्हती त्यांची. कुंदनच्या घरा सारखीच खुजी घरं दिसत होती. या वस्तीतली परिस्थीती लक्षात यायला वेळ लागला नाही. डोके भणाणून गेलं. मूलभूत हक्कांना ही माणसं पारखी झालेली होती. ' नरेची केला हीन किती नर ' या काव्य पंक्तीची आठवण आली.

शेजारचा कंदील घेऊन घरात आल्यावर घरातलं सामान विखरुन गेल्याचं दिसलं फुटलेल्या कंदीलाच्या काचा खोलीभर पसरल्या होत्या, रॉकिल तेल जमिनीवर सांडलं होतं, भाताचं चुलीवरल भांडं उपडं होऊन भाताची शितं आजूबाजूला पडली होती.
हिरव्या बांगडयांचे तुकडे मिळाले, एक काठी पडलेली मिळाली ही काठी मारणाराच्या हातातून निसटून पडली असावी. खोलीतील एका कोनाडयात काली देवीचा फोटो होता. फोटो समोर अगरबत्तीचं स्टॅण्ड ठेवलेलं दिसलं. संघर्षाच्या निशाण्या स्पष्ट दिसत होत्या. घटना स्थळाचा पंचनामा केला. पंचनामा केला म्हणजे तरी काय केलं? खोलीतील परिस्थीती जशी दिसली त्याचे वर्णन लिहून घेतलं.

अशोक नगरातील लोकाकडे विचारपूस करून त्याचं टिप्पण तयार केलं. लोक आपण होऊन पुढं येत होते. त्यानी जे पाहीलं ते सांगत होते. सधन वस्तीचा अनुभव वेगळाच आला आहे. एकाच आळीत रहाणारांचा एकमेकाशी परीचय नसतो. अश्या वस्तीत गुन्हा झालाच तर साक्षीदार मिळणं कठीण जातं. आपला अमोल वेळ खर्च करायला कुणाची तयारी नसते. माणुसकी भेटली ती याचं वस्तीत. मध्यरात्र होईपर्यंत हिंडत होतो मी या वस्तीत, रंजना व कुंदन यांचे अनैतिक संबंध होते या गोष्टीला भरपूर पूरावा मिळाला होता. मधूकर टेलर शिवाय बाकीचे

आरोपी फरार झाले होते. त्यांचा शोध घेण्याचं काम माझ्या स्टाफनी केलं. त्यांच्या पैकी एकजणही हाती सापडला नाही. फरारी आरोपींना पकडून हजर करा अश्या सूचना मी दिल्या. चाकू जवळ बाळगलेल्या मधूकरला पकडून ठवण्यात लोकांनी धैर्य दाखविल होतं. मध्य रात्री नंतर मी घरी गेलो.

दुसऱ्या दिवशी सकाळी दहा वाजता मी पोलीस टेस्शन मधे आलो. ' मेयो हॉस्पीटल मधून फोन आला होता काय ? ' अशी मी चौकशी केली. नऊ इंच लांब आतडी पोटा बाहेर आलेला कुंदन गचकला असावा असं मला वाटलं होतं. ' मेयो हॉस्पीटल मधून कुणाचाही फोन आलेला नाही, ' असं मला उत्तर मिळालं. कुंदन जिवंत होता. तो मरण पावला असता तर मेयो हॉस्पीटल मधून फोन आला असता. कुंदनचा मरणा-पूर्वीचा जबाब घेण्यासाठी नागपूरला जायचं ठरवलं. तो शुध्दीवर आला असल्यास त्याचा जबाब घेणं केसच्या पुराव्याच्या दृष्टीनं महत्वाचं होतं. कुंदन सोबत अँम्बुलन्ल मधे गेलेली बाई रंजना असल्याचं समजलं होतं तिलाही गुन्हाची हकीगत माहीत होती. मी पोलीस जीपनं मेयो हॉस्पीटलला आलो.

' कुंदनलाल कोणत्या बेड नंबरवर आहे, ' मी सिस्टरला विचारलं.

' त्याला ऑपरेशन थिएटर मधे नेलं आहे, ' सिस्टरनं सांगितलं.

मी ऑपरेशन थिएटरकडे वळलो. ऑपरेशन थिएटरच्या बाहेर कुंदनच्या सोबत अँम्बुलन्स मधे गेलेली रंजना दिसली. मळकट झाले फिलंक्कट हिरव्या कलरचं लुगड नेसलं होतं. वयानं ती पंचेचाळीस वर्षाची असावी. चेहेरा सुरकुल्या सारखा असला तरी तिच्या गौरवर्णामुळं ती चार बायकात उठून दिसण्या सारखी होती. तिचा चेहेरा चिंतामग्न दिसत होता. पोटची मुलं आणि पतिला सोडून देऊन ती कुंदन साठी चिंतामग्न झाली होती.

मला पाहून ती म्हणाली, ' ऑपरेशन चालू आहे आंत. ईश्वरानं त्याला यातून सही सलामत बाहेर काढाव. ' कुंदनच्या प्राणाची भीक ती ईश्वराजवळ मागत होती. स्त्रीयाचं चारित्र आणि पुरुषांचं भाग्य देवालाही जाणता येत नाही असं म्हणतात.

तीला धीर द्यायचा म्हणून मी बोललो, ' काळजी करू नका ऑपरेशन चाललंच आहे. ठीक होईल, मला कुंदनकडे विचारपूस करायची होती. वेटींग रूममध्ये थांबतो, ' असं म्हणून मी वेटींग रूमकडे गेलो. थोड्या वेळानं ऑपरेशन यशस्वी झाल्याचं समजलं. मी ऑपरेशन थिएटरकडे गेलो. कुंदनला स्ट्रेचरवर टाकून वॉर्डाकडे नेण्यात येत होतं. स्ट्रेचरच्या मागोमाग रंजनाबाई चालली होती. कुंदन अजून शुद्धीवर आला नव्हता. रंजनाबाईकडे तरी विचारपूस करावी म्हणून मी तिला बोलावून घेतलं. तिचा चेहरा फिका पडला होता अंगात कांही त्राण नव्हते.

' रंजनाबाई तुम्ही कांही सांगाल तर बरे होईल. मधूकरला पकडण्यात आलं आहे, ' मी म्हणालो.

' तुम्ही पहाताच आहात माझी स्थिती कालपासून पोटात अन्नाचा कण देखील गेलेला नाही. कामठीहून अॅम्ब्यूलन्स निघाली तेव्हा मी कुंदन सोबत आले. जवळ एक पैसा देखील नाही' ' असं म्हणून ती माझ्याकडे आशाळभूतपणे पाहू लागली. माझ्या मदतीची ती अपेक्षा करीत होती. तुम्ही तरी मला खायला द्या असंच तिला म्हणायचं होतं.

माझ्याबरोवर असलेल्या कॉन्सटेबलजवळ मी पाचाची नोट दिली. त्याला म्हणालो, ' रंजनाबाई कालपासून उपाशी आहे. तिला समोरच्या हॉटेलात जाऊन जेवू घाल. '

' होय साहेब ! ' असं म्हणून तो रंजनास घेऊन गेला.

जेवण करून परत आल्यावर मी तिला विचारलं. ' तुमचा विवाह होऊन किती वर्षे झाली. '

' वीस वर्षे, ' तिनं उत्तर दिलं

' कुंदन बरोबर रहात आहात काय ? '

' या घटनेच्या चार दिवस अगोदर मी कुंदनच्या घरीच रहायला आले. मुलं ईश्वरदासकडेच ठेवली आहेत.

' मला तुमच्या खाजगी बाबीसंबंधी यापेक्षा अधिक विचारायचं नाहीं. या घटने संबधानं विचारायचं आहे, ' मी म्हणालो.

' काल सायंकाळी साडेसात, आठ वाजण्याचे सुमारास स्वयंपाकाची

तयारी करीत होते. चुलीवर भाताचं भांडं चढवलं होतं. कुंदनलाल घरीच होता. काली देवीच्या फोटोसमोर अगरबत्ती लावीत होता. दरवाजा आतून बंद होता. दरवाज्यावर थाप दिल्याचा आवाज आला. मी आतूनच विचारलं, ' कोण आहे ? '

' मी ईश्वरदास आहे ' ईश्वरदास आल्याचं पाहून मी दचकलेच. दरवाजा न उघडताच मी विचारलं, ' कां आलात ? '

' सिंधूची तब्बेत बिघडली आहे. तिला दवाखान्यात नेलं आहे. आई ! आई ! असं ती तापात बडबड करीत आहे. ' माझी मुलगी आजारी असल्याचं एकून मी दरवाज्याची कडी काढून दरवाजा उघडला. दरवाजा उघडताच ईश्वरदासनं माझ्या डोकीवर काठीचा तडाखा दिला. मी बाजूला जावून पडले. ईश्वरदासच्या मागोमाग मधूकर, रामदास, गणपत, बाबू बोरकर, रामरतन, नारायणदास, वसंता, देवीदास, भीमराव पोहोरे असे धुसले. त्यानी कुंदनला मारीत मारीत ओढून बाहेर नेलं. घरातला कंदील फुटून गेला. ' अशी या घटनेची हकीगत सांगू लागली. या घटनेचा राहीलेला भाग तिनं किसन खंडारेच्या जबानी प्रमाणं सांगीतला. तिनं सांगितलेली जबानी मी लिहून घेतली. कुंदन हा जबानी देण्यांच्या स्थितीत नव्हता म्हणून मी परत कामठीला आलो. या गुन्ह्यातले सर्व आरोपी पकडण्यात आले. जखमी कुंदनाची जबानी घ्यायची होती म्हणून मी दोन दिवसानंतर पुन्हा मेयो हॉस्पीटलला आलो.

वार्ड नं. ४ मध्ये त्याला ठेवण्यात आलं होतं. डॉक्टरला भेटून कुंदन हा जबानी देण्याचे परिस्थीतीत आहे काय याची चौकशी केली. कुंदनलाल शुद्धीवर आला होता. त्याच्या कॉटजवळ मी गेलो, तो शांतपणे झोपलेला होता. रंजना त्याच्या कॉटजवळ बसलेली होती. मला पहाताच ती उठून उभी राहीली. ती म्हणाली, ' बराच वेळ झाला झोपला आहे. उठेलच आता. आपण थांबावं ' असं म्हणून तिनं तिथला स्टूल पुढे सरकवला मी त्यावर बसलो. आमच बोलणं ऐकून तो जागा झाला.

' प्रकृती कशी काय आहे, ' मी विचारलं.

'आपण अॅम्ब्यूलन्सनं लगेच पाठवलं म्हणून मी जगलो,' त्याच्या बोलण्यात कृतज्ञता होती.

'आतडी बाहेर आल्यावरही आपण घाबरून गेला नाही. त्यामुळं शॉक लागला नाही.'

'शॉक लागणं शक्य नाही कारण मला प्राणायामाची सवय आहे. त्राटक क्रियाही करू शकतो.'

'त्राटक क्रिया करता म्हणजे काय असतं ?' मी प्रश्न केला.

'माझ्या डोळ्याकडे तुम्ही पहा,' असं म्हणून त्यानं डोळे उघडे ठेवले. एकटक तो वर पहात होता. त्याच्या पापण्या लवत नव्हत्या. डोळ्यातून पाणीही येत नव्हतं त्याच्या. दहा मिनिटे तो त्याच अवस्थेत होता. पूर्वस्थितीत आल्यावर तो म्हणाला, 'यालाच त्राटक म्हणतात.' हा माणूस चमत्कारिक वाटला. दहा मिनिटे पापण्यांची उघडझाप न करता एकटक पाहू लागलो तर आपल्या डोळ्यातून पाणी येतं. पण त्याच्या डोळ्यातून पाण्याचा थेंबदेखील आला नव्हता. प्रेतासारखा निश्चल राहिला होता तो. त्याच्या या साधनेविषयी मला खोलात शिरायचं नव्हतं. रंजनाबाईनं दिलेल्या जबानीप्रमाणं त्यानं घटनेची माहिती दिली. त्याला ज्या आरोपींची नावं माहीत होती ती त्यानं सांगितली. त्याची जबानी घेऊन मी कामठीस परत गेलो.

कुंदनच्या घराजवळ असलेल्या त्याच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांनी झालेला प्रकार वर्णन करून सांगितला होता. या केसच्या तपासात भक्कम पुरावा जमा करण्यात आला होता तसा काही धागादोरा हाती नसताना चातुर्यानं तपास करून आरोपी शोधून काढले होते असं नाही. सत्य-सृष्टीत, 'स्वामी तिन्ही जगाचा आई विना भिकारी,' या मातेच्या महतीला धक्का देणारी, खोटं ठरविणारी आई दिसून आली, 'मोठ्या शिताफीनं' हा शब्द खऱ्या अर्थानं उपयोगात आणण्यासारखं विशेष असं तपासातलं कसब यात नसेल पण विस्मयजनक वाटणाऱ्या बाबी प्रत्यक्षात दिसून आल्या. जीवनातले अनेक पैलू अवगत झाले.

या गुन्ह्याचा तपास पूर्ण केला. ज्यांनी कायदा हातात घेतला त्यांना न्यायालयासमोर हजर करायचं होतं. दोषारोप पत्र दिनांक १०–३–१९७६ रोजी यातील दहा आरोपींवर न्यायदंडाधिकारी वर्ग १ कोर्ट नंबर ९, नागपूर या कोर्टात सादर करण्यात आले. या कोर्टाने हा गंभीर स्वरूपाचा गुन्हा असल्याने कमिट करून सेशन्स कोर्टात पाठवला. एकदा तपास होऊन कोर्टात दोषारोपपत्र रवाना केलं की त्या केस-बद्दलचा संबंध रहात नाही.

दोषारोप पत्र रवाना केल्यावर काही दिवसांनी कुंदन ठाण्यात आला. त्याची प्रकृती सुधारली होती. तो म्हणाला, 'रंजनाबाईनं ईश्वरदासचं घर सोडल्यापासून ती माझ्याकडे राहू लागली होती. पोरवाल बिडी फॅक्टरीतून घरी येत असताना ईश्वरदास ऑटो रिक्षातून आला. रंजनास जबरदस्तीने ऑटो रिक्षात घालून तिला घेऊन गेला आहे. ईश्वरदासच्या घरी पाहिलं पण तेथे दोघेही आले नाहीत. रंजना-बाईचा शोध आपण घ्यावा तसंच ईश्वरदासवर कारवाई करावी.' रंजनाबाई जशी आपलीच मालमत्ता आहे अशा थाटात तो बोलत होता.

'ईश्वरदास रंजनाबाईचा पती आहे. दोघांनी अजून डायव्होर्स घेतलेला नाही. पत्नीला घेऊन जाणं हा गुन्ह्याचा प्रकार होत नाही. तरीपण रंजनाबाईचं रक्षण करणं माझी जबाबदारी आहे. मी या प्रकरणाची चौकशी करतो. आपण तसा अर्ज लिहून द्या.'

कुंदनने अर्ज लिहून दिला. न जाणो रंजनाबाईचं काही बरंवाईट तो करेल म्हणून त्याच्या मागावर स्टाफ पाठवून दिला.

पोलीस उपनिरीक्षक जाधव ठाण्यात हजर होते. त्यांना मी बोलावून सांगितलं, 'ईश्वरदास ऑटोरिक्षातून त्याची पत्नी रंजना हिला घेऊन गेला आहे. तो कोठे गेला समजलं नाही. रंजनाच्या जीवाचं बरंवाईट होण्याची शक्यता नाकारता येणार नाही. तरी तिचा शोध लावा तिची इच्छा पतीजवळ रहायचं अशी असेल तर आम्हा पोलिसांना काहीच करता येणार नाही. ईश्वरदासला त्याची पत्नी रंजना व कुंदन यांचे

अनैतिक संबंध असल्याचं माहीत आहे. तुम्ही या प्रकरणाची चौकशी करून मला रिपोर्ट द्या.'

पो. सब-इन्स्पेक्टर जाधव हे या प्रकरणाची चौकशी करण्यास रवाना झाले.

पो. सब-इन्स्पेक्टर जाधव यानी रंजनाबाईचा शोध लावला. ईश्वरदासनं तिला डुमरी खेड्यात नेऊन ठेवलं होतं.

पोलीस सब-इन्स्पेक्टर जाधव यांनी रंजनाबाईस माझ्यासमोर उभं केलं. ती कुंदनकडे की आपला पती ईश्वरदासकडे रहायला तयार आहे हे मी रंजनाबाईस विचारलं, 'ईश्वरदासकडे तू स्वतःहोऊन गेली होतीस काय ?'

'नाही. मला ईश्वरदासनं जबरदस्तीनं ऑटोरिक्षात टाकलं व त्याच्या नातेवाईकाकडे डुमरी येथे ठेवलं होतं.'

'तू कोणाबरोबर राहू इच्छितेस ईश्वरदासकडे तुझी चारही मुलं आहेत ' असं म्हणून मी तिच्याकडे पाहू लागलो. ती काय उत्तर देणार आहे याची जिज्ञासा लागून गेली होती. तिची मुलं ईश्वरदासकडे आहेत याची जाणीव मी दिली होती.

'मला कुंदनलालकडे रहायचं आहे त्याच्याकडे मी जाणार. मला रोकण्याचा प्रयत्न कुणी करू नये.' तिचं हे बोलणं ऐकून आश्चर्य वाटलं. मला वाटत होतं, आता तरी तिला केल्या कर्माचा पश्चात्ताप झाला असेल. गाय आपल्या बच्छड्याला भेटण्यासाठी आतुर असते, तशी रंजनाही आपल्या मुलांना भेटण्यासाठी आतुर झाली असेल. हा माझा कयास साफ चुकीचा ठरला. आई म्हणून कुणीतरी हाक मारीत होतं, पण ती हाक आईच्या काळजापर्यंत पोहोचत नव्हती.

'कायदेशीर फारकत का घेत नाही ?', मी विचारलं.

'मी विड्या बांधून मजुरी कमावते. कोर्टाची पायरी मी कधी चढले नाही, वकील फी, कोर्ट फी भरायची माझी ऐपत नाही. प्राण गमवावा लागला तरी चालेल पण मी ईश्वरकडे जाणार. तसेच कुंदन-

कडेच रहाण्याचा माझा निर्णय आहे.' कायद्यानं ही बाब दिवाणी स्वरूपाची असल्यानं मला कोणताच निर्णय घेता आला नाही.

'तुझी मर्जी असेल तसं कर' असं म्हणून मी तिला बाहेर जाण्यास सांगितले.

सत्र न्यायाधीशांचे कोर्टात ही केस सुरू झाली. कोर्टाचे आवारात कुंदन भेटला. त्यानं कपाळावर शेंदराचा टिळा लावला होता. टिळा पाहून मी त्याला विचारलं, 'आज शेंदराचा टिळा लावून आला आहेस ?'

'कपाळावर तसेच छातीवरही शेंदूर लावला आहे.' असं म्हणून त्यानं शर्टाच्या गुंड्या काढून छाती दाखवली. त्याच्या छातीवर मधोमध शेंदूर लावलेला होता. माणसाची लहान आकृती शेंदरानं छातीवर काढून ठेवली होती. हा प्रकार मला नवीनच होता. छातीवर शेंदरानं माणसाची आकृती काढल्याचं मी कधी पाहिलेलं नव्हतं. माझी जिज्ञासा जागृत होऊन मी त्यास विचारलं, 'छातीवर शेंदरानं अशी आकृती काढण्याचं कारण ?'

'ते तुम्हाला नाही कळायचं. आज रंजनाबाईची साक्ष आहे. पढविलेल्या पोपटासारखं ती स्वतःच्या पतीविरुद्ध साक्ष देईल. माझा खून करण्याचा प्रयत्न करणारे सजा पावतील. त्यांना जेलमधे जावं लागेल. रंजना माझी आहे आणि ती माझ्याकडेच राहील,' कुंदन म्हणाला. त्याचं बोलणं शरीराला काटे बोचावेत त्याप्रमाणं मला बोचू लागलं होतं. रंजना सरकारतर्फे साक्ष देईल की नाही याची मला शंका होती. ईश्वरदास विरुद्ध साक्ष दिल्यानं तिची मुलं पोरकी होणार होती. कुंदनला आत्मविश्वास होता की रंजना ही तिच्या पतीच्या विरुद्ध साक्ष देणार.

कुंदनला मी विचारलं, 'तुम्ही इतकं आत्मविश्वासानं बोलता आहात ते कशाच्या जोरावर ?'

'माझ्या साधनेच्या जोरावर,' तो म्हणाला.

'साधना! कसली साधना आहे.'

त्यानं माझ्याकडे चमत्कारिक नजरेनं पाहिलं आणि तो म्हणाला, 'जिवंत माणूस मरतो, मेलेला माणूस जिवंत होतो. असं ते समीकरण आहे. अ बरोबर ब, म्हणून ब बरोबर अ हे साधं गणित आहे. तुम्हाला त्याच्याशी काय करायचं आहे. मी म्हणतो तसं होतं की नाही ते पहा.'

'रंजनाबाईऽऽ' असं कोर्टाच्या पट्टेवाल्यानं पुकारलं. रंजनाबाई सत्र न्यायाधीशासमोर हजर झाली. तिनं जो प्रकार घडला, त्या प्रमाणं पढविलेल्या पोपटासारखं सांगितलं. बचावाच्या वकीलाचंही काही चाललं नाही. मी तपास केलेल्या केसमधे सजा होणार होती. आपल्या हातची केस सुटू नये असं वाटणं स्वाभाविक होतं. माता–पित्याला पारखी झालेली पाखरं आपल्या इवल्याशा पंखांची फडफड करीत कसंबसं जीवन जगणार होती. परमेश्वराशिवाय त्यांना या जगात दुसरं कोण होतं? जगतील का ही पाखरं? असे प्रश्न मनात येत होते. कधीही कोर्टाची पायरी न चढलेली रंजनाबाई, बचावाच्या वकीलाने केलेल्या फेर तपासणीत टिकून राहिली. बाकीच्या साक्षीदारांनी, त्यांनी जे पाहिलं, ते वर्णन करून सांगितलं. केस संपली होती. निकाल लागायचा राहिला होता.

१६–११–१९७६ हा निकालाचा दिवस होता. त्या दिवशी सत्र न्यायाधीशांच्या कोर्टात निकाल ऐकायला गर्दी झाली होती. आरोपीच्या बाजूचे तसंच फिर्यादी पक्षाच्या बाजूचे लोक जमले होते. अशोकनगरमधील बरीच मंडळी निकाल ऐकायला आली होती. रंजनाबाई व कुंदन हे त्यात होते.

विद्वान सत्र न्यायाधीश स्थानापन्न झाले. सर्वांनी उठून त्यांना अभिवादन केलं. ते निकालपत्र वाचून दाखविणार होते. कोर्ट हॉलमधे हजर असलेल्या सर्वांची उत्सुकता शिगेला पोहोचली होती. हॉलमधे सगळीकडे शांतता आणि स्तब्धता पसरली होती. विद्वान सत्र न्यायाधीशांनी निकाल जाहीर केला. आरोपी नं. ७ बाबुराव बोरकर यानं

कुंदनच्या पोटावर जीवघेणे चाकूचे वार केले म्हणून त्यास भारतीय दंड विधान सहिता धारा ३०७ प्रमाणे दोषी म्हणून घोषित करण्यात येऊन, त्यास पाच वर्षाची कैद व २५० रु. दंड, दंड न दिल्यास आणखी सहा महिन्याची कैद अशी शिक्षा ठोठावली गेली. लोकांनी पकडून ठेवलेला व ज्याच्या जवळ चाकू मिळाला होता व ज्यानं कुदनला पकडून ठेवलं होतं, त्या मधुकर टेलरला दोन वर्षाची कैद झाली. बाकी सर्व आरोपींना वेगवेगळ्या सजा देण्यात आल्या. ईश्वरदास यास एक वर्ष कैद व दंड रु. २५०, दंड न दिल्यास सहा महिने कैद अशी सजा मिळाली. निकालपत्र जाहीर झाल्यावर कोर्ट हॉलमधे जमलेले लोक पांगू लागले.

शिक्षा झालेल्या सर्व दहा आरोपींना पोलीसांनी ताब्यात घेतलं. त्यांची जेलमधे रवानगी करायची होती. पोलीस बंदोबस्तात हे दहा आरोपी कोर्टाबाहेर नेण्यात आले. त्यांना पहाण्यासाठी लोकांनी एकत्र गर्दी केली. रंजनाची चारही मुलं कोर्टात आणली गेली होती. कोर्टाचे आवारात पोलिसांची निळ्या रंगाची जाळीदार मोटार उभी होती. ईश्वरदास या मोटारीत चढत होता कुंदन व रंजना ही जोडी हातात हात घालून ईश्वरदास ज्या पोलिसांचे मोटारीत चढत होता, त्या पोलीस व्हॅन समोरून हासत खिदळत चालली होती. ईश्वरदासची चारही मुलं जाळीदार निळ्या मोटारीच्या दारापर्यंत धाय मोकलून रडत आली होती. 'आम्हालाही बरोबर न्या,' असं म्हणून ओरडत होती. त्यांना दारापासून दूर लोटण्यात आलं आणि पोलिसांची निळ्या रंगाची जाळीदार मोटार निघून गेली. त्या पाठोपाठ निकाल ऐकायला आलेले लोक आपापल्या घरी निघून गेले.

इवलेसे पंख असणारी ती चार पाखरं कुठं गेली असतील ? कोण करतो फिकीर त्यांची ?

कायदा हातात घेणाऱ्या दहा आरोपींना कोर्टासमोर खेचून आणण्याचं माझं कर्तव्य मी बजावलं होतं. सत्र न्यायाधीशांनी त्यांचे समोर आलेला पुरावा विचारात घेऊन त्या सर्वांना दोषी ठरवलं होतं.

त्यांची कारागृहात रवानगी केली होती. अभिमानानं माझा ऊर फुलून यायला हवा होता, पण तसं काही झालं नाही. याला कारण वेगळंच होतं. खरी सजा चार बेगुन्हा आणि निष्पाप जीवांना झाली होती. या जाणीवेमुळं माझा अभिमान कुठल्याकुठे पळून गेला होता. खेळायचं, खायचं त्यांचं वय ! माता–पित्याचं छत्र दूर झालेली ही फुलं, जगरहाटीच्या धकाधकीत कोमेजून जाणार होती !

पोटच्या मुलांची पर्वा न करता, कुंदनच्या कुशीत विसावण्यास आसुसलेली, त्यांची उतारवयाला लागलेली आई रंजना, आठवली की अजूनही त्या काव्यपंक्ती माझ्या भोवती पिंगा घालून नाचू लागतात, वेडावू लागतात–

‘आई म्हणोनी कोणी, आईस हाक मारी
स्वामी तिन्ही जगांचा, आई विना भिकारी ॥’



चार

# चोरांची शाळा

नवरंगदादा आपल्या हातातल्या चाबकानं शेख इस्माइलच्या पाठीवर फटके मारीत होता.

'मरे रे बाप ! मरे रे बाप ! ' असं ते आठ दहा वर्षाचं कोवळं पोर ओरडत होतं.

नवरंगदादाच्या तळपायाची आग मस्तकाला गेली होती. पहेलवान नवरंग म्हणून त्याला कामठीतील लोक ओळखत होते. मिशांचे आकडे गालावर चढलेले होते. अंगात सैल असा बंगाली शर्ट तो घालीत असे. काळया दोऱ्यांत ओवलेला ताईत गळयात बांधलेला होता. कमरेभोवती लुंगी गुंडाळलेली असे चाबकाचे फटके मारताना त्याचा हात वर जाई त्या वेळी त्याच्या पिळदार दंडाकडे लक्ष्य वेधलं जात असे. इस्माइलच्या अंगातला फाटका मळकट शर्ट, चाबकाच्या फटक्यामुळं आणखीन फाटून चिंध्या होऊन गेला होता. त्याच्या पाठीवर चाबकाचे वण उठून त्यातून रक्त निघू लागलं होतं, चिमकुल्या पाखरानं पंखांची फडफड करावी, त्याप्रमाणे चाबकाच्या मारानं ते कोवळं पोर तडफड करीत होतं.

चाबकाचे फटके मारताना नवरंगदादा म्हणाला, 'तुझा बाप येणार आहे का इथं तुला भाकरी खाऊ घालायला. पाच दिवस झाले आहेत जेलमधून सुटून येऊन. या पाच दिवसात एकही चोरी केली

नाहीस. आज रात्री चोरी केली नाहीस तर तुझं जेवण बंद होईलच; पण तुला मारही खावा लागेल.'

'नवरंगदादा! मारू नका मला. आज रात्री चोरी केली नाही तर जेवण बद करा जो माल हाती येईल तो घेऊन येतो' असं हृदय पिळवटून इस्माइल म्हणाला.

'तू यात चूक केलीस लक्षात तर ठेव! तुला चांगला फोडून काढीन या चाबकानं! पहातो मी, तू रात्री चोरी करतोस की नाही' असं म्हणत नवरंगदादानी हात आवरता घेतला. हातातला चाबूक खोलीतल्या खुंटीवर टांगून ठेवला खोलीतली दहा ते पंधरा वर्षांचे आसपास असलेली मुलं भयभीत होऊन गेली होती. चाबूक खुंटीवर ठेवल्याचं पाहून त्यांना हायसं वाटलं.

चाबूक खुंटीवर ठेवून झाल्यावर नवरंगनं खिशांतून पाचाची नोट काढली. इस्माइलच्या रोखानं ती नीट धरून नवरंग म्हणाला, 'हे घे पाच रुपये, हॉटेलात जाऊन जेवण कर.'

इस्माइल हुंदके देत होता. त्याच्या दोन्ही गालावरून अश्रू ओघळत होते. नवरंगनं पुढं केलेली नोट त्यानं हातात घेतली. जर नसती घेतली तर त्याला आणखी मार बसला असता. नवरंगदादाचे चेले सिकंदर वल्द अबदरअल्ली, अन्नू गोंड, महंमद साबीर, हेमा काशीनाथ, महंमद मुक्कदर, सुरेश नंदलाला, महमंद रफीक हे तेथे हजर होते. नवरंगदादाचा आजचा अवतार पाहून, ती मुलं थरथर कापत होती. त्यांच्या तोंडातून शब्द निघत नव्हता. दादानं इस्माइलला पाचाची नोट देऊ केल्याचं त्यांनी पाहिलं, तेव्हा त्यांच्यापैकी सिकंदरनं बोलण्याचं धाडस केलं. तो म्हणाला, 'दादा! इस्माइल खोलीच्या बाहेर कसा जाईल? त्याच्या पाठीवर जखमा आहेत. शर्ट फाटून चिंध्या झाल्या आहेत. मी त्याला शर्ट देतो' असं म्हणत सिकंदरनं दादाच्या उत्तराची वाट न पहाता आपल्या अंगातला शर्ट काढून इस्माइलला दिला. सिकंदरच्या अंगात बनियन होता. त्या बनियनवर तो राहिला.

'सिकंदर, तुझा शर्ट मला नको आहे. कारण तुला एकच शर्ट आहे नुसता बनियन घालून बाहेर जाता येणार नाही तुला.'

'तू हॉटेलात जाऊन जेवण करून ये. नंतर मी बाहेर जाईन.' सिकंदर म्हणाला. आपला शर्ट त्यानं इस्माइलला दिला. त्या खोलीतच तो बसून राहिला.

इस्माइलला आज रात्री चोरी करून माल आणणे जरूर होतं. कुठं चोरी करावी? या विचारात तो गढून गेला. तो बाहेर जात नाही असं पाहून सिकंदर म्हणाला, 'इस्माइल तू हॉटेलात जाऊन जेवण करून मग ये.'

इस्माइल भानावर आला. तो जवळच्या हॉटेलात गेला जेवणात त्याचं लक्ष नव्हतं. आज चोरी करणे जमलं नाही तर? असा विचार त्याच्या डोक्यात आला. त्याचं अंग शहारलं. रेल्वेखाली लोटून द्यायला नवरंगदादा मागेपुढे पहाणार नाही हे त्याला माहीत होतं चालत्या रेलगाडी खाली ढकलून दिलं की खुनाचा आरोप येण्याची शक्यता नव्हती. रेल्वे अपघातात मरण पावला असं पोलिसांना वाटलं असतं, कसे बसे चार घास त्याने घशाखाली ढकलले. जेवणाची ऑर्डर घेणारा रामू इस्माइलकडे पहात होता. त्यानं इस्माइलला विचारलं, 'पोटभर जेवला नाहीस. तुझा चेहराही काळवंडला आहे. काय झालं आहे आज तुला?'

'माझी प्रकृती बरोबर नाही' असं काही तरी म्हणून इस्माइलनं वेळ निभावून नेली. जेवण संपल्यानंतर तो हॉटेलच्या बाहेर पडला.

नवरंगदादानं त्याला चोरी कशी करावी हे शिकवलं होतं. चोरी करताना कोणती दक्षता घ्यावी? याचेही धडे त्यानं दिले होते. नवरंगदादा तसा चतुर होता. पोलीसांच्या कचाट्यातून तो अनेक वेळा बचावून निघाला होता.

'चोरी करणं ही एक कला आहे' असं तो नेहमी सांगायचा.

कोणतीही कला हस्तगत करायची म्हटलं की शिक्षण घ्यावं लागतं. शिक्षणाची सुरवात शाळेपासून होते. चोरांची देखील शाळा असते असं मला कुणी सांगितलं असतं तर माझा विश्वास बसला नसता. पोलीस खात्यात प्रवेश केल्यावर अशा शाळा असतात हे निदर्शनास आलं. चोरांची शाळा ही कल्पनाच अचंबा वाटण्यासारखी आहे. 'चोरांची शाळा' अशी अक्षरे असलेली पाटी कुठं आढळत नाही.

आपण ज्या शाळेत शिकलो, त्या शाळेचं चित्र डोळ्यापुढं उभं रहातं. शाळेची वेळ झाली आहे, तुकाराम शिपाई घंटा वाजवीत आहे, त्याचा घण् घण् घण् आवाज कानात घुमतो आहे आणि वर्गात गुरुजी प्रवेश करण्याचे अगोदर आपण कसे धडपडत, पळत वर्गाकडे जात आहोत याची आठवण होते. निमगावकर गुरुजींची आठवण येते. त्यांची रहाणी साधीच होती. डोक्यावर टोकदार काळी टोपी, अंगात ढगळ वाटणारा कोट, धोतर नेसलेलं असा त्यांचा साधा पण स्वच्छ पोशाख असायचा. त्यांचा देह भरदार व उंचापुरा होता. वर्गात जायला उशीर झाला की ते प्रेमानं हाक मारायचे, 'बाळ इकडे ये.'

'बाळ इकडं ये !' ही त्यांची हाक ऐकली की पोटात गोळा उठायचा, चांगलीच कालवाकालव व्हायची. त्यांच्या जवळ गेलं की ते म्हणायचे, 'उशीर का केलास ? हात पुढे कर.' भीत भीत हात पुढं करावा लागे. पुढं केलेल्या हातावर दोन तीन वेळा वेताची छडी हळुवारपणे ते फिरवायचे. छडीचा गुळगुळीत स्पर्श हाताला झाला की मुंग्या यायला सुरवात व्हायची. मधूनच ते चटकन् छडी हातावर मारायचे. हाताला आलेल्या मुंग्या पळून जायच्या. दुसऱ्यांदा छडीचा प्रसाद मिळू नये म्हणून छडी चांगलीच लागल्याचा बहाणा करावा लागे. कित्येकदा ते खालचे ओठ चिमटीत धरून ओढायचे. ओठ ओढले गेले की दोन्ही गाल असे काही पुढं यायचे की गुरुजींना श्रीमुखात भडकवून द्यायला सोपं जायचं. एखादे वेळेला नेहमीचं तंत्र न वापरता ते बेंबीला चिमटे काढत. गुदगुदल्या झाल्या की हसू यायचं. 'का हसतोस ?' असं म्हणून ते गालफडावर मारीत. त्यांच्या या प्रेमळ वागणुकीमुळं ते वर्गात यायच्या आत

वर्ग हाऊसफुल्ल झालेला असायचा. त्यांच्या या तंत्राव्यतिरिक्त उशीरा आलेल्यांना ते बाकावर उभं रहायला सांगत. वर्गबंधू चोरट्या नजरेनं पहात रहायचे. त्यांच्या मूडवर त्यांचं तंत्र अवलंबून असायचं. कधी कधी उशीरा आलेल्या विद्यार्थ्याला 'जा! आपल्या जागेवर बैस. पुन्हा उशीरा येऊ नकोस' इतकं बोलून ते आपल्या विषयाकडे वळत. पारिजात वृक्षाखाली सकाळी फुलांचा सडा पडावा तसे त्यांचे बहारदार शब्द तोंडातून बाहेर पडत. शब्दसंपत्तीच्या बाबतीत कुबेर होते ते! तास केव्हा निघून जायचा कळायचं नाही. 'शाळा' शब्द वाचला की असलं चित्र माझ्या डोळ्यासमोर उभं रहातं. शाळेचं हे चित्र चोरांच्या शाळेच्या बाबतीत नसतं. वेगळ्याच प्रकारची शाळा असते ती.

या शाळेतल्या गुरुजींना वस्ताद असं म्हणतात. अनाथ आणि भटकणारी मुलं दिसली की वस्ताद त्यांना हेरून ठेवतो. त्यांना खायला द्यायचं, कपडे द्यायचे, पैसे द्यायचे असं करून, ती मुलं जाळ्यात अडकवून वस्ताद त्यांना आपल्या शाळेत भरती करून घेतो. ही शाळा भव्य इमारतीत नसते. वस्ताद ठरवील त्या ठिकाणी चोरीच्या कलेचे धडे शिकविले जातात. चोरीचं प्रॅक्टीकल घेतलं जातं. नवरंगदादानं चोरीची कला इस्माइलला शिकवली होती. चोरी करण्यापूर्वी टेहळणी करून चोरी जेथे करायची ती जागा निवडायची होती त्याला.

जेवण करून हॉटेलातून बाहेर पडल्यावर कामठी गावात त्यानं फेरफटका मारला. जागेची टेहळणी करून चोरी करायची जागा त्यानं ठरवून टाकली. कोठून प्रवेश करायचा, कोठून बाहेर निघायचं, कोणत्या रस्त्यानं निघूनं जायचं याचा आराखडा त्यानं मनात काढून ठेवला. कामठी येथील एस्. टी. स्टॅण्डकडे जाणाऱ्या रस्त्यावर हॉटेलच्या मागच्या बाजूस नवरंगदादानं ही चोरांची शाळा सुरू केली होती. दहा ते पंधरा वयामधली मुलं चोरी कशी करावी याचं शिक्षण घेत होती. आपल्या वस्तादला जबरदस्त गुरुदक्षिणा त्यांना द्यावी लागे.

टेहळणी करून इस्माइल खोलीवर परत आला. नवरंगदादा त्याच्या घरी निघून गेला होता. इस्माइल परत आल्याचं पाहून त्याच्या

भोवती सिकंदर, अन्नू गोंड, महंमद, हेमा, सुरेश, रफीक हे जमा झाले. इस्माइल आलेला पाहून सिकंदर म्हणाला, 'तुझी पाठ दाखव पाहू.'

'काय करणार आहात माझी पाठ पाहून ? कोण आहे मला या जगात ? आई, वडील असते तर माझ्यावर हा प्रसंग आला नसता. तुम्हाला माझी पाठ पहायची आहे ना ! घ्या पाहून !' असं म्हणून त्यानं शर्ट वर करून त्यांना पाठ दाखवली. पाठीवर चाबकाचे वळ उठले होते. इस्माइल स्फुंदून स्फुंदून रडत होता. जखमेवर आयोडीन आणून त्यांनी लावलं.

'इस्माइल, तू बाहेर गेलास तेव्हाच आम्ही ताडलं की तू सावज हेरायला गेलास. आज रात्री खाली हात परत येऊ नकोस. तुझ्या बरोबर आम्हाला येता यायचं नाही. नवरंगदादाची तशी सक्त ताकीद आहे. तुला एकट्यालाच चोरी करावी लागणार आहे.' अन्नू गोंड म्हणाला.

'मला माहीत आहे ते. मी टेहळणी करून जागा हेरून ठेवली आहे.' इस्माइल म्हणाला. चोरांचं असं एक नैतिक शास्त्र आहे. कुठं चोरी करणार ? जागा कोणती निवडली ? हे प्रश्न त्याला त्यांनी विचारले नाहीत. तसे प्रश्न विचारले असते तरी इस्माइलनं त्याचं उत्तर दिलं नसतं. चोरी करायला एकटा निघणार असेल तर त्यालाच जागेची माहिती असते. त्याच्या साथीदारांना देखील तो माहिती सांगत नाही. ही नैतिक बंधनं काटेकोरपणे पाळली जातात. चोरी केलेला माल वस्तादच्या ताब्यात दिला जातो. त्यातून ठरलेली रक्कम तो चेल्यास देत असतो. या व्यवहारात कधी लबाडी होत नाही. सामान्यतः ऐंशी ते नव्वद टक्के रक्कम वस्ताद घेतो. ही टक्केवारी कमी अधिक प्रमाणात ठरलेली असते. चोरी करण्याचे वेळी वस्ताद सहसा हजर नसतो. त्याचा चेला पकडला गेला तर तो न्यायालयातून चेल्यास जामीनावर सोडवून आणतो. कोर्टातून चेल्यास शिक्षा झाली तर तो सुटून येईपर्यंत चेल्यावर घरचं कोणी अवलंबून असेल तर त्यांच्या उदरनिर्वाहासाठी पैसा पुरवितो. वकीलाचा व कोर्टात खर्च वस्तादला करावा लागतो. प्रत्येक वस्तादचा वकील ठरलेला असतो. कोर्टात जामीन देण्यासाठी जामीनदार तयार असतात.

रात्रीचे दोन वाजले असावेत रस्त्यावरची रहदारी बंद झाली होती रस्त्यावरून मधूनच एखादा ट्रक जात होता. रात्र काळोखी होती. चोरी करायच्या उद्देशानं इस्माइल खोलीच्या बाहेर पडला. एकटाच होता तो. त्याचे साथीदार दारापर्यंत आले. इस्माइलला आपल्या कार्यात यश येवो अशी ते मनातून प्रार्थना करीत असावेत. चोरी केल्याखेरीज परतायचं नाही असा ठाम निश्चय करून तो बाहेर पडला. बाहेर पडताना त्याच्या छातीतील धडधड वाढली.

सकाळचे नऊ वाजले असतील. पोलीस स्टेशनमध्ये येऊन पाच मिनिटं झाली असतील नसतील, इतक्यात टेबलावरचा फोन घणघणला. रिसिव्हर कानाला लावून मी म्हणालो, 'पोलीस स्टेशन ऑफीसर बोलतोय, आपण कोण?'

'मी कामठी शहर कॉंग्रेस कमेटीचा सेक्रेटरी अग्रवाल बोलतो आहे.' तिकडून उत्तर आलं.

'सकाळीच फोन केलात काही विशेष.' मी म्हणालो.

'आज सकाळी नगर कॉंग्रेस कमेटीच्या ऑफिसात गेलो, तेव्हा कमेटीचं दार उघडं दिसलं, दरवाज्याची साखळी तुटून खाली पडलेली आहे. आत जाऊन पाहिलं तेव्हा चोरी झाल्याचं दिसून आलं.'

'काय चोरीला गेलं आहे?' मधेच मी म्हणालो.

'लाऊड स्पीकर ठेवलेला होता तो दिसत नाही. माईक, कर्णा इलेक्ट्रिक वायरचं बंडल, पितळी फुलपात्रे, असं अंदाजे बाराशे रुपयाचं सामान चोरीला गेलं आहे' अग्रवाल म्हणाले.

'आपण कमेटीच्या ऑफिसात थांबा, मी येत आहे' असं म्हणून मी रिसिव्हर खाली ठेवला. घरफोडी चोरीच्या गुन्ह्याची खबर फोन-वरून आली होती. फोन आल्याची नोंद घेऊन, मी घटनास्थळावर गेलो.

कॉंग्रेस कमेटीचं ऑफीस कामठीतील मध्य वस्तीत आहे. चोरी करताना गुन्हेगार आपल्या काही निशाण्या घटनास्थळावर सोडीत असतो.

बारकाईनं निरीक्षण केलं. माझा स्टाफही बरोबर आला होता. घटनास्थळावर फिंगर प्रिंटस् मिळतात काय हे पाहिलं. कोठेही फिंगर प्रिंटस् उमटल्याचं दिसून आलं नाही. अनेकवेळा गुन्हेगार गुन्हा करताना टोपी, चपला, हातरुमाल, बिडचा, सिगरेट, माचीस अशा वस्तू घटनास्थळावर सोडून जातो. त्यावरून धागादोरा हाती येतो. काँग्रेस कमेटी ऑफिसातील कोपरान् कोपरा बारकाईनं पाहिला, परंतु तेथे उपयोगी पडण्यासारखी एकही वस्तू आढळून आली नाही. कोणत्याही प्रकारचा धागा दोरा गुन्हेगाराने मागे ठेवला नव्हता. काँग्रेस कमेटीच्या आसपास रहाणाऱ्या अनेक लोकांकडे जाऊन मी चौकशी केली. रात्रीच्या वेळी त्यांनी आवाज ऐकला काय ? चोरी करून जाताना कोणी दिसलं कां ? अशी विचारपूस केली.

काँग्रेस कमेटी ऑफिसात चोरी झाल्याची वार्ता गावात समजली. काँग्रेस कमेटी ऑफिसात पार्टीचे कार्यकर्ते जमले. ‘ आता कसली चोरी मिळते ! पोलिसांची गस्त बरोबर होत नाही. ’, ‘ पोलीसांचा सारा कारभार गलथान आहे ’, ‘ चोरीचे गुन्हे वाढले आहेत ’, ‘ एकही गुन्हा पोलिसांनी उघडकीस आणलेला नाही.’, ‘ डेप्युटेशन घेऊन चला ! ’ अशी टीका माझ्या कानावर येत होती. ती टीका ऐकून आपणच चोरी केली आहे आणि आपणच हा गुन्हा केला आहे असं वाटायला लागलं. काही कार्यकर्त्यांची मजल इथपर्यंत गेली की ‘ ठाणेदार बदलला पाहिजे ’ असंही मत त्यांनी व्यक्त केलं. या चोरीच्या घटनेची चर्चा गावभर सुरू झाली. एक वेगळंच महत्त्व या चोरीच्या घटनेस आलं. एका राजकीय पक्षाच्या कचेरीतून माल लंपास करण्यात आला होता. त्यामुळे पोलिसांना आव्हान देणारी ही घटना ठरली. वरिष्ठ अधिकाऱ्यांकडेही निवेदने सादर करण्यात आली. या निवेदनातून पोलीस निष्क्रीय झाले आहेत, काँग्रेस कमेटीच्या दाराची साखळी तोडून चोरी होते म्हणजे यात दुसऱ्या राजकीय पक्षाचा हात असण्याची शक्यता आहे.

प्रकरण साधंसुधं नव्हतं. गुन्हा उघडकीस आला पाहिजे अशी तंबी देऊन वरिष्ठ अधिकारी कामठी रेस्टहाऊसला तळ देऊन थांबले.

काँग्रेस पक्षातील कार्यकर्ते मला भेटत राहिले. प्रत्येकजण मला चोरीचा तपास लागलाच पाहिजे असं मत व्यक्त करीत होता.

माहीत असलेल्या अनेक स्थानिक गुन्हेगारांकडे विचारपूस करण्यात आली. त्यांच्या घरांच्या झडत्या घेण्यात आल्या. पोलिसांचे मुकबीर या घटनेच्या संदर्भात कुचकामी ठरले. माझ्या डोक्यावरचा ताण इतका वाढला की मणामणांचं ओझं कुणीतरी डोक्यावर ठेवलं आहे असं वाटू लागलं. अशाही परिस्थितीत मनाचा समतोल राखला.

पोलीस स्टेशनच्या रेकॉर्डवर ज्या चोरट्यांची नावे होती, त्या सर्वांकडे तपास करण्यात आला. जसजसा वेळ जात होता, तसतशी टीकेची झोड वाढत जात होती.

शांतपणे विचार करून मी निर्णय घेतला की हा कोणीतरी नवखा चोरटा असावा. अत्याधुनिक साधनं कुचकामी ठरली होती. मी आव्हान स्वीकारलं होतं. चोरटा पकडून दाखवायची जिद्द मनात होती. विचारानी वेग घेतला. गुन्हा झाला त्या तारखे अगोदर कोणी गुन्हेगार जेल मधून सुटून तर आला नसेल? त्याची शहानिशा करण्यासाठी मी नागपूरला जेलमधे गेलो. तेथील रेकॉर्ड पाहिलं. ते रेकॉर्ड पाहून आशेचा किरण दिसला. या चोरीच्या घटनेच्या अगोदर कोण कोण गुन्हेगार जेलमधून सुटेल आहेत त्याची माहिती घेतली. तेथे मला शेख इस्माइल, राहणार कामठी हा सात दिवसापूर्वीच जेलमधून शिक्षा भोगून बाहेर पडला असल्याची माहिती मिळाली. शेख इस्माइल यानंच चोरी केली नसेल कशावरून? तपासात त्याला बोलावण्यात आलं नव्हतं. नागपूर येथील जेलमधून माहिती घेऊन मी परत कामठीस आलो.

कामठी पोलीस स्टेशनच्या रेकॉर्डवर शेख इस्माइलचं नाव नव्हतं. चोरीचा व्यवसाय नुकताच कुठे त्यानं सुरू केला होता. नागपूरच्या एस्. टी. बस स्टॉपवर चोरी करताना तो एकदा पकडला गेला होता. कामठी ठाण्याच्या रेकॉर्डवर मी विसंबून राहिलो असतो, तर हा गुन्हा कदाचित उघडकीस आलाही नसता.

शेख इस्माइलचं नाव मिळाल्यावर मी कामठीला आलो. त्याला शोधून काढणं तितकंसं अवघड नव्हतं. बाजारात फिरत असताना त्याला पकडण्यात आलं. त्याला माझ्या समोर हजर करण्यात आलं.

पंधरा, सोळा वर्षांचं वय असावं त्याचं. त्याच्या अंगातल्या मळकट शर्टाचा कुबट वास येत होता. त्यानं घातलेली पँट कित्येक दिवसात धुतलेली नसावी दोन्ही गुडघ्यावर पँट फाटलेली होती. कित्येक दिवसात तेल न लावल्याने त्याचे केस पिंजारल्यासारखे व राठ दिसत होते. पोलिसांच्या तावडीत सापडल्यानं तो गोंधळून गेला होता. कामठी येथे माझ्यासारखी अनेक मुलं असताना, पोलिसांनी नेमकं मलाच कसं टिपून काढलं, याचं आश्चर्य त्याला वाटत असावं, असं त्याच्या चेहेऱ्यावरून दिसत होतं.

'नाव काय तुझं ?' मी विचारलं.

'शेख इस्माइल.'

'तुझे आई वडील काय करतात ?'

'दोन वर्षापूर्वीच त्यानी इहलोक सोडला आहे.'

'कुठे रहातोस तू ?' त्याच्या नजरेला नजर भिडवून मी विचारलं.

'हॉटेलात खायचं अन् कुठेही झोपायचं. मला रहायला घर नाही, रेल्वे स्टेशनवरील बेंच व एस्. टी. स्टँडवरील बाकावर झोपत असतो.'

'तुला इथं पकडून का आणलं आहे हे समजलं असेल तुला' मी विचारलं.

'इथं का आणलं मला माहीत नाही.'

'इस्माइल, खरं बोलणारा चोर भेटला नाही मला. तू तरी त्याला अपवाद कसा असणार ? सुरवातीला प्रत्येक चोर मी चोरी केली नाही असंच सांगतो. त्याला बोलतं करावं लागतं. तू काँग्रेस कमेटी ऑफिसातलं सामान चोरलं आहेस.' मी म्हणालो.

'नाही साहेब ! मी चोरी केली नाही. काँग्रेस कमेटीचं ऑफीस कुठं आहे हे मला माहीत देखील नाही.' तो धादांत खोटं बोलत होता.

त्याच्या चेहऱ्याकडे टक लावून मी पहात होतो. माझ्या डोळ्याला डोळा भिडवण्याचं तो टाळीत होता. उत्तर देताना खाली पाहून अगर बाजूला पाहून उत्तरे देत होता. बोलताना आवंढा गिळीत होता. अनेक गुन्हेगार मी पहात आलो आहे. सत्य लपवणं त्यांना कठीण जातं. त्यांच्या बोल-ण्याला ताळतंत्र रहात नाही. सत्य तोंडातून बाहेर पडू नये असा ते प्रयत्न करीत असतात. आवंढा गिळून खरे शब्द दडपून टाकीत असतात. सत्य लपवणं साधीसुधी बाब नाही. अपराध्यांना सत्य लपवताना त्रास होत असतो. त्यांच्याशी बोलताना, त्यांच्या हालचालींवर बारकाईनं लक्ष्य द्यावं लागतं. ज्यान अपराध केला नसेल त्याला आवंढा गिळण्याची गरज भासत नाही. तो आपण निरपराध आहोत व गुन्हा झाला त्यावेळी तो जेथे हजर असेल तेथलं वर्णन सांगतो. सिनेमाला गेला असल्यास त्याच्या खिशातलं सिनेमाचं तिकीट दाखवतो. मिलमध्ये कामाला गेला असल्यास हजेरीपट दाखवतो. निरापराध असणाऱ्यांची वागणूक वेगळीच असते. प्रश्नांची उत्तरं देताना तो निर्भय असतो. प्रश्न विचारला की लगेच उत्तर हजर असते, याच्या नेमकी उलट परिस्थिती अपराध्यांची असते. मी गुन्हा केला आहे असं तो सरळ कधी सांगत नसतो. प्रश्नांची उत्तरं देताना त्याला वेळ लागतो. कारण खोटी कारणं शोधून काढा-यला त्याला वेळ लागतो, ज्यानं अपराध केला नाही त्याचं निरपराधित्व शाबित व्हायला वेळ लागत नाही. त्यानं जी कारणं सांगितली ती खरी आहेत की नाही याची शहानिशा केल्यावर, खरोखरच त्यानं गुन्हा केलेला नाही असं आढळून येतं.

शेख इस्माइल हा अपराध केल्याचं कबूल करीत नव्हता. त्याच्या चेहेऱ्यावरील हावभाव, तसंच त्याचं वर्तन पाहून माझी खात्री झाली होती की त्यानंच अपराध केला आहे.

शेख इस्माइलला तो खोटं बोलत आहे, हे दाखवून द्यायचं होतं. त्याला कोंडीत पकडावं म्हणून मी त्याला प्रश्न विचारला, 'नागपूरला तू गेला होतास काय?'

'नाही. मी नागपूरला गेलो नव्हतो. कामठीतच होतो' तो म्हणाला.

'तू नागपूरच्या जेलमधे सजा भोगीत होतास, पाच दिवसांपूर्वीच तू जेलमधून सुटलास खरे आहे की नाही हे !' मी दरडावून विचारलं.

'खरे आहे हे मी नागपूरला होतो, जेलमधून सुटलो तेव्हा सरळ कामठीला आलो.' शेख इस्माइल म्हणाला.

'मग नागपूरला गेलो नव्हतो असं खोटं का सांगितलं ?'

'चुकलो मी, आता खोटं बोलणार नाही.'

'तू चोरी केली आहेस की नाही ?' असा मी सरळ प्रश्न विचारला. प्रश्न विचारताना त्याच्या डोळ्यास डोळा लावून मी बोलत होतो. त्यानं खाली मान घालून रडायला सुरवात केली. त्यानं चोरी केल्याचं अशा रीतीनं कबूल केल्यासारखं होतं.

'काँग्रेस कमेटी ऑफिसमधलं सामान तू चोरलंस की नाही ?'

'मी चोरी करणार नव्हतो. नवरंगदादानं चोरी करायला भाग पाडलं.'

नवरंगदादाचं नाव मला ऐकून माहित होतं. तो फडात कुस्त्या खेळतो असं मला माहित पडलं होतं. काँग्रेस कमेटीतून चोरीस गेलेलं सामानं मला परत मिळवायचं होतं.

'लाऊडस्पीकर, इलेक्ट्रिक वायर, फुलपात्रे असं सामान तू कुठे ठेवलं आहेस ?' मी विचारलं. गुन्हा केल्याची कबुली दिल्यावर पुढचं काम सोपं होतं. अपराध्यानं गुन्हा केल्याचं कबूल केल्यानंतर तो बाकीचा भाग लपवून ठेवीत नाही. अपराध घडला तो इतरांच्या संगतीमुळं असं गुन्हेगार सांगत असतात. एकदा कबुली दिली की इतरांनाही त्यात गोवण्याचा प्रयत्न करतात. इतर साथीदारांची नावं सांगतात.

'काँग्रेस कमेटीचा माल एस्. टी. स्टॅण्ड जवळच्या हॉटेलाचे मागे असलेल्या एका खोलीत ठेवण्यात आला आहे. ती जागा मी दाखवून माल काढून देतो.' शेख इस्माइलनं चोरी केलेलं सामान कुठं ठेवलं आहे ते सांगितलं. त्याला मी अटक केली. अटक करताना आरोपीची अंगझडती घेण्यात येत असते.

'हवालदार, इस्माइलची अंगझडती घ्या' मी म्हणालो. शेख इस्माइलची अंगझडती घेण्यात येऊ लागली. त्याचा शर्ट वर करून पहाता, त्याचे पाठीवर काळे, निळे वळ उमटलेले होते. त्याच्या अंगावर या माराच्या निशाण्या आल्या कशा ? मी त्याला विचारलं, 'कोणी मारलं आहे तुला ?'

'नवरंगदादानं चाबकानं माझी पाठ फोडून काढली आहे.'

'नवरंगदादानं मारायचं काय कारण ?' मी त्याच्या जखमा पाहात पाहात विचारलं.

'जेलमधून सुटल्यावर मी नवरंगदादाच्या अड्ड्यावर गेलो होतो. त्यानं मला चोरी करायला सांगितलं; पण मला चोरी करता आली नाही. हॉटेलात कुठे तरी नोकरी करून पोट भरण्याचा प्रयत्न करणार होतो. मी चोरी केली नाही म्हणून तो रागावला व त्यानं मला चाबकानं मारलं. माझा नाइलाज झाला म्हणून मला ही चोरी करणं भाग पडलं.' इस्माइलनं सांगितलं.

'नवरंगदादाचा आणि तुझा संबंध काय ?'

'तो माझा वस्ताद आहे. चोरी करायला त्यानंच मला शिकवलं आहे. एस्. टी. स्टॅण्डजवळच्या हॉटेलास लागून त्याची खोली आहे. तिथं तो आम्हाला चोरी करायचं शिक्षण देत होता.' असं सांगून त्यानं बोलणं थांबवलं. बोलण्याच्या ओघात त्यानं 'आम्हाला' असा अनेकवचनी शब्द वापरला होता. ही बाब माझ्या लक्षात आल्याखेरीज राहिली नाही.

'आम्हाला म्हणजे ? आणखी किती जण असतात त्याच्या अड्ड्यावर ?' मी त्याला शब्दात पकडलं होतं.

'आणखी दहा पंधरा माझ्या सारखी अनाथ मुलं हे शिक्षण घेत असतात.'

'असं ! म्हणजे नवरंगदादानं चोरांची शाळाच सुरू केलेली दिसते ! शाळेत कोण कोण येत असतात त्यांची नावं सांग.' आपल्या

साथीदारांची नावं सांगायला त्याचं मन तयार होत नव्हतं. माझा प्रश्न ऐकूनही तो बोलला नाही. पुन्हा मी त्याला विचारलं, ' कोण येत असतात नवरंगदादाच्या शाळेत ? तुला आठवतील तितकी नावं सांग.' आता मात्र त्याला नावं सांगणं भाग होतं.

' सिकंदर अब्दरअल्ली, अन्नू गोंड, महंमद साबीर, हेमा काशीनाथ, महंमद मुक्कदर, सुरेश नंदलाल, महंमद रफीक, ही नावं आहेत त्यांची. नवरंगदादाच्या शाळेची माहिती घ्यावी म्हणून मी त्याला विचारलं, ' चोरी करायला शिकवतो म्हणजे तो काय करतो ? त्याची शिक्षण देण्याची पद्धती कशी आहे ?'

' चोरी करण्यापूर्वी काय दक्षता घ्यायची असते हे तो समजावून सांगतो.'

' चोरी करण्यापूर्वी कोणती दक्षता घ्यायला सांगितलं आहे त्यानं ? तुला हे सर्व सांगितलं पाहिजे. नवरंगदादाला घाबरण्याचं कारण नाही. त्यालाही मी तुरुंगात पाठवल्याशिवाय रहाणार नाही. तुझं नाव मी कोणाला सांगणार नाही. नवरंगलाही तू हे सांगितलंस हें माहीत पडणार नाही, याची खबरदारी मी घेतो.' असा धीर दिल्यावर त्यानं सांगितलं, ' नवरंगदादा या कलेत तरबेज झालेला आहे. तो पोलिसांच्या हाती लागल्याचं मला आठवत नाही. ज्याठिकाणी चोरी करायची आहे ते ठिकाण पाहून ठेवावं लागतं. पोलीस स्टेशन तेथून किती अंतरावर आहे ? कोणत्या पोलीस चौकीच्या अथवा बीटच्या परिक्षेत्रात ते ठिकाण येते ? पोलीस खात्यात काम करणारांची नावं माहीत करून घ्यावी लागतात. रात्रीच्या गस्तीला पोलीस कोणत्या मार्गानं जातात ? पोलीस इन्स्पेक्टर, सब-इन्सपेक्टर गस्तीवर निघणार आहेत काय ? अशी बारीक सारीक माहिती काढून ठेवावी लागते. त्या ठिकाणच्या आसपास पोलीस चौकी असल्यास, पोलीसावर वॉच ठेवला जातो. त्यांच्या हालचालीवर लक्ष्य ठेवावं लागतं. चोरी करायचा दिवस आधी ठरवावा लागतो. अमावास्या असल्यास फारच चांगले, अंधारी रात्र निवडली जाते. अशा

प्रकारची दक्षता घ्यावी लागते' असं म्हणून तो थांबला. त्याच्याकडून मला अधिक माहिती मिळवायची होती.

मी त्याला विचारलं, 'चोरी करण्यापूर्वी कोणती दक्षता घ्यावी हे तू सांगितलं आता चोरी करताना कोणत्या बाबी लक्षात घ्याव्या लागतात हे सांग.'

'चोरी करण्यापूर्वी कोणती दक्षता घ्यायची हे मी थोडक्यात सांगितलं आहे. चोरी करायला निघण्यापूर्वी डार्क कलरचे कपडे घालावे लागतात. काळसर, तांबूस रंगाचे कपडे घालावेत, पांढरे कपडे घातल्यास ते अंधारात उठून दिसतात. चोरी करताना घरात किंवा दुकानात प्रवेश कोणत्या मार्गानं मिळवायचा हे ठरवावं लागतं. अपराधी कसा प्रवेश करतात हे आपणाला माहीत आहेच. कुलूप तोडण्यासाठी लागणारी हत्यारे बरोबर घ्यावी लागतात. डुप्लीकेट चावीचा उपयोगही काहीजण करतात. खिडकीचा गज वाकवून, भिंतीस छिद्र पाडून अशा अनेक मार्गांनी आता प्रवेश करावा लागतो. प्रत्येक अपराधी हा त्यास सोपी वाटणारी पद्धती अंमलात आणतो. चोरी करीत असताना घरात कोणी जागं आहे काय? तसंच घरात किंवा आजूबाजूस कुत्री आहेत का? टेलीफोन घरात आहे का ? अशा अनेक बाबी विचारात घ्याव्या लागतात.'

'समजा चोरी करीत असताना घरातलं कुणी जागं झालं तर काय करता ?' मी मधेच विचारलं.

'चोरी करायला धाडस लागतं. चोरी करीत असताना आवाज होतोच. त्या आवाजानं कोणाला जाग आली तर तो डोळे उघडतो. त्यानं डोळे उघडले की तोंडावर बोट ठेवून त्याला चूप बसण्याची खूण करायची, दुसऱ्या हातातला चाकू दाखवायचा. चाकू पाहिला की त्याचे उघडलेले डोळे आपोआप मिटले जातात. निर्धास्तपणे चोरी करून बाहेर पडायचं. चोर बाहेर गेला तरी त्याचे डोळे लवकर उघडत नाहीत. थोड्या वेळानं तो 'चोर! चोर!' असं ओरडतो. बाकीची माणसं जागी झाली की त्यांना चोराशी कसे दोन हात करून त्याला पळवून

लावलं याचं तिखट मीठ लावून तो वर्णन करून सांगत असला पाहिजे. अलीकडे मोजे हातात घालून सामान लंपास करा असं तो सांगतो, फिंगर प्रिन्टस् घरातल्या सामानावर येणार नाहीत याची खबरदारी घ्यावी लागते. चोरी करून जाताना, आपण ज्या रस्त्यावरून जाणार तिकडे पोलीस दिसले की मार्ग बदलावा लागतो; म्हणून ज्या ठिकाणी चोरी करायची आहे, त्याच्या आसपासचे रस्ते, गल्ल्या, बोळ यांची खडान् खडा माहिती असावी लागते. चालण्याचा आवाज येऊ नये म्हणून चप्पल, बूट न घालता जावं लागतं. रबरी बूट किंवा चप्पल घातल्यास चालतं. कारण चालताना किंवा पळताना आवाज येत नाही.'

'काँग्रेस कमेटी ऑफिसात चोरी करताना आणखी किती जण तुझ्याबरोबर होते?' मी विचारलं.

'मी एकटाच होतो.'

'किती वाजता चोरी केलीस.'

'रात्री दोन वाजता.'

'रस्त्यात कोणी गस्तीचे पोलीस भेटले नाहीत का?'

'सिनेमा टॉकीज समोरून जात असताना, नाइट राउंड करणाऱ्या शिपायांच्या शिटचा ऐकू आल्या. मी चवुतऱ्याच्या मागे दडून बसलो. शिपाई निघून गेल्यावर जिना चढून काँग्रेस ऑफिसच्या समोर गेलो. कुलूप तसंच राहू दिलं. साखळीचा मधला कोंडा छन्नीनं तोडला, ऑफिसातील हाती लागेल ते सामान टेबल क्लॉथमध्ये ठेवून गाठोडं बांधून बाहेर पडलो, हे सामान मी हॉटेलच्या मागे असलेल्या खोलीत ठेवल आहे. नवरंगदादाच्या ताब्यात सामान दिल्यावर तो खूष झाला. नागपूरला नेऊन विकणार आहे तो ते सामान.'

'अस्सं का? काढून दे ते सामान.' असं म्हणून मी दोन पंच बोलावले. अटकेत असलेला आरोपी शेख इस्माइल काय सांगतो ते पाहून मेमोरॅंडम लिहून द्यायला सांगितला. मेमोरॅंडम म्हणजे आरोपीनं सांगितलेली हकीकत सांगणारा पंचनामा. त्यावर दोन्ही पंचांनी सह्या

केल्या. पंचांसमक्ष मी त्याला ज्या खोलीत सामान ठेवलं त्या खोलीचं वर्णन लिहून घेतलं.

वर्णन लिहून झाल्यावर मी म्हणालो, 'याच खोलीत नवरंगची चोरांची शाळा आहे का ?'

'होय ! त्याच खोलीत नवरंगदादा चोरी कशी करावी हे शास्त्र शिकवीत असतो.'

'चल ! तुझी शाळा दाखव. तेथलं सामान काढून दे' असं म्हणून मी त्याला पोलीस स्टेशनबाहेर काढलं.

त्यानं आम्हाला एस्. टी. स्टॅण्ड जवळच्या हॉटेलच्या मागच्या खोलीसमोर आणलं. शेख इस्माइल पोलिसांच्या हाती गवसल्याचं वृत्त नवरंगला समजलं असावं. त्याची शाळा बंद पडली होती. दरवाज्याला कुलूप लागलेलं होतं. पंचांसमक्ष ते कुलूप काढण्यात आलं. त्या खोलीत शेख इस्माइलनं प्रवेश केला. कॉंग्रेस कमेटीचं चोरीस गेलेलं सामान त्यानं काढून दिलं. ते सामान पाहून माझ्या आनंदाला पारावार राहिला नाही. जिद्द पुरी झाली होती. हजार-बाराशे रुपयांचं ते सामान कॉंग्रेस कमेटीच्या मालकीचं होतं. लाख रुपयाचं लॉटरीचं तिकीट लागल्या-सारखं वाटलं.

पोलीस आल्याचं पाहून लोकांची गर्दी जमण्यास सुरुवात झाली. पंचनामा झाल्यावर ते सर्व सामान जप्त करून मी ताब्यात घेतलं. सामानाची यादी, चोरीस गेल्या मालाच्या यादीशी पडताळून पाहिली. चोरीस गेलेलं सर्व सामान परत मिळालं होतं. या सामानात कॉंग्रेस कमेटीचा माईक, कर्णा, इलेक्ट्रिक वायर, स्टेनलेस स्टीलची भांडी, फुल-पात्रे असं सामान मिळालं. ते सामान कॉंग्रेस कमेटीचंच होतं कारण काही भांड्यांवर कॉंग्रेस कमेटीचं नाव लिहिलं होतं. चोरीस गेलेला सर्व माल पोलिसांनी जप्त केल्यानं, पोलिसांवर टीका करणारे कार्यकर्ते त्या ठिकाणी जमू लागले. त्यांनी सामान पाहून घेतलं. 'आता कसली चोरी मिळते' अशी टीका करणारे, पोलिसांची तोंड भरून स्तुती करू लागले.

स्तुती करणारात, ठाणेदाराविरुद्ध निवेदने सादर करणारेही होते. तसा काही मी शेर मारला नव्हता पण आलेलं आव्हान धैर्यानं स्वीकारलं होतं. एक वेळ शेर मारणं अवघड नाही पण चोरटा हुडकून काढणं अवघड आहे. शिकाऱ्याच्या समोर शेर असतो तर ज्या ठिकाणी चोरी झालेली असते, तिथं चोर हजर नसतो. पोलिसांचं खरं कौशल्य चोरीचा गुन्हा उघडकीस आणण्यात आहे. गंभीर स्वरूपाच्या अपराधाचे तपासात अपराधी कोण आहे हे समजायला सहसा वेळ लागत नाही.

नवरंगदादाची ही चोरांची शाळा बंद पडली होती. शाळेच्या या खोलीत खुंटीवर चाबूक टांगला होता. शाळेतला वर्ग स्वच्छ असतो पण ही खोली घाणेरडी होती. अर्धवट जळालेल्या माचीसच्या काड्या, विड्यांची थोटकं जागोजागी पडलेली होती. एका टेबलावर कात्री, चाकू, ब्लेडस्चे तुकडे, चाव्यांचे वंद, लोखंडी सळई एका टोकास निमुळती असलेली पडलेली होती. टेबलावर पडलेल्या या सामानाकडे पहात मी म्हणालो ' हे सामान कुणाचं आहे.' 'नवरंगदादाचं' असं त्यानं उत्तर दिलं. ते सामान पाहून माझ्या लक्षात आलं की हे सामान चोरी करण्यास उपयोगी पडण्यासारखं आहे. शेख इस्माइलकडून मला माहिती काढून घ्यायची होती.

'नवरंगदादाला या सामानाचा काय उपयोग ?' मी विचारलं.

टेबलावरची कात्री उचलून घेत तो म्हणाला, 'ही कात्री खिसे कातरायला उपयोगी पडते. चाकू, कात्री ही साधनं फारशी वापरली जात नाहीत. काळ बदलत चालला तशी साधनेही बदलली आहेत. बंगालीजेब कातरायला याचा उपयोग होतो. पूर्वी लोक बंड्या, नेहरूशर्ट; घालीत. या कपड्याचे खिसे बाहेर लोंबकळत असतात. ते कापायला ही कात्री, अथवा धारदार चाकू लागतो. ब्लेडचे तुकडे मोठ्या प्रमाणावर वापरले जात आहेत. एका ब्लेडचे उभे दोन तुकडे करून बोटावर बांधून ते बोट खिशाचे खालून फिरवले की पाकीट वजनदार असल्यानं, ते अलगद हातात येतं.'

'चाव्याचे जुडगे व लोखंडी टोकदार सळई केव्हा वापरतात.' मी म्हणालो.

'घरफोडी करताना घरात प्रवेश करायचा झाला तर दाराचं कुलूप या चाव्यानी उघडलं जातं. यात कोणतंही गोदरेज कुलूप उघडलं जाईल अशी मास्टर की आहे. टोकदार सळई वापरून खिडकीचे गज काढून प्रवेश करता येतो. या गजाने कडीचे कोंडे तोडून दरवाजा उघडता येतो.' असं तो सांगत असताना मला आठवलं की काँग्रेस कमेटी ऑफिसच्या दरवाज्यास जी कडी होती, त्याच्या कड्या तोडलेल्या होत्या.

'तू यापैकी कोणतं हत्यार चोरी करताना वापरलंस?' मी विचारलं.

'हा टोकदार लोखंडी गज वापरून मधली कडी वाकवून तोडली व दार उघडलं' लोखंडी गजाकडे पहात त्यानं सांगितलं.

'नवरंगदादानं शिकवलं आहे काय तुम्हाला या हत्याराचा उपयोग करायला.'

'होय! त्यानीच शिकवलं आहे. मला लोखंडी गजाचा वापर करणं आवडलं आणि घरफोडी करताना मी याच हत्याराचा उपयोग करू लागलो. आमच्या पैकी अन्नू गोंड, महंमद साबीर हे ब्लेडचे तुकडे तोंडात लपवून ठेवतात. पोलिसांनी त्यांची झडती घेतली तरी त्यांच्या जवळ काही मिळत नाही. जिभेच्या खाली ब्लेडचा तुकडा लपवून ठेवता येतो त्यांना. हा तुकडा बोटाला बांधून ते बोट सावजाचे खिशाचे खाली फिरवलं जातं ब्लेडचा घसरा बसल्यानं कपडा फाटून त्यातून पाकीट खाली पडतं. ते पाकीट दुसऱ्या हातानं झेलून, ते तेथून निघून जातात. निमिषार्धात ते आपलं काम आटोपतात. गर्दीमुळं खिसा साफ झाल्याचं सावजाच्या ध्यानी येत नाही. प्रत्येकजणांची कार्यपद्धती वेगळी आहे.'

बाहेर लोकांची गर्दी वाढू लागली होती. या चोरांच्या शाळेतलं सर्व सामान ताब्यात घेण्यात आलं.

शेख इस्माइलला पोलीस स्टेशनमधे नेण्यात आलं. नवरंगदादाचा तपास चालू ठेवला. समाजविघातक व देशाला धोकादायक अशा या शाळा लहान मोठ्या प्रमाणात चालू असतात. अशा शाळांच्या अस्तित्वाची कल्पनादेखील कोणाला नसते. एस् टी. बस स्टॅण्ड व रेल्वे स्टेशनपासून जवळपास अशा शाळा असतात. धर्मशाळा, व गावाबाहेरची मंदिरे, पडक्या जागा, स्मशानभूमी, अशा एकांत असलेल्या जागी असतात. टेकडीवरील वृक्षाच्या छायेतही वस्तादलोक आपल्या चेल्याचपाटयांना घेऊन बसतात. त्यांना चोरी कशी करावी याचं शिक्षण देतात.

एखादा चेला भलताच स्मार्ट निघतो. दुसऱ्या शाळेचा वस्ताद स्मार्ट चेल्यास आपल्या शाळेत ओढण्याचा प्रयत्न करतो. हुशार विद्यार्थी आपल्या शाळेत यावा असं कोणत्या शिक्षकास वाटत नाही? दोन वस्तादांमधे या कारणावरून अनेकदा सुरामारी होत असते. ज्याच्याजवळ स्मार्ट चेला असेल, त्या वस्तादाचे अमदानीत वाढ होते. हा स्मार्ट चेला चोरी करून हाती येईल ते वस्तादाचे हाती देतो.

काँग्रेस कमेटीचा चोरीस गेलेला माल परत करण्यात आला. शेख इस्माइलवर दोषारोपपत्र पाठविण्यात आलं. तपासात गुरुशिष्याविरुद्ध अनेक पुरावे मिळाले. न्यायालयातून त्यांना सजा झाली. एक शाळा नष्ट झाली. अशा शाळा शोधून त्या नष्ट करण्याची ही माझी पहिलीच वेळ नव्हती. गुरु-शिष्याला मी गजाआड पाठविलं. ही शाळा गजाआडदेखील चालू रहाणार आहे. सजा झालेले इतर कैदी शिक्षणाचा लाभ घेणारच, वस्ताद जिथे जाईल, तिथं चोरांची शाळा सुरूच रहाणार आहे. चोर आणि पोलीस यांचा लपंडाव चालत रहाणार आहे.

आपण ओळखी करून घेतो. जेलमधे असलेले कैदी याला अपवाद कसे असणार? जेलमधे गुन्हेगारांचा मेळावा भरलेला असतो. एकमेकांच्या विचारांची देवाण घेवाण होते. सान्निध्यातून परिचयाचं रोपटं वाढून त्याचा वृक्ष होतो. जेलमधून सुटल्यावर कुठं भेटायचं? काय करायचं? याचं प्लॅनिंग जेलमधे शिक्षा भोगीत असताना ठरविलं जातं.

जेल म्हणजे अपराध्यांची, चोरांची युनिव्हर्सिटी आहे असं म्हटल्यास वावगं होणार नाही. अनेक वेळा जेलची हवा भोगलेले गुन्हेगार, आपले अनुभव इतर कैद्यांना सांगत असतात. जितकी दीर्घ मुदतीची सजा असेल, त्या प्रमाणात त्याची डिग्री मोठी असते. हे डिग्री होल्डर, 'जे जे आपणासी ठावे! ते ते इतरांसी शिकवावे! शहाणे करोनी सोडावे! सकल जन!' या उक्तीप्रमाणे आपलं ज्ञानामृत इतर कैद्यांना पाजीत असतात. या ज्ञानामृताचं अखंड पान चेले करीत असतात. या ज्ञानामृताचं अखडपान चालू असताना, कोणी सजेची मुदत संपल्यानं सुटला तर त्याला विरहाचं अतीव दुःख होतं. पुन्हा परत सत्वर येण्याचं आश्वासन देऊन, तो जड अंतःकरणानं निरोप घेतो. निरोप देताना विशुद्ध प्रेमानं व्याकुळ झालेले जेल निवासी, त्याला परत ये असं आग्रहानं सांगतात. हा निरोपाचा समारंभ साधासुधाच असतो. पुष्पहार गळ्यात घालणं, गुच्छ हातात देणं, असला नकलीपणा त्यात नसतो.

युनिव्हर्सिटीतून बाहेर पडलेल्या डिग्री होल्डरची डिमांड वाढलेली असते. विरहाचं दुःख विसरून तो आपल्या ज्ञानाचा उपयोग करण्याचे सन्मार्गाला लागतो. पदवीधर जसा इतरांना तुच्छ लेखतो, त्या प्रमाणे जेल युनिव्हर्सिटीतून बाहेर पडलेला अपराधी, इतर गुन्हेगारांना तुच्छ समजतो. वस्ताद होण्याची कुवत त्याच्यात आलेली असते.

शेख इस्माइलनं त्याचा व्यवसाय चालू ठेवला आहे. वस्ताद होण्याची लायकी त्याला प्राप्त झाली की नाही हे सांगता येणार नाही. जेल युनिव्हर्सिटी हा वेगळा विषय आहे. या शाळेचं स्वरूप कसं असतं याची थोडीफार कल्पना वाचकांना यावी या हेतूनं हा लेख लिहायला घेतला आहे. शेख इस्माईल, अन्नू गोंड, सिकंदर, हेमा, सुरेश, रफीक ही शाळकरी पोरं!

या चोरीच्या अपराधाचे संदर्भात नवरंगदादाला पकडायला वेळ लागला नाही. पोलीस आपल्याकडे येणार हे त्याला माहीत होतं. शेख इस्माइलनं त्याच्या घराचा पत्ता दिला होता. दिवस निघायच्या आत

तो कामठी सोडायचा, नागपूरला येऊन तो आपल्या चेल्याकडून गुन्हे करवून घ्यायचा. रात्री केव्हातरी घरी यायचा, असाच रात्रीच्या समयी तो घरी आला असताना पकडला गेला. त्याला पकडून माझ्यासमोर आणण्यात आलं.

नजरेत भरण्यासारखं त्याचं पिळदार शरीर होतं. भारदस्त मिश्या त्याच्या चेहऱ्याला भव्यपणा आणीत होत्या. त्याचे गाल टोमॅटोसारखे लालसर अन् फुगलेले होते. त्याच्या गौरवर्णाला शोभा आणणारं नाक सरळ होतं. अंगात बंगाली टाईप फुल बाह्यांचा शर्ट घातलेला होता. निळसर चौकडा असलेली लुंगी नेसलेली होती. बंगाली शर्टातून त्याची भरदार छाती उठून दिसत होती. त्याला पाहून हा पहेलवान आहे हे शेंबडं पोरही सांगू शकलं असतं. त्याला यापूर्वी मी कधी पाहिलेलं नव्हतं. पोलीसठाण्यात आणल्यानंतरही त्याच्या चेहेऱ्यात फरक झाल्याचं दिसत नव्हतं. मला उगीचंच पकडून आणलंय, आपल्याला पकडण्यात पोलिसांची भलतीच गफलत होत आहे, असा भाव त्याच्या चेहेऱ्यावर होता.

'नाव काय तुझं ?' त्याच्याकडे पहात मी म्हणालो.

'नवरंग पहेलवान म्हणतात मला' त्यानं उत्तर दिलं.

'तू इतके दिवस फरार का राहिलास ?'

'मी फरार नव्हतो. नागपूरला कामधंद्याला जात होतो. फरार रहायचं मला कारण नाही. मी कोणताही गुन्हा केला नाही. तुमचं रेकॉर्ड पाहून घ्या. आजवर कधी पोलीसठाण्याची पायरी चढलो नाही.'

'वाऽ छान ! म्हणजे तू काहीच अपराध केला नाहीस असं तुला म्हणायचंय, पण लक्षात ठेव माझ्याशी गाठ आहे. मी विचारतो त्या प्रश्नाचं उत्तर दे' मी म्हणालो व त्याला विचारले, 'शेख इस्माइलला, अन्नूला, सिकंदर, हेमा, सुरेश, रफीक यांना तू चोरी करायला शिकवलंस की नाही ? हॉटेलच्या मागच्या खोलीत कॉंग्रेस कमेटीचं चोरी गेलेलं सामान मिळालं ती खोली तुझीच आहे.' त्याच्या चेल्यांची नावं ऐकून तो चपापला.

'मी स्वत: कधी चोरी केली नाही तर इतरांना चोरी करायचं शिकवणार कसा? साफ खोटं आहे हे. शेख इस्माइलसारख्या पोराचं ऐकून त्यांच्यावर भरोसा ठेवून मला पकडण्यात काय अर्थ? ज्या खोलीच्या संबंधानं आपण विचारलंत, ती खोली माझी नाही. हॉटेल-वाल्याची आहे. आपण चौकशी करू शकता. पंजाब्याशी लढत दिली आहे मी. कुस्त्या खेळून फड गाजविले आहेत मी. नामांकित पहेलवानां-मध्ये माझी गणना होते हे आपणास ठाऊक असेलच' नवरंगदादा असे पुरावे सादर करीत होता की वाटावं निरपराधी माणसास पोलिसांनी पकडून अन्याय चालविला आहे.

'आपण नावाप्रमाणंच वस्ताद दिसता. तू चोर असून कोतवालास दाटतो आहेस. वस्ताद! तुझ्या चेल्यांनी सगळं सांगितलं आहे. ती खोली नसेल तुझ्या नावावर, पण तिथं तू कोणते धंदे करीत होतास हे माहीत झालं आहे. पोलीस रिमांड घेऊन तुला बोलता करायला लावतो मी' असं मी म्हणताच वस्तादच्या कपाळावर घामाचे दवबिंदू दिसू लागले. फड जिंकणारा नामांकित पहेलवान 'पोलीस रिमांड' हा शब्द ऐकून गर्भगळीत झाला. तो काही बोलत नाही असं पाहून मी म्हणालो, 'वस्ताद, मला तुझे धंदे माहीत झाल्यावरच मी तुला पक-डायचे आदेश दिले आहेत. तू स्वत: चोरी केली असं म्हणता येणार नाही पण तू चोरी करवली आहेस, तसंच चोरीचा माल स्वत: घेतला आहेस. चोरी करण्यापेक्षा चोरी करवणं हा महाभयंकर अपराध आहे. चोरी करायला शिकवणं आणि चोरी करवून घेणं. या दोन्ही गोष्टींची व्याख्या कायद्यात नसली, तरी चोरीचा माल बाळगण्याचा अपराध तू केला आहेस हे विसरू नकोस. तसा तू वस्ताद आहेसच. पण मी ही तुझ्यासारखे बरेच वस्ताद जेलमध्ये घातले आहेत.' कानात शिसं ओतावं तसे माझे शब्द त्याच्या कानी पडत होते. त्याचं उसनं अवसानं पार गळून गेलं होतं. कारण मी धोबीपछाड मारून त्याला चारी मुंड्या चीत केलं होतं. त्याचा अबोला हीच त्यानं गुन्हा केल्याची कबुली होती.

'वस्ताद ! तुला मी न्यायालयासमोर उभं करणार यात काही शंका नाही. कोर्ट निकाल काय देईल तो देईल ! घरफोडी चोरी करायला तू शिकवीत होतास की नाही ?' मी सरळ सरळ प्रश्न केला.

'आपणाला माहीत आहे मग मला बोलायला का लावता ?'

'तुला असं म्हणायचं आहे का की चोरी करायचं शिक्षण कसं देतात ते मला माहीत आहे ? तुझी समजूत चुकीची आहे. चोराला शोधून काढणं माझ्या हातचा मळ आहे. तू पोरांना कसं शिकवतोस ? हे मला सांग '

'आपण मला असा प्रश्न विचाराल याची कल्पनाही मी केली नव्हती. चोरी करणं सोपं आहे. तितकंच चोरास शोधून काढणं कठीण आहे. चोरी करीत असताना चोर पकडला गेल्याची अपवादात्मक उदाहरणं देता येतील. या कारणामुळं चोरीचा हा सोपा, साधा आणि सरळ गुन्हा करायचा मार्ग मी या पोरांना शिकवला.'

'चोरी करणं साधं अन् सोपं असतं असे वस्तादनी सांगितल्यावर मी त्याला विचारलं, 'चोरी करणं सोपं कशावरून ?' वस्तादकडून माहिती काढण्याच्या उद्देशानं मी विचारलं. चोरी करणं सोपं असतं हे मलाही माहीत नव्हतं. तसं पाहिलं तर प्रत्येकजण लहान मोठ्या प्रमाणात चोर असतो. चोरी करायला सुरवात पेन्सिली चोरण्यापासून होत असावी. स्लेटच्या पेन्सिलीचे तुकडे बहुधा प्रत्येकजण चोरतो. त्यातल्या त्यात प्रगती केलेली पोरं मास्तरचा डोळा चुकवून खडू चोरतात. पेन्सिली, खडू, पेन, पुस्तकं, वह्या, कंपास, कलर बॉक्स अशा चोऱ्या बहुधा प्रत्येकाच्या हातून घडतात. 'चोरी करणं सोपं असतं ' या त्याच्या वाक्यानं विचाराचं वादळ उठलं, पेन्सिलीच्या तुकड्यापासून ते खाऊकरिता घरातल्या टेबलावरचे पैसे उचलल्याचं आठवू लागलं. 'मेल्या ! दुसऱ्याच्या पेन्सिली चोरतोस, टेबलावरचे पैसे न विचारता घेतलेस ' हे मातोश्रीचे शब्द आठवले. त्या पाठोपाठ पाठीवर बसलेले रपाटे आठवले. चोरीच्या कसबाचा तिथंच शेवट झाला,

वस्ताद सांगू लागले, 'सोपं असतं याचं कारण पाच, सहा बाबी ध्यानात ठेवल्या की काम आटोपतं. पहिली महत्त्वाची बाब घरात, दुकानात किंवा ज्या ठिकाणी प्रवेश करायचा असतो तेथे प्रवेश कसा मिळवायचा हे पहायचं, दिवसा ते ठिकाण पाहिलं जातं, डुप्लीकेट चावीने कुलूप उघडून, कुलूप तोडून, कडी तोडून दरवाजा उघडता येतो. आतून कडी असल्यास छिद्र करून हात घालून कडी काढता येते. व्हेंटिलेटरमधून हात घालून बोल्ट काढता येतो. भिंतीस छिद्र करून आत जाता येतं. अलीकडे सिमेंट काँक्रीटच्या बिल्डिंग्ज असल्याने शहरात हा प्रकार करून प्रवेश मिळवता येत नाही. प्रवेश मिळाला की पुढचं काम सोपं असतं. हे प्रकार करायला मोजकी अवजारं लागतात, ते आपणास माहीत आहेच.' या प्रकारांची माहिती पोलिसांना असते. त्यांच्या शिक्षण पद्धतीची माहिती काढून घ्यायच्या उद्देशाने मी विचारले, 'तुझ्या टोळीतल्या पोरांना तू कसा शिकवतोस ?'

'रोज सकाळी टोळीतले सर्वजण एकत्र जमतात. तुम्हा पोलीसांचा रात्री आठ वाजता रोलकॉल होतो. सर्वजण हजर असतात. रोलकॉलवर त्याचं ड्यूटी वाटप होतं. आम्ही सकाळीच ड्यूटी वाटप करतो. आमची हद्द ठरलेली असते. दुसऱ्या वस्तादच्या हद्दीत आमच्या टोळीतला कुणी सहसा फिरकत नाही. ड्यूटी वाटप करताना एस्. टी. स्टॅण्ड, रेल्वेस्टेशन, सिनेमा थिएटर्स, आठवडी बाजार अशा गर्दीच्या ठिकाणी त्यांना पाठवलं जातं. घरफोडी चोरी करणारे वेगळे असतात. त्यांना दिवसा घर अथवा दुकान हेरून ठेवायचं असतं, टोळीतले सर्वजण हजर आहेत की नाही याची खात्री केली जाते,' वस्ताद सांगत होते. मधेच मी विचारलं, 'समजा एखादा कोणी गैरहजर राहिला तर ?'

'त्याची चौकशी होते. सिंहाच्या गुहेत शिरलेला एक वेळ परत येऊ शकेल पण आमच्या टोळीतला माणूस टोळी सोडून जात नाही.'

'हे मला पटत नाही. अरे! कुणाला सुबुद्धी सुचली व त्यानं चोरी करायचं सोडून दिलं तर तो हजर रहाणं शक्य तरी आहे काय ?' मी म्हणालो.

'टोळी सोडून जाण्याचा परिणाम काय होईल हे त्याला माहीत असते! त्याचा खून देखील होऊ शकतो. टोळीतले सर्वजण त्याच्या पाळतीवर असतात. आपलं बिंग तो पोलिसांना सांगून पकडून देईल ही भीती असते.' त्याचं बोलणं तीरासारखं हृदयात खोलवर रुतत होतं. अपराध्यांना सुधारण्याचा प्रयत्न करणाऱ्या समाज धुरीणांना हे माहीत झाले तर किती बरं होईल? असं मला वाटलं, सजा भोगीत असलेल्या अपराध्यांना व्यावसायिक शिक्षण देऊन त्यांना अपराधी पेशापासून परावृत्त करण्याचा आटापिटा मानसशास्त्रज्ञ करीत असतात. जेलमध्ये त्यांना व्यावसायिक शिक्षण दिलं जातं. अपराधी बाहेर आला की सुधारण्याऐवजी अपराध करून पुन्हा जेलची हवा खायला जातो. याचं कारण नवरंगसारखे दादा त्यांना सोडायला तयार नसतात.

घरफोडी चोरी करणारांची नावं डोळ्यासमोर येऊ लागली. पोलीस ठाण्यातल्या नोन क्रिमिनल रजिस्टरची पानं फडफडू लागली. प्रेम्या उर्फ प्रेमनाथ पंधरा वेळा जेलमधे जाऊन आला, जेलमधून सुटला की घरफोड्या चोऱ्या करतो. त्याच्या गुन्हेगारी वृत्तीत काडीचाही बदल झाला नाही.

तेजलाल नाई नावाप्रमाणंच घरफोड्या चोऱ्या करण्यात तेज आहे. वीस वेळा सजा भोगल्या आहेत त्यान. तुरुंगातून सुटला की तो चोऱ्या करतो. वीस वेळा सजा भोगूनही त्याचे हृदय पालटले नाही. तो नागपूरला रहातो. त्याच्याकडे कोणी समाजसेवक गेल्याचं दिसत नाही.

ड्राकुलानं एकवीस वेळा तुरुंगाच्या वाऱ्या केल्या आहेत. त्याच्या तुरुंगाच्या वाऱ्या चालूच आहेत. मोमीनपुरा येथे वास्तव्य असलेला हा अपराधी ड्राकुलासारखा भयानक दिसतो. तोंडावर अॅसीड पडल्यानं त्याचा चेहेऱ्यावरची कातडी जळून गेली आहे. तोंडातले समोरचे दोन दात नेहमीकरिता बाहेर डोकावत असतात. त्याचं खरं नाव सलाम असं असूनही त्याला सलाम म्हणून कुणी ओळखत नाही. त्याला पाहिलं की भीती वाटते. त्याचा चेहरा विद्रूप झालेला असला, तरी तो चोरी करण्यात तरबेज आहे.

गुन्हेगारांना उर्फ नावं असतात. त्यांची खरी नावं फार थोड्या लोकांना माहीत असतात. रजिस्टरातील पानं माझ्या डोळ्यासमोर फड-फडू लागली होती. किती तरी गुन्हेगार माझ्या स्मरणात राहिले आहेत ! छोटी चिलम, बडी चिलम, ही चोरट्यांचीच नावं आहेत. फुकटचे पैसे मिळाल्यावर हे पैसे चैनीत उडवले जातात. छोटी चिलमवाला गांजा ओढताना छोट्या साईजची चिलम वापरत असावा. बडी चिलमवाला मोठ्या साईजची चिलम गांजा, अफीम, चरस ओढताना वापरीत असावा. त्यांनी वापरलेल्या चिलमीवरून त्यांना छोटी चिलम व बडी चिलम हे टोपण नाव पडलं असावं.

आरीफ बंबैय्या, छोटा बंबैय्या, बडा बंबैय्या हे सर्व वस्ताद लोक आहेत. मुंबईत जाऊन मुंबईकरांना त्यांनी हात दाखवला असावा म्हणून त्यांना बंबैय्या हे नामाभिधान लोकांनी दिलं असावं.

नागपूरच्या संत्रा मार्केटमधला मधुकर हा प्रथम संत्रीचोर होता. संत्री चोरण्यापासून त्यानं आपली करीयर सुरू केली. संत्री चोरणं सोडून देऊन त्यानं मोठ्या चोऱ्या करण्यास सुरवात केली. वस्ताद भेटला असेल त्याला ! त्याचं नाक चपटं आहे म्हणून 'मधू चपट्या' या नावानं तो ओळखला जातो. बब्बू या गुन्हेगाराचंही नाक बसकं आहे. त्याच्या नाका-वरून तो 'चिनी बब्बू' म्हणून ओळखला जातो. बब्बू हे लाडिकपणानं ठवलेलं नाव आहे. त्यांचा फाजील लाड केला गेल्यानं तो चोर बनला असावा. बब्बू नावाच्या एका चोरट्याचं नाव 'बब्बू' दातऱ्या आहे. त्याचे दात पुढं आलेले आहेत. समोरचे दात ओठाबाहेर दिसत असतात म्हणून त्यास 'दातऱ्या' ही पदवी बहाल करण्यात आली असावी.

बब्बू तांबड्या मला अपवाद वाटला. त्याचा वर्ण डांबराशी स्पर्धा करणारा असताना त्याला 'तांबड्या' असं का म्हणत असावेत, हे कोडं मला सोडवता आलेलं नाही.

नबावाला शोभून दिसावी अशी मिजासखोरी करणारे चोर आहेत. त्यांच्या नावापुढं किंवा नावामागं नबाब ही पदवी जोडलेली असते. नबाब खच्चड यानं चोरी करण्याचं रेकॉर्ड ब्रेक केलं असावं. त्याला कळू

लागलं, तसं तो चोऱ्याच करतो आहे. तो जेलमधे नसेल तर जेलरला चुकल्याचुकल्यासारखं वाटतं.

नवावप्रमाणं महाराज, वस्ताद, पहेलवान, सुकड्या, भुऱ्या, ही नावं आढळतात.

एका गुन्हेगाराला हिटलर नावानं ओळखतात. जर्मन, जापान अशी नावंही ऐकू येतात, अपराध्यांचं जग वेगळं असतं. सामान्य माणसाला या जगाची पुसटशी देखील कल्पना नसते.

एकदा तर हवालदार शंकरराव माझ्या ऑफीसात आले. 'साहेब! मी फौजदारास पकडून आणलं आहे' असं सांगू लागले.

फौजदारास पकडलं असं ऐकल्यावर मी स्वतःला सावरलं अन् म्हणालो, 'काय म्हणता! फौजदारास पकडलं'.

'हे फौजदार म्हणजे आपल्या खात्यातला अधिकारी नव्हे. भिम्याला पकडलंय. तो चोऱ्या करतो. त्याला फौजदार म्हणून ओळखतात' हा त्यांचा खुलासा ऐकून माझा जीव भांड्यात पडला.

हवालदार, फौजदार, कप्तान, बॉस, 007, अशी अनेक उपनावं असलेले गुन्हेगार आहेत.

एकदा कानफाट्या नाव पडलं की त्याच नावानं तो ओळखला जातो. सजा पावलेल्या गुन्हेगारास समाजात स्थान नसते. त्यांना कुठेही नोकरी मिळत नाही. पोलिसांचा ससेमिरा चालूच असतो. ह्याचं नाव रेकॉर्डवर आलं की रात्री, अपरात्री पोलीस त्याला चेक करायला जातात. कोठेही चोरी झाली की त्याला पोलिसाचं बोलावणं आलंच म्हणून समजा.

नवरंग पहेलवान बोलत होता. माझं विचारचक्र चालू होतं.

'चोरीचा माल तू घेतलास की नाही?' मी नवरंगला विचारलं.

'शेख इस्माइलनं मला कॉंग्रेस कमेटीचा माल दिला होता. मी गुन्हा कबूल केला आहे'. नवरंग म्हणाला.

नवरंग वस्तादला मी गजाआड केलं, घरफोडी चोरीच्या गुन्ह्यात त्याची पोलीस कस्टडी रिमांड घेण्यात आली. आणखी काही दिवस त्याला विचारपूस करायची होती. विचारपूस हा शब्द पोलीसखात्यात रूढ झालेला शब्द आहे. विचारपूस करण्याच्या अनेक पद्धती आहेत. लोक कोर्ट कचेरीची पायरी चढण्यास घाबरत नाहीत. नवरंगचंच घ्या ना! कायदा कोळून प्याला आहे तो! चोरी करणं साधं, सोपं आणि सरळ असतं असं तो सांगतो. चोर पकडला जाण्याची शक्यता फार कमी असते. चोरी प्रकरणाचा तपास हा कधी साधा, सोपा व सरळ असू शकत नाही. चोर पकडला गेला तरी, तो चोर आहे, त्यानंच चोरी केली आहे हे सिद्ध करताना अनेक अडचणी येतात. चोरीस गेलेला माल ओळखू येण्याजोगा असेल व तो चोरट्याकडे सापडला असेल तर त्याला शिक्षा होण्याचा संभव असतो.

साधा चोर कोणत्याही वस्तूची चोरी करील पण असली चोर कॅश, नोटा, सोन्या–चांदीचे दागिने या वस्तूंखेरीज दुसऱ्या जिनसाला हात लावणार नाही. सोन्या–चांदीचे दागिने गाळून टाकता येतात. कॅश व नोटा हा माल असा आहे की ज्याच्या तो घरातून चोरला त्याचाच आहे हे सांगता येत नाही.

नवरंगदादानं त्याच्या टोळीकरिता वापरण्यास घेतलेली खोली, त्याच्या नावावर ठेवली नाही. स्वत: चोरी न करता, त्याच्या शिष्य-गणाला तो चोऱ्या करायला लावतो. या कारणामुळेच तो कधी पकडला गेला नव्हता. तो आता पकडला गेला असला तरी त्याला शिक्षा होणार नव्हती. माझं मन ओरडून सांगत होतं, 'शेख इस्माइलपेक्षा हा भयंकर गुन्हेगार आहे.' न्यायालयास ओरडून ओरडून सागावंसं वाटत होतं की नवरंगला शिक्षा झाली पाहिजे. माझ्या ओरडण्याचा परिणाम काहीच होणार नव्हता. कायद्यानंच पोलिसांवर अविश्वास व्यक्त केला असल्यानं, तेथे माझ्या ओरडण्याचा काय उपयोग?

मधु चपट्यानं संत्रा व्यापाऱ्याच्या दुकानातली कॅश पळवली होती. भालदारपुरा चौकीचे हेड कॉन्स्टेबल माताप्रसाद यांनी त्याला कॅशसह

पकडलं. चांगले पाचशे रुपये त्याच्या खिशात मिळाले होते. मधूला त्या-वेळी मी विचारलं, 'कोठून चोरलेस हे पैसे'.

'संत्रा दुकानातून' त्यानं गुन्हा कबूल केला होता.

संत्रा व्यापारी पटेल यांनी कैफियत दिली होती. ते पोलीस ठाण्यात हजर होते. ते मधूला पाहून म्हणाले, 'हाच तो चोरटा असावा. त्याला पळताना पाठमोरा पाहिला आहे मी.'

'माताप्रसाद, पाचशे रुपये जप्त करा' मी म्हणालो. हेड. कॉं. माताप्रसाद यानी पाचशे रुपये जप्त केले. मधू चपटयावर दोषारोप पत्र पाठविलं गेलं.

पाचशे रुपये हे पटेल यांचेच होते ते फिर्यादी पक्षाला सिद्ध करता आले नाहीत म्हणून तो निर्दोष सुटला. जप्त झालेले पाचशे रुपये मधूला परत करावे असा आदेश झाला. त्या आदेशाप्रमाणे चोरी केलेले पाचशे रुपये मधू चपटयानं परत घेतले. कोर्टाकडून मिळालेल्या नोटा मोजीत तो संत्रा व्यापारी पटेल यांच्या समोरून दिमाखानं निघून गेला. चोर-टयानं राजरोसपणे नोटा परत घेतल्याचं पाहून, त्या संत्रा व्यापाऱ्याला काय वाटलं असेल त्याची कल्पना केलेली बरी !

मधू चपटयाजवळ पाचशे रुपये मिळाले होते. दुकानापासून त्याला थोडया अंतरावर पकडण्यात आलं होतं.

'तू कोठून हे पैसे आणलेस ? तुझ्या जवळ हे पैसे कसे आले ?' याचा खुलासा त्याला विचारला गेला नाही. कायद्यातच तशी तरतूद नाही. फिर्यादी पक्षावर सर्व जबाबदारी टाकून कायदा मोकळा झाला आहे. मधूनं चोरी केली हे सूर्यप्रकाशाइतकं स्वच्छ होतं. चोरालाच पैसे परत करण्याचे अनेक प्रसंग माझ्यावर आले आहेत. शितावरून भाताची परीक्षा करायची असते. चोरी करणं याच कारणासाठी साधं, सोपं आणि सरळ असतं !

चोराला पैसे परत करण्याचं दुर्भाग्य प्रत्येक पोलीस अधिकाऱ्याच्या वाटयाला येत असतं. चोरलेल्या मालाचा अधिकृत मालक झालेला

असतो तो ! तो माल त्याला राजरोसपणे वापरता येतो. त्या मालाचा खरा मालक चोरट्या नजरेनं हे पहात असतो. त्याचा रोष पोलिसांवर असतो. पोलीस काहीही करू शकतात ही भावना रूढ व्हायला, हे प्रकार कारणीभूत आहेत. पोलिसांनी तपास बरोबर केला नसेल असं त्यांना वाटतं. पोलीस आणि चोर याचं मेतकुट जमल्यामुळेच चोराला पैसे वापस मिळाले अशी त्यांची भावना होते.

नवरंग पहेलवान पोलीस कस्टडीत होता. त्याच्या टोळीची विल्हेवाट लागली होती. तो पोलीस कस्टडीत असेपर्यंत त्याच्या टोळीचे अनेक प्रताप मला शोधून काढायचे होते. सवड मिळाली की त्याला लॉकअपमधून बाहेर काढून प्रश्नांची सरबत्ती मी चालू ठेवीत असे.

लॉकअपमधून बाहेर काढल्यावर मी त्याला विचारलं, 'नवरंगदादा ! तू मागे सांगितलंस की आम्ही ठराविक एरियात गुन्हे करतो. तुझी एरीया कोणती ?'

'कामठी शहरापुरती एरीया आहे माझी. कामठी शहराच्या बाहेर आमच्या टोळीतले लोक जात नाहीत,' तो म्हणाला.

'रेल्वे स्टेशनवर जात असाल तुम्ही.'

'रेल्वेवर गुन्हे करणाऱ्या टोळ्या वेगळ्या आहेत. नागपूर रेल्वे स्टेशनवरून हे गुन्हेगार येतात. त्यांची हद्द कन्हानपर्यंत आहे. तसं ते रेल्वेनं दूरपर्यंत जातात.' त्यानं माहिती दिली.

'समजा तुझ्या टोळीतल्या अपराध्यास नागपूरला जायचं झालं तर ?' मी प्रश्न उपस्थित केला.

'त्या भागातला वस्ताद पैसे वसूल करतो. अर्थात कमिशन दिलं जातं.'

'त्याला कळणार कसं ? तुमच्या टोळीतल्या माणसानं गुन्हा करून चोरी केली आहे ते.'

'चोरीच्या धंद्यात लवाडी चालत नाही. सचोटीचा धंदा आहे. स्वतःहोऊन त्याच्याकडे जाऊन पैसे द्यावे लागतात. कोणी बेईमानी

केल्याचं दिसून आलं तर त्याला मारपीट होते. चाकू, गुप्त्या यांचा वापर होतो. एखादं सावज दुसऱ्या हद्दीत गेलं तर तेथल्या गुन्हेगारांच्या चार्जात त्याला देण्यात यतं. सावजाची माहिती दिल्याबद्दल परसेन्टेज मिळतं.' नवरंग म्हणाला.

चोरीच्या धंद्यात लबाडीला थारा नाही. पण चोरीची व्याख्या लबाडी या शब्दाशिवाय पुरी होत नाही. चोरी करताना लबाडीचा इरादा असावा लागतो. लबाडीचा इरादा नसेल तर ती चोरी होत नाही.

'कामठी, नागपूर येथील वस्ताद कोण आहे ?' मी विचारलं.

'कामठीशिवाय इतर ठिकाणी कोण वस्ताद आहेत हे मला माहीत नाही ' नवरंगनं ही माहिती देण्यास नकार दिला.

'दुसऱ्या टोळीची माहिती द्यायला काय हरकत आहे ?'

'दुसऱ्या टोळचा कुणाच्या आहेत हे मला माहीत नाही ' त्यानं सांगितलं, नवरंगदादानं दुसरे कोणते गुन्हेगार वस्ताद म्हणून काम करतात हे सागांयचं टाळल होतं.



पाच

# मूर्ती चोर

चोर शब्द माहीत नाही असा कुणी सापडेल असं वाटत नाही. चोर असल्याशिवाय चोरी होत नाही अन् चोरी केल्याखेरीज कोणास चोर आहे असं म्हणता येत नाही. इंडियन पिनल कोडमध्ये चोरीची व्याख्या कशी केली आहे हे कुणी पहात बसत नाही. दुसऱ्याची वस्तू त्याच्या नकळत लपवून घेऊन जाणं असा साधा चोरीचा अर्थ सर्वांना ठाऊक आहे. चोरांची झळ माणसानांच काय पण देवांनाही पोहचते. चोरांची झळ आम्हाला कधीच पोहचली नाही, असं छातीठोकपणे सांगणारे लोक एक तर स्वत:ची प्रतारणा करीत असतात किंवा या ना त्या प्रकारानी त्यांचा चोराशी जवळचा संबंध आला असला पाहिजे, असं समजण्यास हरकत नाही. मौल्यवान वस्तूंचीच चोरी होते असं नाही. टेबलावर पडलेले स्टेनलेस स्टीलचे चमचे चोरणारे चोरही आहेत. लहानपणी आपण चोर चोर खेळण्याचं आठवत असेल. चोर चोर खेळात पोलीस असावा लागतो. पोलीस असल्याशिवाय चोराचा पाठलाग कोण करणार ? शाळेत विरुद्ध अर्थाचे शब्द शिकवले जातात, जसे रात्र-दिवस, गरीब-श्रीमंत, पुरुष-स्त्री वगैरे. तसेच पोलीस हा चोर या शब्दाच्या विरुद्ध अर्थाचा शब्द आहे. पोलीस नेहमीच चोरांचा शोध घेत असतात अन् चोर त्यांच्याची लपाछपीचा खेळ खेळत असतात. काय चोरावं याचं ताळतंत्र चोरांना असतं. देवाच्या मूर्तीला देखील ते हात दाखवतात. पोलीस खात्यात असल्यानं

चोराशी माझा संबंध येणं सहाजिकच आहे. चोरांचा तपास करणं पोलिसांच्या पाचवीलाच पुजलेलं असतं. रोग्यांची नाडी डॉक्टरला समजते, तसं पोलिसांना चोरांची नाडी माहीत असते. अनेक चोरटे माझ्या हातून पकडले गेले आहेत. त्यातून काही प्रसंग असे आहेत की मी ते प्रसंग विसरायचं ठरविलं तरी त्याचा विसर पडणं शक्य नाही.

अशीच एका प्रसंगी अंबादेवीची पितळेची मूर्ती चोरणारे मी पकडले आहेत. या केसमध्ये चोरीस गेलेली मूर्ती मौल्यवान होती असं नाही. सोन्या, चांदीची, हिऱ्यामोत्यानं मढवलेली मूर्ती शोधून काढण्याचा सनसनाटी प्रकार घडला होता असं नाही. तीन किलो वजनाची पितळेची मूर्ती होती ती. देवळातून देवीची मूर्ती नाहिशी झाल्यानं सारं गाव हळहळलं होतं. कसलाही धागा दोरा हाती नसताना मूर्ती चोरांना पकडण्यात यशस्वी झालो होतो. कागदावर चोर पकडण्याचा तो प्रकार आहे कागदावर चोर पकडणं शक्य तरी आहे का ? असा प्रश्न तुमच्या-समोर उभा राहील. या प्रकाराला इंग्रजीत 'To catch a thief on paper' असं म्हणतात. ज्या गावी चोरी झाली त्या गावचंच नव्हे तर आजूबाजूच्या गावांचं पाच वर्षांचं गुन्ह्यांचं रेकॉर्ड मागवून, त्यावरून अचूकपणे मी चोरट्यांना अटक केली होती. कागदावर चोर पकडणं; या प्रकाराशिवाय कल्पिताहूनही विस्मयजनक असं काही तरी प्रत्ययास आलं. त्याचा कायमचा ठसा मनावर उमटला आहे.

या प्रसंगाची आठवण आली की अंबादेवीची मूर्ती मन:चक्षूसमोर येते. अशी मूर्ती माझ्या पहाण्यात आलेली नव्हती. मूर्तीकडं पाहिलं की वाटतं ती आपल्याकडं बघून हसते आहे. तिचा हसरा चेहरा पाहून मन प्रसन्न होतं. डोक्याकडे नजर फिरवली की तिच्या केसांच्या मधोमध असलेल्या भागावर नजर स्थिरावते. कपाळावर दोन्ही बाजूला सारख्या अंतरावर केसांचं वळण दिसतं. भिवयांच्या मधोमध कुंकवाचा टिळा लागलेला आहे. मूर्तीच्या डोळ्याकडे पाहिले तर त्यावर नजर ठरत नाही. टपोरे डोळे पाहून हरणांच्या डोळ्यांची आठवण येते. गळ्यात मंगळसूत्र असून मूर्तीला असलेले दोन्ही हात आशीर्वाद देत आहेत असं

वाटतं. दोन्ही हातात बांगड्या घातलेल्या. अशी ती अंबादेवीची मूर्ती या प्रसंगाची आठवण आली की जशीच्या तशी दिसू लागते. प्रथम जेव्हा ही मूर्ती माझ्या हाती आली त्यावेळी मी कितीतरी वेळ तिच्याकडं पाहात राहिलो.

या सत्य घटनेचा प्रारंभ दिनांक १२–९–१९७१ रोजी झाला. ती वेळ सकाळी १० वाजण्याची होती. मी बाळापूर पोलीस स्टेशनमध्ये माझ्या ऑफिसात बसलो होतो. सकाळी १० वाजता पोलीस स्टेशन गजबजून गेलेलं असतं. आदल्या दिवशी अटक केलेले गुन्हेगार कोर्टा-समोर न्यावे लागतात. त्यांच्यापैकी काहींना पोलीस कस्टडी रिमांडमध्ये घ्यायचं असतं तर काहींना मॅजिस्ट्रेट कस्टडीत रवाना करायचं असतं. दोषारोप पत्रकं कोर्टात पाठवायची असतात. इन वर्ड आऊट वर्ड रजिस्टर लिहिणारा टपाल पाठवण्याच्या कामात व्यस्त असतो. लॉक अप रूममधून कोर्टात पाठविण्याकरिता गुन्हेगारांना बाहेर काढण्याचे काम चालू असते. त्यांच्या हातातील बेड्यांचा खळ् खळ् असा आवाज येत असतो तर व्हरांड्यातून जाणाऱ्या येणाऱ्या शिपायांच्या बुटांचा खाड् खाड् असा आवाज ऐकू येत असतो. यावेळी कोणत्याही पोलीस ठाण्यात जा, हेच चित्र दिसून येईल.

ड्यूटी वाटपाचं रजिस्टर घेऊन मी ड्यूटी वाटप बरोबर झालं आहे की नाही हे पहात बसलो होतो.

कॉन्स्टेबल युवराजनं आत येऊन विचारलं, 'देगांवचे पोलीस पाटील व गव्हाळे सरपंच भेटायला आले आहेत.

'आत पाठवून दे त्यांना', असं मी म्हणताच तो बाहेर गेला. देगांवचे त्रिवकराव पोलीस पाटील माझ्या चांगले परिचयाचे होते. पोलीस पाटील व सरपंच ही जोडगोळी आली आहे तेव्हा देगांवची काहीतरी भानगड असणार असा विचार करीत असतानाच दोघेही माझ्या ऑफिशात आले.

त्यांना पहाताच मी म्हणालो, 'या पाटील' असं म्हणून मी त्यांना खुर्चीवर बसण्याचा निर्देश केला.

माझ्या टेबलासमोरच्या खुर्च्यांवर दोघेही बसले. त्यांचे बसून झाल्यावर मी त्यांना विचारलं, 'काय खबर आहे ?'

'तसं काही विशेष नाही तुमच्या कानावर घालावं; म्हणून आम्ही दोघंही आलो आहोत.'

'कानावर घालावं म्हणजे ! जे काय घडलं असेल ते सांगा काही आडपडदा ठेवू नका.' माझ्या या बोलण्यानं धीर आला असावा.

ते म्हणाले, 'आज सकाळी नेहमीप्रमाणे तुळशीराम गव्हाळे देवीची पूजा करायला गेले. पहातात तो मंदिरात देवीची मूर्तीच दिसली नाही. गाव सारं पालथं घातलं पण मूर्ती सापडली नाही.'

'मग नाहिशी झाली कशी ही मूर्ती ?' मी म्हणालो.

'कुणीतरी चोरली असावी. सारं गाव हळहळलं ही वार्ता ऐकून. देवीचं दर्शन घेणारे मंदिरात येऊन गेले. दसऱ्याचा सण तोंडावर आला आहे. गावची जत्रा भरणार आहे हे आपल्या कानावर असावं म्हणून सांगायला आलो आहे' मूर्ती चोरी झाल्याचं ऐकून ठाणेदार संतापून आपल्यावरच राग काढील असं त्यांना वाटत होतं.

'पाटील, असं कानावर घालून चालणार नाही तुम्ही चोरीचा रिपोर्ट द्या.' असं मी म्हणताच त्यांनी आपल्या खिशातून रिपोर्ट काढून टेबलावर ठेवला.

'रिपोर्ट मी लिहून सोबत आणला होता. रिपोर्ट द्यावा की नाही असा विचार करीत होतो. आपण सांगितलं म्हणून देत आहे' असं पाटील म्हणाले.

'रिपोर्ट द्यावा की नाही अशी शंका यायचं कारण काय ?' मी विचारलं.

'तुमचं म्हणणं बरोबर आहे पण आमचंच मन आम्हाला खात होतं. एक तर मंदिर जुनाट झालेलं. तशात मंदिराचे दरवाजे पार मोडून गेलेले आहेत. आम्ही दरवाजे बसविले असते तर मूर्तीची चोरी झाली नसती. तुमच्यापर्यंत येणं भाग होतं. नवरात्रीत घटस्थापना होत

असते. दसऱ्याच्या दिवशी देगांवला जत्रा भरते. आसपासचे खेडूत दर्शनाला येत असतात. मूर्ती शोधून काढलीत तर जत्रेला येणाऱ्या लोकांना तोंड दाखवता येईल.'

काशीराम गव्हाळे म्हणाले, 'तुमच्यापर्यंत येऊन रिपोर्ट द्यायला मन धजावत नव्हतं. पाटलांनी हिम्मत दिली.'

'आपण दोघेही आलात हे बरं झालं. गुन्ह्याची नोंद घेऊन मी स्वतः हा गुन्हा तपासास घेतो. प्रयत्न करणं माझं काम आहे.'

मंदिरातून मूर्ती चोरी जाण्याचा प्रकार यापूर्वी देगावात झाला नव्हता. मूर्तीचा तपास लावण्यासाठी मी येत आहे हे ऐकून त्रिंबक पाटील म्हणाले, 'देवीची मूर्ती परत मिळवून दिलीत तर गावकरी धन्यवाद देतील आपल्याला.'

'पाहू या काय होतं ते' असं म्हणून मी त्रिंबक पाटलांचे रिपोर्टीवरून भारतीय दंड विधान धारा ३८० प्रमाणे गुन्ह्याची नोंद घेऊन तपास माझ्याकडे घेतला. गुन्ह्याची नोंद घेतल्यावर मी त्यांना म्हणालो; 'आपण देगांवला जा. मी स्टाफसह तपास करण्यास देगावला आजच निघत आहे.' त्यानंतर ते दोघेही देगांवला निघून गेले.

तपासाला हा गुन्हा घेतल्यावर मनात अनेक विचार येऊ लागले. मोठ्या लोकांचे दिवाणखाने सजविण्यासाठी प्राचीन कलाकुसर असलेल्या देवतांच्या मूर्तीचा उपयोग करण्यात येत असल्याचं पेपरातून वाचलं होतं. पितळेची मूर्ती असली म्हणून काय झालं? तिची कलाकुसर प्राचीन असलीच पाहिजे. या मोठ्या लोकांचे एजंट देगांवसारख्या खेड्यात येण्याची शक्यता नव्हती. देगांव हे चार हजार लोकांच्या वस्तीचं गाव. बाळापूर ते अकोला या मेनरोडपासून दहा किलोमिटर अंतरावर आहे. गावात जायला धड रस्ते नाहीत. विचाराची ट्रेन चुकीच्या मार्गावरून चालली होती. पेपरात वाचतो त्या टोळ्या अशा मूर्ती परराष्ट्रात देखील पाठवतात असं वाचलं होतं. देगांवला घडलेला प्रकार वेगळा होता. तेथे असे एजंट येण्याची सुतराम शक्यता नव्हती.

विचारांचा सांधा बदलल्यानं ट्रेन योग्य मार्गावरून धावू लागली होती. गावातलाच भुरटा चोर असावा. देगांवचं रेकॉर्ड पाहिलं परंतु त्यात मूर्तींच्या चोऱ्या करणारांचा उल्लेख नव्हता. वेळ गमावण्यात अर्थ नव्हता. देगावला जाऊन तेथे तळ ठोकायचा असा मी विचार केला.

देगांवला जायच्या अगोदर साध्या कपड्यातील कॉन्स्टेबल्स अकोला, खामगाव, अमरावती, नागपूर येथे पाठविले. त्यांच्याजवळ चोरीस गेलेल्या अंबादेवीचं वर्णन असलेलं लेटर देण्यात आलं होतं. सराईत मूर्ती चोरांची माहिती घेऊन त्यांच्या हालचालीची माहिती आणण्याची कामगिरी देण्यात आली होती. पितळेची मोड घेणारे तसेच जुने पितळ घेऊन विकणारे व्यापारी असतील तर तेथेही या मूर्तीचा तपास करण्याच्या सूचना देण्यात आल्या होत्या. जेलमधून सुटलेल्या अपराध्यांची माहिती काढून त्यांच्या झडत्या घेण्याचे हुकूम देण्यात आले होते.

साध्या कपड्यातील पोलिसांना रवाना करून मी कॉन्स्टेबल युवराज यास म्हणालो, 'घटनास्थळाला व्हिजिट द्यायची आहे. निघालं पाहिजे.'

'कान्हेरी गावापर्यंत एस्. टी. जाते. तेथून डमनीनं देगावला जाऊ,' युवराज म्हणाला.

'डमनीची जरूरी नाही. कान्हेरी फाट्यावरून पायी जाण्याचा इरादा आहे. त्याचं कारण असं की वाटेत जी गावं लागतात तिथे या प्रकाराची चौकशी करून कुणी नवखे इसम आले होते का? देगाव तील कुणी ही चोरी केली याची माहिती काढता येईल.' असं मी म्हणाल्यावर कॉ. युवराज, हेड कॉ. शिवाजी व आणखी दोन कॉन्स्टेबल असे देगावला निघालो.

एस्. टी. नं कान्हेरी फाट्यापर्यंत गेलो. आम्ही सर्वगण पायी निघालो होतो. रस्त्यात भेटेल त्याला थांबवून या प्रकरणाची चौकशी करीत होतो. घटस्थापनेच्या अगोदर अंबादेवीची मूर्ती शोधून काढण्याचा

मनात चंग बांधला होता. कान्हेरी गावात आल्यावर तेथील पोलीस पाटील श्री. हडोळे गुरुजी यांना बोलावून घेतलं. या बाबतीत त्यांचा सल्ला घ्यायचा होता. ग्राम पंचायत ऑफिसात आम्ही बसलो होतो. तेथे हडोळे गुरुजी आले. त्यांना पाहून मी म्हणालो, 'पाटील आम्ही देगावला चाललो आहोत. अंबादेवीची मूर्ती देवळातून नाहिशी झाली आहे.'

'त्रिवक पाटील बाळापूरला रिपोर्ट देण्यास जाताना भेटले होते. त्यांच्याबरोबर गव्हाळे होते. त्यांच्याकडून मला ही माहिती मिळाली आहे. मूर्ती चोरीचा प्रकार या आधी कधी घडला नाही. तशात दसरा जवळ येत आहे. जत्रा भरायच्या अगोदर मूर्ती मिळाली तर बरं होईल.' असं ते म्हणाल्यावर मी त्यांना विचारलं, 'तुम्हाला काही माहिती सांगता येईल का? मूर्ती कुणी चोरली असावी ?'

'तसा अंदाज करता येत नाही. बाहेरचं कुणी असेल असं वाटत नाही. तीन किलोची पितळेची मूर्ती चोरायला बाहेरचा चोरटा येईल असं वाटत नाही.' त्याचं म्हणणं मला सयुक्तिक वाटलं. हडोळे यांना गुरुजी या नावानंच लोक ओळखत होते. कित्येक वर्षापासून पाटीलकी त्यांच्याकडं होती. त्यांचा अंदाज त्यांनी बोलून दाखविला होता.

त्यांना मी म्हणालो, 'पाटील, तुम्ही म्हणता त्याला बराच अर्थ आहे. बाहेरचा कुणी चोरटा देगावात येऊन चोरी करेल असे वाटत नाही. निघतो मी.' असं म्हणून आम्ही कान्हेरीहून पदयात्रा चालू केली.

पदयात्रा करण्याचा उद्देश असा होता की प्रत्येक गावात पोलीसांना मदत करणारे लोक असतात. त्यांच्याकडून माहिती काढून मूर्ती हस्तगत करणे याच हेतूनं पायी चाललो होतो. वाटेत मानकी गाव आलं. तेथेही पोलीस पाटील, सरपंच अशांना बोलावलं. मी ग्रामपंचायतीत थांबलो. माझ्या बरोबर असणारे हेड कॉन्स्टेबल शिवाजी म्हणाले, 'आपण थोडावेळ ग्रामपंचायत ऑफिसात थांबा. आम्ही गावात मुकबिराकडून काही खबर मिळते का ते पहातो.'

'ठीक आहे. तुम्ही जाऊ शकता.' असं मी म्हटल्यावर ते मानकी गावात गेले. पोलीस पाटील, सरपंच यांच्याकडून मला कसलीची माहिती मिळाली नाही. तशात हेड कॉ. शिवाजी व माझ्या बरोबरचा स्टाफ हात हालवीत परत आला. त्यांनाही काही धागादोरा गवसला नव्हता. कान्हेरी, मानकी येथे अंबादेवीची मूर्ती चोरीस गेल्याची वार्ता माहीत झाली होती. चोरी कोणी केली असावी त्याचा अंदाज देखील कोणाला सांगता आला नाही. काळोखात चाचपडत होतो आम्ही. मानकीहून निघालो तेव्हा सर्वांचीच अंतःकरणे जड झाली होती. पायपीट करीत निघालो. रस्त्यात कुणी भेटलंच तर राम राम ठोकून तो चालायला लागायचा.

देगावला येऊन पोहोचलो आम्ही. नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणं ग्राम-पंचायत ऑफिसात गेलो. पिंपळाच्या झाडाखाली देगावची काही माणसं बसली होती. तंबाखू चघळून पिंक टाकीत होते. पोलीस सब-इन्स्पेक्टर, जमादार, पोलीस आल्याचं त्यांनी पाहिलं, आपसात कुजबुज चालू होती त्यांची. पोलीस पार्टी गावात आल्याची वार्ता पसरायला वेळ लागला नाही. पिंपळाच्या पारावर बसलेली माणसं मी काही आजच पहात होतो असं नाही. पण आजच त्यांच्याकडं पाहून तिरस्कार वाटला मला. यांच्यातलाच कोणी तरी चोरटा असावा अन् त्यानंच आपला सफाईदार हात मूर्तीकडं वळविला असावा असं वाटलं. पोलिसांचं मन संशयी बनलेलं असतं. कुणाचाही ते संशय घेतात. त्यांना ती सवय लागलेली असते. तपासात अनेकदा रिपोर्ट देणारास त्याच्या नोकराचा संशय येत नाही.

'दहा वर्षे झाली आमच्याकडं काम करतोय. त्याच्यावर आमचा संशय नाही. उगाच त्याला त्रास होऊ नये', असं म्हणून ते मोकळे होतात. तपासात त्याच इमानदार नोकराकडं चोरीचा माल मिळतो. या कारणामुळेच देगावातल्या माणसांविषयी माझी नजर साशंक झाली होती.

आम्ही आल्याचं माहीत होताच, पोलीस पाटील, सरपंच व गावातली प्रतिष्ठित मंडळी जमा झाली.

पोलीस पाटलाकडं पाहून मी म्हणालो, 'देवीच्या मंदिराकडे जाऊ. घटनास्थळ पाहिलं पाहिजे.'

'चला,' असं म्हणून पाटील निघाले. त्यांच्या मागोमाग आम्ही निघालो. चार हजार लोकसंख्या असलेल्या या गावात रस्ते नीटनेटके होते. रस्त्याच्या कडेला पाणी जाण्यासाठी नाल्या खोदलेल्या होत्या. ग्रामपंचायत ऑफिसची इमारत भव्य असून समोर बगीचा होता. ग्रामपंचायतीच्या चांगल्या कारभाराचं ते प्रतीक होतं. दोन रस्ते ओलांडून गेल्यावर आम्ही एका मंदिराजवळ आलो. 'हेच अंबादेवीचं मंदिर आहे,' पाटील म्हणाले. दहा बाय दहाच्या चौकोनी चबुतऱ्यावर लहानसं मंदिर दिसलं. मंदिराच्या बाजूस विहीर होती. पायऱ्या चढून मंदिरासमोर गेलो. दारं नव्हतीच. आत प्रवेश केल्यावर दोन फूट उंचीच्या ओटयाकडं नजर गेली. ही मूर्ती ठेवण्याची जागा होती. देवळात देव नसल्यानं मन विषण्ण झालं. गाभाऱ्यात एका बाजूला दिवा ठेवण्यासाठी जागा केली होती. देऊळ जुनं होतं. भिंती केव्हा कोलमडून पडतील त्याचा नेम नव्हता. वरचा गिलावा निघाल्यानं विटा दिसत होत्या. मंदिराची जागा रस्त्यापासून आठ दहा फूट उंचावर होती. देवळाच्या समोर पुजाऱ्याचं घर होतं. काशीराम गव्हाळे याचंही घर मंदिरापासून जवळ होतं. घटनास्थळाच्या निरीक्षणात मूर्ती मिळण्याच्या दृष्टीनं काही दिसून आलं नाही. मंदिराच्या समोरच्या बाजूस मोकळी जागा होती. साधं कुंपण देखील देवळाच्या भोवती नव्हतं. मूर्ती चोरताना त्या चोराला काही कष्ट पडले नव्हते. आत्मा आहे म्हणून शरीरात चैतन्य खेळतं. आत्मा निघून गेला की शरीरात अर्थ उरत नाही. मंदिराकडे पाहून असले विचार येऊ लागले. देवाशिवाय देऊळ पाहून चैतन्य निघून गेल्याचं भासू लागलं. तशात देवळाची हालत पाहून मी देवगांवच्या लोकांकडे पहात होतो. मला म्हणायचं होतं की, 'हीच का तुमची देवभक्ती ? का दुर्लक्ष केलंत ?'

असे विचार मनात येत असतानाच मी तेथे जमलेल्या मंडळीस म्हणालो, 'अंबादेवीनं दार नसलेल्या, भिंती जुनाट झालेल्या मंदिरात

का रहावं ? तुम्हाला तरी आवडेल का पडक्या घरात रहाणं ? देवी तुमच्यावर रुष्ट होऊन गेली आहे. नवीन मंदिर बांधाल तर ती येईल. मीच आणून देईन. मला या कामात यश मिळेल.' सहजपणे माझ्या तोंडून हे उद्‌गार बाहेर पडले. पक्कं देऊळ बांधलं जावं ही मनीषा होती अन् म्हणून मी बोलून गेलो. माझ्या प्रत्येक शब्दानी शरसंधान साधून गावकऱ्यांच्या काळजाचा वेध घेतला होता. अपराधी माणसानं मान खाली घालावी तसे ते माना खाली करून उभे होते. क्षणभर स्तब्धता पसरली. मग कुजबुज सुरू झाली.

'नवीन मंदिर बांधायचा संकल्प गावकऱ्यांनी केला आहे. जत्रा तोंडावर आली आहे. मूर्तीचा शोध घ्या अन् आणून दाखवा.' त्र्यंबकराव म्हणाले. नवीन मंदिर बांधण्याचं माझं आव्हान त्यांनी स्वीकारलं होतं. आता माझ्यावर जबाबदारी येऊन पडली होती. नवीन मंदिर बांधायचा संकल्प करा, मी मूर्ती आणून देतो असं मी म्हणालो होतो. माझ्या उद्‌गाराचं मलाच आश्चर्य वाटत होतं. कोठून आणून देणार होतो मी मूर्ती ? कशाला नाही ते आश्वासन दिले असं वाटू लागलं. काशीराम गव्हाळे यांनी तर वर्गणीचे आकडे घ्यायचं काम चालू केलं. अशा रीतीनं गावकरी आव्हान स्वीकारतील याची कल्पनाही आली नव्हती.

पाटलांना मी म्हणालो, 'आपण नवीन देऊळ बांधणार आहात हे ऐकून आनंद वाटला. माझी जबाबदारी पार पडण्याचा प्रयत्न करतो.' असं म्हणून मी घटनास्थळाच्या पंचनाम्याचे सोपस्कार आटोपून परत ग्रामपंचायत ऑफिसात आलो. भव्य ग्रामपंचायतीची इमारत उभे करू शकणारे गावकरी मंदिर बांधण्याच्या कामाला लागले होते. ही बाब माझ्या लक्षात कशी आली नाही कोण जाणे ! वेडपटासारखं काही तरी बरळून गेलो मी. मी आश्वासन द्यायला माझ्याकडं अल्लाउद्दीनचा जादूई चिराग थोडाच होता !

या गुन्ह्याच्या तपासाकरिता दोन दिवस तळ ठोकून होतो मी देगावला. देगांवचे रेकॉर्ड किती वेळा तरी नजरेखालून घातलं पण त्याचा उपयोग झाला नाही. गावातल्या गुन्हेगारांच्या घरांच्या झडत्या

घेतल्या, या घर झडत्यात मूर्तीचा कोठेही मागमूस लागला नाही. साध्या वेशात पाठवलेल्या पोलिसांकडूनही मूर्तीच्या संबंधात काही माहिती मिळाली नाही. दुसऱ्या दिवशी मी हेड कॉं. शिवाजी यांना मानकी, कान्हेरी, रिधोरा, बारलींगा या गावचे रेकॉर्ड आणण्यास सांगितलं. त्यांनी या गावांचं रेकॉर्ड आणून समोर ठेवलं. या गावांचं रेकॉर्ड पाहू लागलो.

बारलींगा गावची पुस्तिका पाहताना एका ठिकाणी माझी नजर खिळून राहिली. त्या पानावरचा मजकूर पुनःपुन्हा वाचला. या पानावर लिहिलं होतं, पोलीस पाटील बारलींगा यांनी त्यांच्या गोठ्यातील जनावरांच्या गळयातील पितळी घंटा चोरीस गेल्याचा रिपोर्ट दिला होता. या गुन्ह्याचे तपासात नारायण राजाराम शिंत्रे व त्याचा भाऊ महादेव राजाराम शिंत्रे यांना पकडण्यात आलं. त्यांनी लपवून ठेवलेल्या पितळी घंटा काढून दिल्या. या अपराधाबद्दल त्या दोघांनाही प्रत्येकी एक महिन्याची सजा झाली होती. बैलांच्या साजासह या पितळी घंटा जमा करण्यात आल्या. हे दोन्ही अपराधी देगांवचे रहाणारे असल्याचे नमूद केले होते. एक वर्षापूर्वी ही चोरी त्यांनी केली होती.

बारलींगा गावच्या बुकातली ही एन्ट्री वाचून जसं आर्किमिडीज युरेका ! युरेका ! असं ओरडत पळत सुटला तसं पळत जाऊन चोरट्यांना पकडावं असं वाटलं. कागदावर मी चोर पकडला होता.

'शिवाजी जमादार ही हातकडी घ्या. नारायण शिंत्रे व त्याचा भाऊ महादेव शिंत्रे यांना अटक करून माझ्या समोर हजर करा.' मी हेड कॉं. शिवाजी यांना हुकूम सोडला.

'सर, मी त्यांच्या झडत्या घेतल्या आहेत. चोरीचा माल मिळाला नाही.'

'तुम्ही अगोदर त्या दोघांनाही अटक करून हजर करा.' माझी ही आज्ञा ऐकून ते दोन शिपायांना बरोबर घेऊन बाहेर पडले. दोघेही गुन्हेगार पकडले गेले. हेड कॉं. शिवाजी यांनी त्या दोघांनाही हजर केलं.

'गेल्या वर्षी बारलींगा गावात चोरी झाल्याचं आठवतं का तुला ?' मी नारायण शिंत्रेला विचारलं.

'मी चोरी केली नाही. मला काही माहीत नाही.'

'अस्सं होय, तुला काही माहीत नाही. एक महिन्याची सजा तुम्हा दोघांना झाल्याचंही आठवत नसेल तुम्हाला.' माझा हा प्रश्न ऐकून तो खाली पाहू लागला. त्याचं खाली पहाणं मी समजून चुकलो. महादेव शिंत्र्याकडे पहात त्याला मी विचारलं, 'तूही सजा भोगून आलास की नाही ?'

'आम्ही दोघंही जेलात होतो. बारलींग्याच्या पाटलानं चोरीचा आळ घेतला' तो म्हणाला.

'तुम्हाला अटक का केली हे समजलं असेलच, कां मला सांगावं लागेल.' मी म्हणालो.

'आम्ही देवळातील चोरी कशी करू. जगदंब माईला हात लावण्याचं काम आम्ही केलं नाही.' महादेव म्हणाला.

'साहेब, तसं हे सांगणार नाहीत. मलाही असंच शपथा घेऊन त्यांनी सांगितलं की आम्ही देवीला हात लावला नाही. त्यांची पोलीस कस्टडी रिमांड घ्यावी लागेल.' शिवाजी जमादार म्हणाले.

त्या दोघांनाही आम्ही वाळापूरला घेऊन गेलो. त्यांना न्यायालयात हजर करून रिमांड घेण्यात आला. 'चोरी केलीस का ?' असे विचारलं की लगेच 'होय, मीच चोरी केली' असा लगेच कबुलीजबाब देणारा चोर अद्यापतरी मला भेटलेला नाही. या दोघांनीच देवीची मूर्ती चोरली असली पाहिजे याची मला खात्री होती.

'अंबादेवीची मूर्ती कुठे ठेवली आहे ?' हा प्रश्न मी सतत विचारीत होतो.

'अंबादेवी आमच्याच गावची देवता. तिला देवळातून आम्ही नेलं नाही. देवळाला दरवाजे नसल्यानं गावातील उनाड पोरंदेखील नेऊ शकतात.' अशी कारणं ते सांगत होते.

पोलीस कस्टडी रिमांड घेऊन चार दिवस होऊन गेले तरी त्या दोघांनी हार मानली नाही. वेगवेगळ्या पद्धतीचा अवलंब करून विचारून पाहिलं पण त्यांनी दाद दिली नाही. मूर्ती मिळाल्याशिवाय त्यांनीच चोरी केली हे सिद्ध होण्यासारखं नव्हतं. नवरात्रीचा प्रारंभ होण्यास एक दिवस राहिला होता. घटस्थापनेच्या दिवशी अंबादेवीची मूर्ती काढून घ्यायची होती.

सतत तोच प्रश्न विचारून त्यांना मी भंडावून सोडलं होतं. महादेव शिंत्रेला व नारायणला वेगवेगळ्या लॉकअपमध्ये ठेवण्यात आलं. रात्रीच उठून मी महादेव शिंत्रेला लॉकअप मधून बाहेर काढलं. त्याचा भाऊ नारायण यानं सगळी कबुली दिली आहे, असं मी खोटंच सांगितलं.

त्याला मी म्हणालो, 'उद्या नवरात्र सुरू होते. मूर्ती लपवून उपयोग नाही. दरोडेखोरांचं देखील आमच्या समोर चालत नाही. ते देखील सर्व सांगून टाकतात.' माझ्या बोलण्याचा त्याच्यावर परिणाम होत होता.

महादेव शिंत्रे सांगू लागला, 'रात्रीचा एक वाजला असेल, त्या दिवशी आम्ही दोघंही चोरी करायला बाहेर पडलो. सगळीकडे सामसूम होतं. एका ठिकाणी चोरी करावी म्हणून गेलो तर घरातलं कुत्रं जोरानं भुंकलं. पळत देवळापाशी येऊन थांबलो. मंदिरातली पणती जळत होती. खाली हात परत कशाला जावं म्हणून मीच ती मूर्ती देवळात जाऊन आणली.' असं म्हणून तो बोलायचा थांबला.

'मूर्ती कुठं ठेवलीस ते सांग आधी.' मी म्हणालो.

'माझं वावर आहे बांधाच्या कडेला पऱ्हाटया लावून ठेवल्या आहेत. पऱ्हाटीच्या ढिगाखाली खड्ड्यात पुरून ठेवली आहे.'

'ते ठिकाण तुला दाखवावं लागेल, मूर्ती काढून द्यावी लागेल,' मधेच मी म्हणालो.

'देगांवला घेऊन चला, मी जागा दाखवून मूर्ती काढून देतो.' त्यानं असा कबुलीजबाब दिल्यानं दुसरे दिवशी ह्या दोघांना घेऊन

देगांवला आलो तो दिवस नवरात्रीच्या सुरवातीचा होता. आम्ही देगांवला येताच गावकऱ्यांची गर्दी झाली. त्यांच्यातलीच दोन माणसं पंच म्हणून बोलावली. त्यांच्या समक्ष महादेवला बोलता केला.

'मूर्ती कोठे ठेवली आहे ?' मी विचारलं.

'शेतातल्या पऱ्हाटीचे ढिगाखाली खड्डा करून त्यात पुरून ठेवली आहे.' त्यानं खुलासा केला. ह्याची जबानी पंचांसमक्ष घेतली गेली. नारायण यानंही खरं ते सर्व सांगून टाकलं. मूर्ती मिळावी म्हणून गावकरी अधीर झाले होते. मंदिर नव्यानं उभारण्याकरिता ज्यांनी पुरेसा पैसा जमा केला होता त्यांना या पैशातून दुसरी मूर्ती आणता आली असती. अनादि काळापासून ही मूर्ती त्या देवळात होती. त्यांच्या श्रद्धा या मूर्तीशी जोडल्या गेल्या होत्या.

मूर्ती केव्हा एकदा हाती लागते असं होऊन गेलं होतं. त्र्यंबकराव पाटील, काशीराम गव्हाळे आणि सर्व प्रतिष्ठित मंडळी जमा झाली होती. रुष्ट होऊन निघून गेलेली अंबादेवी परत येणार होती म्हणून त्यांच्या उत्साहाला उधाण आलं होतं.

दोघेही भाऊ देगावचे रहाणारे. त्यांना शेतीवाडी घरदार सर्व काही असताना चोरी करण्याची सवय का लागावी हे कळून आले नाही. त्यांना बरोबर घेऊन आम्ही निघालो. महादेव व त्याचा भाऊ नारायण असे पुढे चालू लागले. त्यांच्या हातात हातकड्या घातलेल्या होत्या त्यांना पहाण्यासाठी सारा गाव लोटला होता, आमच्या मागोमाग गर्दीचा लोंढा येतच होता. त्यात नवीन मंदीर बांधून देण्याचं आव्हान स्वीकारून पोलिसांना मूर्ती मिळवून देण्याचं प्रति आव्हान देणारे काशीराम गव्हाळे हे देखील होते.

'आपण देऊळ उभं करू पण पोलिसांना मूर्ती सापडेल की नाही अशी शंकाच आहे.' असं म्हणणारेही गावात होतेच. पोलिसांवर टीकेचे अस्त्र परजणारे हेच लोक म्हणत होते, 'मूर्ती आता मिळणारच आहे. पोलिसांनी आव्हानाचा स्वीकार करून, जीवापाड मेहनत घेऊन मूर्तीचा शोध लावला आहे.'

महादेव शिंत्रेनं त्याच्या शेतातील बांधावर रचून ठेवलेल्या पऱ्हाटीचे ढिगाजवळ नेलं.

'इथेच मी या पऱ्हाटीखाली मूर्ती पुरून ठेवली आहे. पऱ्हाटीचा ढीग हटवावा लागेल,' त्याने असं म्हटल्यावर मी त्याच्या हातातली बेडी काढली. बेडी असलेल्या हातानी त्याला मूर्ती काढून देता आली नसती वाळलेल्या पऱ्हाटचा एकावर एक ठेवून ढीग रचण्यात आला होता. त्याने पऱ्हाटचा बाजूला सारल्या. लोकांची उत्कंठा शिगेस पोहोचली होती. प्रत्येकजण पुढं सरकून पाहण्याचा प्रयत्न करीत होता. शेतातली काळी माती बाजूला करण्यास त्याला वेळ लागला नाही. तो खड्डाही खोल खणलेला नव्हता. दोन फूट खोली असावी त्या खड्ड्याची. पांढऱ्या मळकट कपडयात गुंडाळलेली मूर्ती त्यानं बाहेर काढली. फडक्यात गुंडाळलेली वस्तू मूर्तीच आहे की आणखी काही दुसरंच आहे हे पहाण्यासाठी सर्वजण अधीर झाले होते.

फडकं काढून टाकलं तेव्हा अंबादेवीच्या हसऱ्या चेहेऱ्यानं सर्वांचं मन वेधून घेतलं. तिला जणू म्हणायचं होतं, माझ्याकडे दुर्लक्ष केल्यानं कशी फजिती होते पाहिलंत ना! ती दोन्ही हातानी आशीर्वाद देत होती. भक्तावर आशीर्वादाचा वर्षाव करीत होती. असा भास होत होता की आपल्या हरणासारख्या पाणीदार अन् टपोऱ्या डोळ्यांनी सर्व गावकऱ्यांकडे पहात आहे. रुष्ट झालेली देवी पुन्हा देगावात परत आली होती. तिची हसरी मुद्रा पाहून सर्वांना समाधान वाटलं.

महादेवनं काढून दिलेली मूर्ती जप्त करण्यात आली. त्याच्या शेतात बसून तसा पंचनामा करण्यात आला.

'आज पास्नं नवरात सुरू झाली आहे. मूर्ती देवून टाका,' असे पोलीस पाटील म्हणाले.

'जप्त झालेली मूर्ती लगेच आपल्या ताब्यात देता येणार नाही. मॅजिस्ट्रेट साहेबाची मंजूरी घ्यावी लागेल,' मी खुलासा केला.

'केव्हा देणार ही मूर्ती.'

'आणखी काही दिवस लागतील. दसऱ्याचे अगोदर यात्रेच्या वेळी परत करतो.'

'तोपर्यंत कोठे ठेवणार ही देवीची मूर्ती.'

'पोलीसठाण्यात ठेवतो. तिथेच तिची उत्तम व्यवस्था होईल.'

'मी पोलीस पाटील आहे. मालखान्यात जप्त झालेला माल ठेवता. अशा मालात दारुचा वास येत असलेली भांडी ठेवलेली असतात.'

'मालखान्यात न ठेवता ही मूर्ती ठाण्यात स्थापन करू. तिची पूजा अर्चा होत जाईल. मंजूरी आली की आपण घेऊन जा.'

'कसंही करून दसऱ्याचे अगोदर मूर्ती ताब्यात द्यावी.'

'पाटील, आपण निर्धास्त असा. मी बाळापूरला गेलो की पहिलं काम मॅजिस्ट्रेटला रिपोर्ट करून मंजूरी घेण्याचं करतो.' असं म्हणून मी तेथून काढता पाय घेतला. मूर्तीसह आम्ही ग्रामपंचायत ऑफिसात आलो. काशीराम गव्हाणे आणि इतर लोक आमचे बरोबर आले होते.

काशीराम गव्हाळे म्हणाले, 'नवरात्रीच्या अगोदर मूर्ती आणून देतो असं आपण सांगितलं होतं. त्याप्रमाणे घडून आलं आहे!'

'प्रयत्न केले त्याला यश आलं.' मी म्हणालो.

'ते तर खरंच पण हे उद्‌गार आपण नव्हे देवीनंच काढले असं आम्ही मानतो. देवी रुष्ट झाली व निघून गेली असंही आपण म्हणालात नवीन मंदिर उभं करत असाल तर अंबादेवी मिळून येईल.'

'मी बोललो हे खरं आहे. मला विश्वास होता की मूर्तीचोर हाती लागल्याखेरीच राहणार नाहीत. या विश्वासामुळं जिद्दीनं काम केलं त्याला यश आलं. तुमचं मंदिराचं काम सुरू झालं का?' मी विचारलं.

'आजच पायाभरणीस सुरवात केली आहे. एक महिन्याचे आत नवीन मंदिर उभं असलेलं दिसेल आपल्याला. जत्रेच्या अगोदर मूर्ती पाठवून द्या,' गव्हाळे म्हणाले.

'पाठवून देतो. तुमचं मंदिराचं काम चालू ठेवा.' मी म्हणालो.

त्यानंतर महादेव व त्याचा भाऊ नारायण यांना बरोबर घेऊन बाळापूरला आलो. नवरात्रीचा प्रथम दिवस असल्याने अंबादेवीची पूजा करून पहिली माळ चढविली. ही मूर्ती आसन तयार करून त्यावर सजवून ठेवली होती.

देगावची यात्रा दसऱ्याचे अगोदर एक दिवस असताना सुरू होते. त्यावेळी मूर्ती मंदिरात असायला हवी होती. न्यायदंडाधिकाऱ्यांना भेटून मी ती मूर्ती परत करण्याची परवानगी आणली. तसा निरोपही मी देगांवला पोलीस पाटलाकडे कळविला.

दसऱ्याचे आदले दिवशी मी पोलीसठाण्यात हजर होतो. सकाळचे दहा वाजले असतील. पोलीस स्टेशन गजबजून गेलं होतं. लॉकअपमधून गुन्हेगारांना बाहेर काढीत असताना त्यांच्या हातातील बेड्यांचा खळ् खळ् असा आवाज होत होता. त्यांना न्यायालयात हजर करण्यासाठी नेहमीप्रमाणं बाहेर काढीत होते. व्हरांड्यातून जाणाऱ्या येणाऱ्या शिपायांच्या बुटांचा खाड् खाड् आवाज होत होता. बारनिशीवाला शिपाई टपाल पाठवण्याच्या कामात व्यस्त होता.

मी ड्यूटी वाटपाचं रजिस्टर पहात बसलो होतो. बेड्यांचा खळ्-खळ् आवाज बुटांचा खाड्खाड् आवाज ऐकू येईनासा झाला. दधडम् धम् ऽ असा तालबद्ध हलग्यांचा आवाज ऐकू येऊ लागला. हलगीच्या तालावर लेजीमचा खेळ चालू होता. वीरश्रीच्या उभारीचा संचार होणारा तो आवाज जवळ जवळ येऊ लागला. पोलीसठाण्याच्या प्रांगणातून असा आवाज कधी ऐकू आला नव्हता. लेजीम खेळणारे पोलीसठाण्यात कशाला येतील. हातातलं काम सोडून काय प्रकार आहे हे पाहण्यासाठी मी व्हरांड्यात आलो. लेजीमच्या ताफ्यासह वाजत गाजत देगावचे लोक आले होते.

लेजीम खेळणारांनी नारंगी रंगाच्या टोप्या घातल्या होत्या. अंगात पांढराशुभ्र शर्ट व त्यावर खाकी हाप पँट घातलेली होती. त्यांच्या पायात पांढरे कॅनव्हासचे शूज व तसल्याच रंगाचे पांढरे शुभ्र मोजे घातलेले होते. लेजीम खेळताना त्यांच्या सूत्रबद्ध हालचाली होत होत्या. सर्वांनी सारखाच पोशाख केला असल्यानं त्यांच्याकडे टक लावून

पहात रहावं असं वाटत होतं. एकाच वेळी गिरक्या घेणं, बसणं, उठणं अशा हालचाली प्रेक्षणीय वाटत होत्या. मी व्हरांड्यात येऊन त्यांचा खेळ पहात उभा राहिलो. लेजीमच्या तालाचे पाठोपाठ ढोल, झांजा वाजवीत पालखी आली. अंबादेवीची मूर्ती नेण्यासाठी या पालखीचा उपयोग होणार होता.

पोलीसठाण्यातलं नेहमीचं वातावरण पार बदलून गेलं होतं. त्यांची विचारपूस करायची सोडून मी त्यांचा लेजीमचा कार्यक्रम पहात व्हरांड्यात उभा होतो. कोणीतरी माझ्याजवळ येऊन उभं राहिल्याचा मला भास झाला. मी वळून पाहिलं तेव्हा मला देगावचे पोलीस पाटील माझ्या शेजारी येऊन उभे राहिल्याचं दिसलं. मी लेजीम पहाण्यात इतका गुंग होऊन गेलो होतो की माझ्याशी बोलण्याचं त्यांना धाडस झालं नाही. त्यांना पाहून मी म्हणालो, 'तुमच्या गावचे लोक लेजीम चांगलं खेळतात.'

'गावात आखाडा आहे. ही लेजीम खेळणारी मंडळी त्या आखाड्यातली आहेत. अंबादेवीला नेण्याकरिता पालखी आणली आहे.' ते म्हणाले.

'या पालखीतून नेणार आहात का ?'

'होय, या पालखीतून देगावपर्यंत पायी चालत नेणार आहोत. बाळापुरातही पालखीची मिरवणूक फिरवणार आहोत.'

अंबादेवीची मूर्ती परत जाणार होती. अंतःकरण जड झालं होतं. आपली मौल्यवान वस्तू कुणी हिरावून नेत आहे असं वाटत होतं. देवीची स्थापना केल्या दिवसापासून नियमितपणे तिची पूजाअर्चा होई. सराफाकडून या मूर्तीवर पॉलीश चढवून घेतलं होतं मी. त्याची चमक देवीच्या चेहेऱ्यावर आली होती. जड अंतःकरणाने मी ती मूर्ती पाटलांच्या हवाली केली. 'उदो ग अंबे उदो ऽऽ उदो ऽऽ' असा जयजयकार करून त्यांनी मूर्ती पालखीत ठेवली. तुतारी वाजली, झांजा एकमेकावर आपटू लागल्या, लेजीम खेळणारांनी हात वर करून लेजीमच्या आवाजानी साथ दिली. पोलीसठाण्यातून पालखी निघाली. पालखीच्या पुढे

लेजीमचा ताफा होता. हलग्यांचा आवाज येत होता. ठाण्यातून देवीची पालखी निघाल्याची वार्ता बाळापुरात समजायला वेळ लागला नाही. बाळापुरच्याही लोकांनी मिरवणुकीत भाग घेतला.

आखाड्यातील तरुण लाठ्या, दांडपट्टा खेळत होते. मधूनच तुतारीचा नाद घुमत होता. बाळापूर गांवातून मिरवणूक जात असताना गृहिणी पाण्यानं भरलेल्या घागरी घेऊन येत होत्या. पालखीजवळ या घागरी रित्या होत होत्या. देवीची पूजा झाली की पालखी पुढे चालू लागे. मोठ्या संख्येनं नागरिक या मिरवणुकीत सामील होत होते. ही पालखी बाळापुरातून बाहेर पडली तेव्हा नागरिकांनी निरोप घेतला. कितीतरी वेळ मी एका वेगळ्याच वातावरणात वावरत होतो.

या वर वर साध्या वाटणाऱ्या पण पोलिसांना आव्हान देणाऱ्या गुन्ह्यात बारलींगा गावचं रेकॉर्ड बारकाईनं पाहिलं म्हणून दोन्ही आरोपितांना न्यायालयासमोर आणता आलं. रेकॉर्ड पाहून चोराला अचूकपणे हेरून पकडणं यालाच कागदावर चोर पकडणं असं म्हणतात. बारलींगा गावच्या रेकॉर्डनं अल्लाउद्दीनच्या जादू-ई-चिराग सारखंच काम बजावलं होतं.

दसरा होऊन गेल्यावर एक महिन्यात अंबादेवीचं नवीन मंदिर बांधून पूर्ण झालं. मंदिराचा कळसही चढवला गेला. पूर्वीच्या मंदिरा-पेक्षा हे मंदिर मोठं बांधण्यात आलं. मंदिर पूर्ण झाल्यावर पाटील मला भेटण्यास आले. त्यांच्या बरोबर गव्हाळे होते.

'गावकऱ्यानी मंदिर पूर्ण केले आहे. परवाच प्राण-प्रतिष्ठा करायची आहे. आपल्या हस्ते मूर्तीची प्राणप्रतिष्ठा व्हावी अशी सर्वांची इच्छा आहे,' त्र्यंबकराव म्हणाले.

'प्राणप्रतिष्ठेच्या दिवशी मी येईन पण माझ्या ऐवजी दुसरं कुणी तरी बोलवा अन् त्यांच्या हस्ते प्राणप्रतिष्ठा करून मूर्तीची स्थापना करा.'

'आपल्याच हातून प्राणप्रतिष्ठा झाली पाहिजे. आपण व बाईसाहेब देगांवला परवा आलं पाहिजे. तुमचे उद्गार गावकरी विसरणार नाहीत.

ते उद्‌गार तुमचे नव्हते तर देवीचे होते असं ते मानतात. नवरात्रीचे अगोदर मूर्ती आणतो असं आपण स्पष्ट म्हणला होता. त्याच दिवशी अंबादेवीची मूर्ती सापडते तो योगायोग मानायला आम्ही तयार नाही. दुसरं कुणीही बोलावण्यात येणार नाही,' त्यांचं मन मला मोडता आलं नाही.

'आम्ही दोघंही परवा सकाळी देगांवला येतो' असं मी त्यांना म्हणालो.

'समारंभाची तयारी करतो, आपण जरूर यावं' असं म्हणून ते गेले.

मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करायला मी व माझी पत्नी गेलो होतो. शेकडोच्या संख्येनं गावकरी व आजूबाजूच्या गावातले लोक हजर होते. पुजाऱ्याचे हस्ते प्राणप्रतिष्ठेचा सोहळा पार पडून आम्ही पति-पत्नींनी अंबादेवीची मूर्ती नवीन मंदिरात स्थापन केली. समारंभ पार पडल्यावर या मूर्तीविषयी माहिती मिळवावी म्हणून मी एका शंभरीच्या आसपास असलेल्या गावकऱ्यास विचारले, 'बाबाजी, ही मूर्ती किती वर्षांपूर्वीची आहे?'

'ते कुनालाबी सांगता यायचं न्हाई. माज्या वाडवडलासूदीक ठावं न्हाई. देवी असल्याने आमच्या गावचं नांव देवीगांव हाय. देगांव न्हवं. संमदे देगांव म्हनत्यात ते बरोबर न्हाई. लई जागृत ठानं हाय या देवीचं'

'कशावरून म्हणता जागृत ठाणं आहे म्हणून,' मी त्यांना बोलतं ठेवावं म्हणून विचारले.

'आज पतोर देवीच्या रोगानं एक बी कुणी बळी गेला न्हाई. आसपासच्या गावाला देवी आल्या पण आमच्या गावाला देवीचा रोग आलाच नाय. मी म्हणत होतो देवीची आबाळ करू नकासा पन ऐकतं कोन. गेली हुती रुसून. तुमच्यावर देवीची कृपा हाय. मंदिर बांदायचे कबूल केलं काय अन् देवी पुना आली काय. सारंच काही न्यारं घडलं-लीला हाय तिची' असं तो म्हणाला.

ही मूर्ती किती वर्षांपूर्वीची आहे हे कुणालाही सांगता आलं नाही. देवीचं गाव हे या गावचं खरं नाव. या नावाचा अपभ्रंश देगांव असा झाला.

प्राणप्रतिष्ठा झाल्यावर आम्ही दोघांनी गावकऱ्यांचा निरोप घेतला व बाळापूरला परत आलो. सर्व गावकऱ्यांसमक्ष काढलेले उद्‌गार तंतोतंत खरे झाले होते. याला कुणी योगायोग म्हणो की आणखी काही म्हणो. या घटनेमुळं देगांवशी घनिष्ठ संबंध झाले. महिन्यातून एखादे वेळी जाऊन मी अंबादेवीचं दर्शन घेत असे.

त्यानंतर एक वर्षाचा कालावधी लोटला. बाळापूरहून मी दुसरीकडे बदलून गेलो. मूर्ती चोराविरुद्ध न्यायालयात दाखल केलेल्या केसचं काय झालं याची माहिती मला फार उशीरा समजली. एका जुन्या केसच्या संबंधात मी अकोला येथे गेलो होतो. कोर्टातलं काम संपल्यावर मला समजलं की व्याळा गावचे त्र्यंबकराव देशमुख यांच्या मुलाचा विवाह अकोल्यात आहे. त्यांचा चांगला परिचय होता. ते व्याळा गावचे सरपंच आहेत. बाळापूरला असताना मी त्यांच्याकडे भेटीस जात असे.

त्यांच्या मुलाचे लग्नास मी गेलो.

देगांवची मंडळी लग्न मंडपात भेटली. मला पाहून देगांवचे ग्रामसेवक व इतर काही मंडळी जमा झाली.

'मूर्ती चोरांना सजा झाली काय ?' मी चौकशी केली.

'साक्ष फुटल्याने दोघं सुटल्याचं समजलं,' ग्रामसेवक म्हणाले.

'काय म्हणता ! सर्व गावासमक्ष मूर्ती काढून देणारा सुटणं शक्य नाही.'

'नक्की आमाला माहीत नाही पण दोघंही सुटून आले खरं.'

'शिक्षा भोगून आले असतील,' मी शंका व्यक्त केली.

'ते तर म्हणत हुते की सुटलो आम्ही पण मूर्ती चोर महादेवला जबर शिक्षा दिली अंबादेवीनं' त्यापैकी एकानं खुलासा केला.

'काय झालं ते सांगा' मी म्हणालो.

'महादेव शित्र्या रात्रीचं चोरी करायला छपरावर चढला होता. कुत्री भुंकू लागली. घरातली मानसं जागी झाली. छपरावर मानूस पाहून 'चोर, चोर' असं वरडली. महादेव घावरून गेला. पळून जाण्या-साठी छपरावरनं खाली उडी घेतली. जनावरं बांदायच्या गोठ्यात म्हशी बांदायच्या लाकडी खुटीवर पडला. त्याच्या गांडीतच खुटी घुसली. घरातल्या लोकांनी त्याला पकडावं म्हणून धांव घेतली. पहातात तो खुटी आरपार घुसलेली. त्याला वडून काढले. रक्तबंबाळ झाला. दवाखान्यात बंडीतनं नेत असतानाच मेला.'

'खरं कां आपण म्हणता ते,' त्यांनी सांगितलेली हकीकत विस्मयजनक वाटल्यानं मी विचारलं.

'खरं म्हणजे! आम्ही काय खोटं बोलतो असं वाटलं?'

'केवढी ही भयंकर शिक्षा! गुदद्वारात खुंटी घुसून त्याला मृत्यू आला. त्याच्या बरोबर नारायण होता काय?' मी विचारलं.

'चोरी करताना छपरावर तो एकटाच दिसला. नारायण दिसला नव्हता.'

'नारायणचं कसं काय चाललं आहे? शेतीवाडी आहेच त्याला.'

'नारायण घराबाहेर सहसा दिसत नाही. त्याला टी. बी. झाल्याचं समजलं आहे. तुम्ही काही म्हणा पन देवीचा कोपच कारणीभूत आहे. तिनं पुष्कळ चमत्कार दाखवलेत आजवर' देगांवचे ग्रामसेवक म्हणाले.

'देगांवचे पाटील वगैरे मंडळी दिसत नाहीत.'

'त्र्यंबक पाटील गेल्या वर्षीच पोटदुखीच्या आजारागुळं वारले.'

त्र्यंबकराव पाटील कायमचेच निघून गेल्याचं ऐकून वाईट वाटलं. गेल्या कित्येक वर्षांपासून ते पोलीस पाटील म्हणून काम करीत होते.

'देगांवची आठवण मी कधी विसरणार नाही,' मी म्हणालो.

'आपली आठवण सर्वांना होते. अंबादेवीचं मंदिर असेपर्यंत लोक तुमचं नाव विसरणार नाहीत. जत्रेच्या वेळी तर आपली लोक आठवण

करतातच. बाळापूरच्या भोयांनी पवाडा रचला आहे या प्रसंगाचा. दसऱ्याच्या दिवशी ते देगांवात येत असतात. पोवाडा चांगला दोन तास चालतो. या पोवाड्यावर गावकरी खूष होऊन भोयांना चांगली बिदागी मिळते.'

'आपण भेटलात म्हणून मला आनंद होत आहे. कधीकाळी सवड मिळाली तर देवीच्या दर्शनाला येईन' असं आमचं बोलणं झाल्यावर देशमुखांच्या मुलाच्या विवाहाचा सोहळा पाहिला. लग्न समारंभ पार पडल्यावर मी त्या सर्वांचा निरोप घेतला,



सहा

## सावरगावची घरफोडी चोरी

एस. पी. साहेबांच्या ऑफीससमोर मी उभा होतो. डोक्यात विचारांचं काहूर माजलं होतं. साहेबानं बोलावलं म्हणून मी बाळापूर ते अकोला हे वीस किलोमिटरचं अंतर मोटार सायकलीनं अर्ध्या तासात कापलं होतं. कोणत्या कारणासाठी बोलावलं असेल याचा मी विचार करीत थांबलो होतो. बझरचा आवाज झाला. स्टुलावर बसलेला प्यून लगबगीनं आत गेला. ऑफिसच्या दरवाज्याचे मधोमध लावलेल्या स्प्रींगचा कर्रर्रकन् आवाज झाला काळजाचे ठोके वाढू लागले होते, कर्रर्रन आवाज कानी आला. फाटक लोटून प्यून बाहेर आला.

'साहेब आपणाला बोलावताहेत ' असं म्हणून त्यानं स्प्रींगचं दार उघडलं. बाळापूर तहसीलचा ठाणेदार साहेबासमोर जाणार होता. छाती पुढं काढून मार्चिंग करीत आत जाऊन हॉल्ट केला. अटेन्शन होताना बुटांच्या एडीज एकमेकावर आपटल्यानी खाड्कन आवाज झाला. या आवाजासरशी एक कडक सॅल्यूट ठोकला. अभिवादनाचा स्वीकार करीत एस्. पी. साहेब म्हणाले, 'सावरगावची घरफोडी चोरी अद्याप उघडकीस आली नाही.'

'सावरगाव, चान्नी पोलीस स्टेशनचं गाव आहे. चान्नीच्या फौजदारांनी तपास केला आहे,' मी खुलासा केला.

'ते मला सर्व माहीत आहे. त्यांनी ही केस गुन्हेगारांचा तपास लागत नाही म्हणून निकालात काढली आहे. या अपराधाचा तपास

का लागत नाही म्हणून आजच डी. ओ लेटर आले आहे. थोडा थोडका नाही चांगला पंचवीस हजारांचा माल चोरीस गेलेला आहे. काही झालं तरी या केसचा तपास लागला पाहिजे. या केसचा तपास मी तुमच्याकडे देत आहे', असं म्हणून त्यांनी सावरगावच्या प्रकरणाची फाईल माझ्याकडे दिली. फाईल हातात घेत मी म्हणालो, 'सर, आठ महिन्यापूर्वी ही चोरी झाली आहे. प्रयत्नांची शिकस्त करून पाहतो. मला जीप व पोलीस पार्टीची गरज आहे कारण तपासाकरिता फिरणे भाग आहे.'

'त्याची व्यवस्था मी केली आहे. पोलीस जीप व स्टाफ सोबत घेऊन जा. गुन्हा उघडकीस आला पाहिजे.'

'येस्, सर!' असं म्हणून मी अटेंशन्शन झालो. दोन्ही बुटांच्या एडीज् एकमेकावर आपटल्यानं खाड्कन आवाज झाला. कडक सॅल्यूट ठोकला गेला. बगलेत फाईल मारून परत फिरलो. कर्रर्रकन स्प्रींगचं दार वाजलं. स्टुलावर बसलेला प्यून उठून उभा राहिला. स्टीलची चमकदार बटन असलेला पांढरा शुभ्र बंद गळ्याचा कोट, डोकीवर पांढरी नोकदार गांधी टोपी, कोटावरून प्लेट असलेला लाल रंगाचा पट्टा अन् खादीची पांढरी पॅंट असा वेश त्यानं परिधान केला होता. त्यानं माझ्यासाठी तयार ठेवलेली जीप दाखवून दिली. पोलीस जीप व स्टाफसह निघालो. तपासाकरिता बाळापुरचा निवडक स्टाफ घ्यायचा असल्यानं प्रथम बाळापुरकडे जीप नेण्यास सांगितले. जीप वेगानं बाळापुरकडे धावू लागली होती, तसे मनातील विचारांनीही वेग घेतला होता. सावरगावचा परिसर माझ्या परिचयातला नव्हता. चान्नी पोलीस स्टेशनच्या हद्दीतील गुन्हेगारांची माहिती नव्हती. तब्बल आठ महिन्यानंतर तपास माझ्याकडे आला होता. एस्. पी. साहेबांनी हा गुन्हा उघडकीस आला पाहिजे म्हणून बजावून सांगितले होते. आठ महिन्यापूर्वी सावरगावला चोरी झाल्याचं वृत्त मला माहीत पडलं होतं. दागदागीने अन् रोकड मिळून पंचवीस हजारांचा ऐवज चोरी गेल्यानं त्या भागात एकच खळबळ उडून गेली होती. त्यावेळी मला या प्रकरणाशी आपला काही संबंध येईल

असं वाटलं नव्हतं. विचारांच्या तंद्रीत असताना वाळापूर केव्हा आलं हे समजलं देखील नाही. जीप वाळापूर पोलीस स्टेशनसमोर थांबली.

जीपमधून उतरलो. मण नदीच्या तीरावरील उंच टेकडीवर पोलिस स्टेशनची शानदार इमारत आहे. सकाळचे दहा वाजून गेले असतील. मण नदीचे पात्र पाण्यानं दुथडी भरून गेलं होतं. वळणं घेत घेत पाण्याचा प्रवाह किल्ल्याजवळून गेला होता. या नेहमीच्या दृश्यानं मी सुखावून जात असे. ते मनोहारी दृश्य पाहून मला हुशारी वाटली. क्षणभर मी विचारचक्रातून बाहेर पडलो होतो. विश्वासातली माणसं घेऊन चान्नीला जाण्याचा बेत केला. थोडया वेळात आम्ही बाळापूरहून निघालो. सावरगावला जाण्याचा रस्ता बरोबर नसल्याची माहिती मिळाली. जाताना चान्नीवरून रस्ता जातो अशीही माहिती मिळाली. जीपमध्ये बसल्यावर असंख्य विचारांचे काहूर डोक्यात निर्माण झाले. नाना प्रश्न मला भेडसावीत होते. कोणत्या आधाराने तपास करू ! तपास न लागला तर वरिष्ठ अधिकारी नाराज होतील. आठ महिन्यानंतर तपासाला निघणं अन् पुन्हा प्रथमपासून तपास करणं सोपं काम नव्हतं. खुनाचा गुन्हा तपास करण्यास परवडतो, पण घरफोडीचा गुन्हा परवडत नाही. 'खून बोलतो' असे म्हणतात ते बरोबर आहे. खुनाच्या गुन्ह्यात बाई, बाटली अन् पैसा ही सूत्रे लक्षात ठेवली की त्याचा शोध लावणे तितकेसे कठीण नसते. या तीन सूत्रातलं एक सूत्र बहुतेक लागू पडतं. घरफोडीचोरीचा गुन्हा उघडकीस आणण्यातच खरं कौशल्य आहे. या गुन्ह्यामध्ये अपराधी हा घरात प्रवेश मिळविण्यासाठी अनेक मार्गांचा अवलंब करतो. कुलूप तोडून, खिडक्याचे गज वाकवून, भितीस छिद्र करून; प्रवेशद्वाराचे दरवाज्याचे बाजूस छिद्र करून, आत हात घालून आतील कडी काढून, पाईप वरून चढून वरील मजल्यावर जाऊन, अशा अनेक मार्गांनी घरात प्रवेश करतो. प्रवेश मिळवणे महत्त्वाचे असते. पुढील कार्यभाग सोपा असतो. घरातले मौल्यवान दागिने, रोकड असा मिळेल तो माल पसार केला जातो. गुन्हे करताना अवलंबिलेली पद्धत कोणती आहे म्हणजेच मोडस् ऑपरेंडी काय आहे हे पाहणं आवश्यक

असतं. कुलूप तोडून अथवा डुप्लीकेट चावीने कुलूप उघडणारास भिंतीस छिद्र करून चोरी करता येणार नाही. आपली कार्यपद्धती गुन्हेगार सहसा सोडीत नाही. कारण त्या कार्यपद्धतीचा त्याचा अभ्यास असतो. त्या पद्धतीत तो प्रवीण झालेला असतो. या त्यांचा कार्यपद्धतीवरून हा गुन्हेगार कोण असावा याचा तपास करता येतो. सावरगावच्या केस-मध्ये बंकटलाल मारवाड्याचे घराचे पाठीमागील भिंतीस छिद्र पाडून प्रवेश केल्याचे कागदपत्रावरून मला माहीत झाले होते. या पद्धतीचा (मोडस ऑपरेंडी) अवलंब करणाऱ्या गुन्हेगारांची माहिती चान्नी पोलीस स्टेशनच्या रेकॉर्डवरून मला घ्यायची होती. जिद्दीनं काम करून गुन्हा उघडकीस आणायचा होता. घरफोडीचोरीच्या अपराधासंबंधीचे विचार मनात घोळत होते. चान्नी पोलीस स्टेशनला आमची जीप आली.

हाती घेतलेल्या या प्रकरणात यश आलं पाहिजे, याचाच ध्यास मला लागून राहिला होता. पोलिस स्टेशन चान्नीचे रेकॉर्ड पाहिले. भिंतीला छिद्र करून घरात प्रवेश करून चोऱ्या करणारांची नावे टिपून घेतली. घरफोडी चोरी करणाऱ्या गुन्हेगारांची नावे पाहून लिस्ट तयार केली. चन्नी ठाण्याच्या फौजदाराने केलेल्या तपासाची फाईल चाळून पाहता मी लिस्ट तयार केलेल्या सर्व गुन्हेगारांकडे तपास कर-ण्यात आलेला होता. चोरीचा माल हस्तगत व्हावा म्हणून त्यांच्या घरांच्या झडत्याही घेतलेल्या होत्या. त्यांच्यापैकी काही जणांना संशया-वरून अटक करून पोलीस रिमांडही घेतलेला होता.

चान्नी पोलिस स्टेशनच्या सब–इन्स्पेक्टरने तपासात काही उणीवा ठेवलेल्या नव्हत्या. असं असताना देखील चोरीचा माल तर मिळाला नाहीच पण चोरी कोणी केली हे देखील समजू शकलं नव्हतं. रेकॉर्ड पहात बसण्यात अर्थ राहिला नव्हता. चान्नी परिसरातील पूर्व रेकॉर्ड असणारे गुन्हेगार नसावेत हे जवळ जवळ सिद्ध झालं होतं. भादुले साहे-बांनी केस हाती घेतली की त्यात यश आल्याशिवाय राहत नाही अशी समजूत जनतेत होती. या समजुतीला धक्का बसणार होता. पराजय पत्करायला मन तयार नव्हतं. एकतर बाहेरून गुन्हेगारांची टोळी आली

असावी किंवा नवीनच गँग तयार झाली असावी असे तर्कवितर्क मनात चालू होते.

तेवढ्यात माझ्याबरोबर आलेला पोलीस कॉन्स्टेबल युवराज म्हणाला, 'साहेब, रेकॉर्डवरून काही नवीन माहिती मिळण्यासारखी नाही. फौजदार शिंदे यांनी अशा सर्वच गुन्हेगारांकडे तपास केला आहे. रेकॉर्ड पाहात बसून वेळ घालविण्यात अर्थ नाही. चान्नी गावात फिरून काही माहिती मिळाली तर पाहावी.'

त्याने केलेली सूचना बरोबर वाटली. त्याला बरोबर घेऊन चान्नी गावात फेरफटका मारण्यास निघालो. पोलीस स्टेशनपासून थोड्या अंतरावर असणाऱ्या नदीचे काठाने फिरतफिरत जात होतो. नदीचे काठावर एका उंचशा चवुतऱ्यावर दर्गा होता. त्यावर हिरवी चादर घातलेली होती. युवराज म्हणाला, 'दरवर्षी दर्ग्याचा उरूस भरतो. येथली प्रथा अशी आहे की, चान्नीच्या ठाणेदाराने संदल काढून नवीन चादर दर्ग्यावर चढवल्यावर उरसाची सुरुवात होते. ही प्रथा अनेक वर्षापासून चालू आहे. एक जागृत देवस्थान म्हणून या दर्ग्याचा नावलौकिक आहे.'

त्याचं बोलणं चालू असतानाच माझे पाय दर्ग्याकडे वळले. चवुतरा चढून मी दर्ग्याचं दर्शन घेतलं. 'तुझा नाव लौकिक सार्थ होऊ दे. सावरगावच्या या चोरीच्या केसमध्ये यश मिळालं पाहिजे' अशी इच्छा मनात प्रदर्शित करून मी तेथून निघालो. थोड्या अंतरावर माझ्या ओळखीचे जमनशेठ मारवाडी भेटले. मला पाहून ते म्हणाले, 'साहेब; आपण चान्नीला कसं काय येणं केलं?'

'सावरगावच्या वंकटलाल मारवाड्याचे घरी आठ महिन्यापूर्वी चोरी झाली होती. त्या केसचा तपास लावण्याची कामगिरी माझ्यावर सोपवण्यात आली आहे. चान्नीहून सावरगावला जायचं आहे.

'आठ महिन्यानंतर तपास लागेल असं वाटत नाही. बंकटलाल यांना मी चांगलं ओळखतो. त्यांचा संशय आहे की, त्यांच्या नातेवाईकाचाच हात या प्रकरणामागं असावा. त्याचं कारण असं आहे की

वंकटलालना मूलबाळ नाही. ते वृद्धावस्थेला पोहोचले आहेत. त्यांची शेतीवाडी तर आहेच, याशिवाय ते सावकारीही करतात. सावरगावातच त्यांचे चार–पाच नातेवाईक आहेत. त्या प्रत्येकांना वाटते की वंकटलाल यांनी आपल्या मुलांना दत्तक घ्यावं अथवा त्यांनी इस्टेट वाटून द्यावी. या कारणामुळं वंकटलाल यांना त्यांच्या नातेवाईकांचा संशय येतो आहे. त्यांनीच चोरी करवली असावी, असे त्यांना वाटते खरी वस्तुस्थिती सिद्ध केलीत तर बरे होईल. चोरीस गेलेला माल इतका काळ लोटल्याने मिळणे दुरापास्त आहे. चोरी कोणी केली, हे दाखवून दिलेत तरी पुरे आहे.' जमनलाल यांनी बरीच माहिती मला दिली होती. त्यांना मी म्हणालो, 'प्रयत्नांची शिकस्त करून पाहतो. सावरगावला मला निघायचं आहे.' असे सांगून मी त्यांचा निरोप घेतला.

पोलीस तपासातलं मर्म घटनास्थळाच्या निरीक्षणात असतं. आजवर माझ्या पदरी यश पडत गेलं ते केवळ घटनास्थलाच्या सूक्ष्म निरीक्षणामुळं. अपराध करतेसमयी अपराधी ह्या अजाणतेपणी आपल्या निशाण्या घटनास्थळावर सोडीत असतो. तसंच तो घटनास्थळावरच्या निशाण्या सोबत घेऊन जात असतो. चान्नीहून जीपने आम्ही सावरगावला आलो. पोलीस पाटलाची भेट घेतली. त्यांना घेऊन वंकटलाल यांच्या घरी गेलो. वैठकीची खोली मुख्य प्रवेश–दारास लागून होती. बैठकीवर काळ्या वर्णाचा सडपातळ अंगयष्टी असलेला, वयाची साठ वर्षे उलटून गेलेला इसम बसला होता. त्याचे डोकीवर खादीची मळकट पांढरी गांधी टोपी, अंगात पांढरा शर्ट व धोतर होते. 'हे वंकटलाल आहेत' असं म्हणून पाटील पुढे म्हणाले, 'वंकटलाल आपल्याकडे बाळापूरचे फौजदार भादुलेसाहेब आले आहेत.' आम्हास पाहून वंकटलाल जागचे उठले. पुढे येत म्हणाले, 'या साहेब, चोरीच्या तपासाकरिता आलात वाटतं. इतक्या दिवसानंतर चोरी मिळणार नाही असं वाटतं. चहापाणी घेऊन जाणं बरं.' त्यांच्या बोलण्यातली खोच माझ्या लक्षात आली.

'चहापाणी नको आहे. चोरी झाली ते ठिकाण पाहण्यास आलो

आहे. छिद्र पडलं होतं ते ठिकाण दाखवा. तुमच्या चोरीचा शोध लागला तर चहा घेईन.'

'चला दाखवतो' असं म्हणून वंकटलाल चालू लागले. त्यांच्या मागोमाग मी जात होतो. ज्या ठिकाणी बैठक घातली होती त्या लगतच एका खोलीत ते गेले. भिंतीकडे बोट दाखवून ते म्हणाले, 'या ठिकाणी चोरट्यांनी छिद्र पाडले होते. या छिद्राचे बाजूस ठेवलेल्या या मोठ्या लाकडी पेटीचे कुलूप तोडून त्यातून ऐवज चोरून नेला. छिद्र आता बुजवण्यात आले आहे.'

ती जागा मी पाहून घेतली. वाड्यात पाच सहा खोल्या ओळीने असताना, ज्या खोलीत पैसा अडका ठेवला होता त्या खोलीचे भिंतीसच नेमके छिद्र पाडण्यात आले होते. वंकटलाल हे याच खोलीत पैसा ठेवतात हे गुन्हेगारांना माहीत झालेलं असलं पाहिजे. बैठकीच्या जागेवर बसून वंकटलाल आपल्या नोकरा चाकरांचे पगाराचे पैसे वाटीत असतात ही माहिती मिळाली.

घटनास्थल पाहून झाल्यावर वंकटलाल यांना गुन्हा घडला त्या वेळची हकीगत निवेदन करण्यास मी सांगितले.

वंकटलाल मारवाडी सांगू लागले, 'चोरी झाली त्या रात्री या बैठकीच्या सोप्यावर मी गाढ झोपी गेलो होतो. आपला विश्वास बसणार नाही कदाचित पण मी सांगतो आहे ते खरे आहे. मला स्वप्न पडलं होतं. स्वप्नात मी घोड्यावर बसलो होतो. घरातील दागदागिने व पैसा अडका असलेली गाठोडी घोड्यावर लादली असून मी घोड्यावरून चाललो आहे. गावाबाहेर पडल्यावर नदी लागते. नदीच्या पात्रात विशेष पाणी नव्हतं म्हणून मी नदीच्या पात्रातून घोड्यावर बसून जाऊ लागलो. घोडा नदीच्या प्रवाहाच्या मध्यभागी आल्यावर पाण्याचा लोंढा आल्याने मी घाबरून गेलो. पैलतीर गाठण्याचा प्रयत्न करीत होतो. सगळी मालमत्ता पाण्यात बुडणार या भावनेनं मी गर्भगळित झालो होतो. सर्व अंगाला दरदरून घाम सुटला होता. नदीला अचानकपणे

आलेल्या पुरात घोडा वाहून जाऊ लागला. घोड्यावरची मांड सैल झाली. पोहत मी पैलतीराला लागलो होतो. माझ्या डोळ्यादेखत घोडा व त्यावरील लादलेली गाठोडी वाहून चालल्याचं दृश्य दिसत होतं. कितीवेळ तरी मी हा देखावा पाहत होतो.

'सकाळी ६ वाजण्याच्या सुमारास जाग आली. रात्रीचं स्वप्न आठवलं. बैठकीलगत असलेल्या खोलीतील लाकडी पेटीत मालमत्ता ठेवलेली होती. उशा खालच्या किल्ल्या घेऊन मी खोलीचं कुलूप काढून आत गेलो. मागील भिंतीस माणूस सहज आत येईल येवढे छिद्र दिसले. ज्या लाकडी पेटीत मी पैसे व दागिने ठेवले होते, ती पेटी उघडी दिसली. काळजात धस्स झाले ! पेटीतले दागदागिने व पैसा चोरीस गेला होता. स्वप्नात नदीच्या प्रवाहात मालमत्ता असलेल्या गाठोड्यासह घोडा वाहत गेल्याचे दिसले होते. इकडे चोर घरात घुसून चोरी करीत होते तर मला झोपेत मालमत्ता असलेलं घोडं प्रवाहात्त वाहून जाताना दिसत होतं. हे घोडं मालमत्तेसह वापस येईल असं वाटत नाही.'

हकीगत सांगताना वंकटलाल यांच्या चेहेऱ्याकडे पाहवत नव्हतं. पाच, दहा रुपयाची नोट हरवली तर मनाला हुरहूर लागते. येथे तर वंकटलाल यांची सारीच पुंजी चोरट्यांनी साफ केली होती. त्यांची हकीगत ऐकून मी त्यांना म्हणालो, 'नदीच्या प्रवाहात वाहून गेलेलं तुमचं घोडं मालमत्तेसह परत आणण्याची पराकाष्ठा करून पाहातो.'

वंकटलालनी माझ्याकडे असा काही दृष्टिक्षेप टाकला की त्यांना म्हणायचं होतं हे केवळ अशक्य आहे. चोरी होत असताना त्यांना असं सूचक स्वप्न पडावं हे विस्मयजनक वाटत होतं. केव्हा केव्हा सत्य हे कल्पितापेक्षा विस्मयजनक असू शकतं याचा प्रत्यय मला आला होता. वंकटलालचं घोडं मालासह परत आणण्याचं अवघड काम मला पार पाडायचं होतं.

घटनास्थळाचं निरीक्षण करीत असताना मनात मी काही निर्णय घेतले होते. त्यानुसार मी वंकटलालना प्रश्न केला, 'आपल्या घरी

काम करणारे व शेतीवर काम करणारे असे किती नोकरचाकर आहेत?'

'अकरा मजूर काम करतात. त्यांचा कोणाचा संशय नाही. उगाच त्यांना त्रास देऊ नका, ते माझे विश्वासू नोकर आहेत.'

'त्यांना त्रास होईल असं मी काही करणार नाही. त्यांची नावं मला हवी आहेत. तपासामध्ये त्यांना विचारपूस करणं आवश्यक आहे.'

वंकटलाल शेठनी मला अकरा जणांची नावं सांगितली. ही अकरा जणांची यादी मी दोन चार वेळा नजरेखालून घातली. तुळशीराम आंध या नावावर माझी नजर मिळून राहिली होती. आंध ही भटकी जमात असून त्यात गुन्हे करणारे आहेत हे मला माहीत होतं.

'तुळशीराम आंध घरी काम करतो की शेतीवर,' मी विचारले.

'तो शेतीवर काम करतो. सध्या शेतात आहे,' बंकटलाल म्हणले.

तुळशीरामचा मला संशय आला होता. वंकटलालशेठची बागाईत गावाबाहेर होती. शेतावरच तुळशीरामला गाठून विचारपूस करण्याचा विचार मनात आला. पोलीस जीपनं मी शेतात गेलो. तुळशीरामला बोलावण्यात आले. पोलीस जीप शेताकडं आल्यानं तो बावरून गेलेला दिसला. तो २५–२६ वर्षे वयाचा सशक्त तरुण होता. त्याला माझ्या समोर उभं करण्यात आलं. शेतावरील बाकीच्या नोकरांना बोलवण्यात आलं नव्हतं. शेतात विचारपूस करण्याऐवजी त्यास दूर नेऊन विचारपूस करण्याचे मी ठरविले. 'याला जीपमध्ये बसवा अन् जीप नदीकाठी घेऊन चला' असे म्हणून मी जीपमध्ये बसलो. तुळशीरामला बरोबर घेऊन आम्ही गावाबाहेर नदीकाठी जीप आणून उभी केली. तपासात विचारपूस करण्याचं तंत्र काही वेगळंच आहे. नदीकाठी त्याला एकट्याला घेऊन येण्यात त्याची हिम्मत खचून, त्यानं खरं ते सांगावं असा बेत होता.

सायंकाळची वेळ झाली होती. त्या बाजूला माणसांची चाहूल लागत नव्हती. सर्व काही स्तब्ध होतं. नदीच्या पाण्याचा खळखळाट कानी पडत होता. या खळखळाटाशिवाय दुसरा काही आवाज येत नव्हता.

नदीच्या तीरावर तुळशीरामला उभं करण्यात आलं. प्रश्नांची सरबत्ती झडली. 'मला कायबी ठावं नाय. चोरी म्या केली नाय.' असं तो सारखं म्हणत होतं. सूर्य मावळतीकडं झुकू लागला होता. अंधार पडायच्या अगोदर गावात परत जायचं होतं, काही तरी धागादोरा घेऊन. तो काही सांगत नाही हे पाहून निराशेचं सावट मनावर पडलं. तुळशीरामला केवळ संशयावरून आणलं आहे. कदाचित तो अपराधी नसण्याची शक्यता होती. आपली चूक होत आहे असं वाटू लागलं. शेवटचा उपाय योजण्याचं मी ठरवलं.

मी मोठ्यानं गरजलो, 'तुळशीराम, तुला एकट्याला आणलंय ते उगीचं नाही. सर्व काही माहीत झालं आहे. तुझे साथीदार पकडले गेले आहेत.' असं म्हणत मी कमरेची रिव्हॉल्व्हर काढून हातात घेतली. रिव्हॉल्व्हर लोड केलेली नव्हती. रिव्हॉल्व्हरशी चाळा करीत त्याला पुन्हा दरडावले, 'तुझ्या साथीदारांनीच तुझं नांव सांगितलंय म्हणून तर तुलाच एकट्याला आणलंय. तुला सर्व काही सांगितलं पाहिजे. नाही तर परिणाम बरा होणार नाही खरं सांगितलंस तर तुझी सुटका करू' माझ्या हातातल्या रिव्हॉल्व्हरकडे तो पाहत होता, त्याच्या चेहऱ्यावरचे हावभाव पालटू लागले. डोळे पाण्यानं डबडबून गेले. मी योजलेली मात्रा लागू पडली.

तो सांगू लागला, 'म्या कायबी नाय केलं. जयंतानं फासलं. तेच्या संगतीनं गेलो हुतो. वाड्यातली पैसं ठिवायची जागा दाव असं जयंता म्हनला हुता हून म्या जागा दावली.' असं म्हणून मुसमुसून तो रडू लागला. रिव्हॉल्व्हर कमरेला लावीत मी एक दीर्घ निश्वास सोडला. फक्त एकच दिवसात यश मिळालं होतं.

तुळशीराम आंध यानं गुन्ह्याची हकीकत सांगितली ती थोडक्यात अशी आहे.

तुळशीराम हा सावरगावचाच राहणारा. दोन वर्षांपूर्वी त्याचं लग्न झालं. मेडशी हे त्याचं सासुरवाडीचं गाव. त्याचा सासरा विठू

आंध पट्टीचा गुन्हेगार. सासुरवाडीला जाणं येणं होत असल्यानं तो विठू आंधाच्या टोळीत सामील झाला. सावरगावचा गुन्हा करण्यापूर्वी बाजाराच्या दिवशी तुळशीराम आंध हा आपल्या सासऱ्याच्या घरी गेला होता. विठूच्या टोळक्यातले सर्वजण बाजारच्या निमित्ताने जमले होते. त्यात माळेगावचा सखाराम आंध, मरळडोहचा रामा तसेच शेंदूर जन्याचे काहीजण जमले होते. सर्वजण मिळून दहा जणांची मैफल जमली होती. त्यात सावरगावचा तुळशीराम व त्याचा मित्र जयंता टेलर हे पण होते. विठूनं तुळशीरामला विचारलं, 'सावरगावात ऱ्हातूस. तुला सावज हेरता येत नाय का? आजचा डाव फुकट नाय गेला पाहिजे.' असं सासऱ्यानं विचारल्यावर तुळशीरामनं वंकटलालच्या घराच्या माहिती दिली. शेतीवरल्या मजुरांचे पैसे तो बैटकीला लागून असलेल्या खोलीतून आणतो हे त्यानं पाहिल्याचं सांगितलं.

या मैफलीत वंकटलालच्या घरी चोरी करण्याचा निर्णय त्यांनी घेतला. अमावास्येचा आदला दिवस पक्का करण्यात आला. त्या दिवशी गावाबाहेर असलेल्या नदीकाठी वडाच्या झाडाखाली जमण्याचे ठरले. जयंता टेलरनं झाडाखालीच जेवणाची व्यवस्था करण्याचं आश्वासन दिलं. ठरल्याप्रमाणं त्यांनी निर्णय अंमलात आणला. मेडशी, मरळडोह, शेंदूरजना येथून ते सावरगांवला नदी काठी आले. जयंतानं आणलेल्या भाकरीवर सर्वांनी ताव मारला. जेवणखाण आटोपल्यावर ही मंडळी गावाबाहेर बसली होती. जयंता व तुळशीराम यांनी इशारा करताच वंकटलालचे घराच्या मागील भिंतीजवळ आले. घराच्या भिंती मातीच्या असल्यानं छिद्र करणं अवघड नव्हतं. तुळशीरामनं छिद्र करण्याची जागा दाखवली. छिद्र करून आत प्रवेश मिळवला. लाकडी पेटीतले दागिने व पैसा मिळून पंचवीस हजाराचा ऐवज घेऊन ते पसार झाले. चोरी केल्यावर गावाबाहेर नदीच्या किनाऱ्यावरच त्यांनी मालाचे वाटप केले. जयंता टेलरकडेच तुळशीरामनं आपला हिस्सा दिला. नंतर ते आपल्या गावी निघून गेले. तुळशीरामनं यातील सर्व गुन्हेगारांची नावं सांगितली.

गुन्ह्याची हकीगत माहीत पडल्यामुळं झालेल्या त्रासाचं चीज झालं. उत्साह द्विगुणित झाला. घोडं कुठं वाहून गेलं हे समजलं होतं. मालमत्तेसह या घोड्याला प्रवाहातून बाहेर काढायचं होतं.

तुळशीराम यास अटक करण्यात आली. त्याने दिलेल्या माहिती-प्रमाणे सावरगावात येऊन जयंता टेलरचा तपास केला. जयंता घरीच हजर होता. आम्हास पाहताच तो चांगलाच हादरला पण वरपांगी त्यानं उसनं अवसान आणलं होतं.

त्याला पाहताच मी विचारले, ' नाव काय तुझं '

' जयंता टेलर ' त्यानं उत्तर दिलं.

' आम्ही का आलो हे सांगायची आवश्यकता नाही. बऱ्या बोलानं बंकटलालच्या घरच्या चोरीतला माल कुठं ठेवला आहे ते सांग. '

' मला काय माहीत ? मी तर टेलरिंगचा धंदा करतो. '

' अस्सं होय ! तुला माहीत नाही ! ' असं म्हणून मी कॉन्स्टेबल युवराज याला म्हणालो, ' जीपमधून तुळशीरामला बाहेर काढ ' तुळशी-रामचं नाव घेताच त्याचा चेहरा पडला. तुळशीराम यास त्याच्या-समोर हातकड्या घातलेल्या स्थितीत उभे केले. जयंतास पाहून तुळशीराम म्हणाला, ' जयंत्या, तूच तर पोलीसला शेतावर धाडलंस. आता का तोंड बंद केलं. दाव की दागिनं. '

जयंता माझ्याकडे पाहून म्हणाला, ' आपण मायबाप, खुशाल घराची झडती घ्या. तुळशीरामचं काय ऐकता. माराच्या भितीनं खोटं सांगतोय. '

जयंताच्या घराची कसून झडती घेतली; पण काही मिळून आले नाही. जयंता म्हणाला, ' टेलरींगच्या धंद्यात मला पैसे मिळतात. मला चोरी करण्याची गरजच काय ? माराच्या भीतीनं तो खोटं सांगतोय. '

संशईत माणसं तपासात काही वेळा भीतीनं खोटं सांगतात. तशातला हा प्रकार नाहीना ! जयंताला गोवण्यासारखं काही मिळालं

नाही. असे विचार माझ्या डोक्यात थैमान घालू लागले. रिव्हॉल्व्हरच्या चाळ्याला भिऊन तर त्यानं खोटं सांगितलं नाही ना !

मी तुळशीरामकडं पाहिलं. तुळशीराम म्हणाला, ‘ साहेब, याला सोडू नगा. परसात पुरलं विरलं असल त्यानं. ’

जयंताच्या घराच्या डाव्या बाजूस मोकळी जागा होती. त्यात एक लहानशी विहीर होती. पुन्हा एकदा रिव्हॉल्व्हरशी चाळा करणं भाग होतं. कमरेचं रिव्हॉल्व्हर हातात घेऊन जयंताच्या समोर धरलं. त्यानं आणलेलं उसनं अवसान मावळू लागलं. दरडावणीच्या स्वरात मी त्यास विचारले, ‘ बोल जयंता ! कुठं पुरलेस दागिने. तुला बोलावंच लागेल. परसातली जमीन खोदून काढीन मी.’

‘सांगतो साहेब, परसातच पुरलेत मी. दागिन्याची पोटली दाखवतो. दोन पंचांना बोलावण्यात आले. त्याने जागा दाखवली. रात्रीची वेळ झाली असल्यानं गॅसबत्त्या आणल्या होत्या. त्यानं दाखवलेल्या जागेवर दोन फूट खोदल्यावर कापडाची एक पोटली बाहेर काढली. त्याचे तोंड उघडून पाहिलं असता; तीन हजार रुपये किंमतीचे मारवाडी फॅशनचे दागिने मिळाले. या दागिन्यात फिर्यादी बंकटलाल याच्या पत्नीचे नाव कोरलेली मीनावर्क केलेली अंगठी मिळाली. त्यानं दिलेल्या फिर्यादीत दागिन्यांचे वर्णन केले होते. त्या वर्णनास जुळतील असेच ते दागिने होते. ते दागिने बंकटलालचेच होते यात संशय वाटण्यासारखे काही नव्हते. बंकटलाल शेठना त्याठिकाणी बोलावण्यात आले. त्यानं दागिने पाहताच ओळखले. त्यांच्या पत्नीनेही ओळखले.

बंकटलाल मला म्हणाला, ‘ पाण्यातून घोडा वर काढलात. एकदा वाहून गेलेलं घोडं पुन्हा सापडेल असं वाटलं नव्हतं. घोडं तर मिळालंच पण त्यावर लादलेलं गाठोडंही हाती लागलं आहे. आठ महिन्यात जे साधलं नव्हतं ते फक्त एका दिवसात. तुळशीराम माझा विश्वासू नोकर.. तो असं करेल असं वाटलं नव्हतं, आपण त्याला अचूक हेरून काढलंत.’

'घोडा अजून पूर्णपणे पाण्यातून निघाला नाही. त्यावरच्या गाठोड्यापैकी एक गाठोडं मिळालं आहे. बाकीची गाठोडीही मिळतील' मी म्हणालो.

'आपल्या हाताला यश मिळालं. जादूनं भारलेले हात दिसतात. आपण प्रथम माझ्याकडे आलात त्यावेळी माझ्याकडे चहादेखील घेतला नव्हता आता तरी चहा घेणार की नाही ?'

'आता जरूर घेईन.' असं म्हणून आम्ही दागदागिने पंचांसमक्ष जप्त करून बंकगलालचे बैठकीत गेलो. विजयाचा कैफ वेगळाच असतो ! आज पूर्ण दिवसभर धावपळीत गेला. त्याचं सार्थक झालं. जयंता टेलर यास अटक करण्यात आली. चहापाणी झाल्यावर बंकटलाल यांचा निरोप घेतला. तुळशीराम आंध व जयंता टेलर यांना बरोबर घेऊन आम्ही सावरगांवहून निघालो.

सावरगांव ते अकोला जाताना चान्नीवरून जावे लागते. चान्नी गांव वाटेवरच असल्यानं जीप चान्नी पोलीस स्टेशनसमोर थांबवली. सावरगांवची चोरी पडकल्याची वार्ता गावभर पसरण्यास वेळ लागला नाही. चान्नीगावचे लोक जीपभोवती जमून जयंता टेलर व तुळशीराम आंध यांना पाहत होते.

जीपमधून उतरल्यावर पो. कॉन्स्टेबल युवराज यास बरोबर घेऊन नदीकाठच्या दर्ग्याकडे गेलो. यश दिल्याबद्दल डोळे मिळून प्रार्थना केली. दर्ग्यावरून पोलीस स्टेशनकडे येताना रस्त्यात जमनलाल मारवाडी भेटले. त्यांना मी म्हणालो, 'जमनशेठ, आपण म्हणाला होता ना की माल मिळाला नाही तरी चालेल पण चोरी कोणी केली हे सिद्ध करून दाखवा. आम्ही चोरांना तर पकडलेच, पण तीन हजार रुपये किमतीचे दागिनेही प्राप्त झाले आहेत.'

'आपण सावरगांवची चोरी पकडल्याची वार्ता गावभर झाली आहे, मी आपणाकडेच येत होतो. इतक्या तडकाफडकी आपण चोरी उघडकीस आणाल, अशी शक्यता वाटत नव्हती. बंकटलाल तर आशीर्वाद देईलच पण त्याचा ज्या नातेवाईकावर संशय होता ते नाते-

बाईकही आपणास आशीर्वाद देतील. काही तरी दैवी शक्तीच तुमच्या पाठीशी असावी. विशेषत: आठ महिन्यानंतर आपल्या हाती केस आली असताना, अवघ्या एका दिवसात यश प्राप्त केलंत.'

आम्ही बोलत बोलत जीपजवळ आलो. जमनलाल शेठ यांनी दोन्ही आरोपींना पाहून घेतलं. दागिनेही पाहून घेतले. जीपच्या अवती-भोवती गावकऱ्यांचा गराडा पडलेला होता. सर्वांचा निरोप घेऊन आम्ही बाळापूरला आलो. तेथे रात्रभर मुक्काम केला. अकोल्यास जाऊन एस्. पी. श्री. द्रवीड साहेबांना भेटायचं होतं.

दुसऱ्या दिवशी आरोपी व दागदागिने यांच्यासह निवडक स्टाफ बरोबर घेऊन अकोल्यास गेलो.

एस्. पी. साहेबांच्या ऑफीससमोर आलो. स्टीलची चमकदार बटनं असलेला बंद गळ्याचा कोट घातलेला प्यून स्टूलावर बसला होता. मला पाहून तो लगबगीनं उठून उभा राहिला.

'साहेबांना भेटायचंय मला. चिठ्ठी नेऊन दे.' असं म्हणताच त्यानं माझ्या नावाची लिहिलेली चिठ्ठी घेतली. स्प्रींगच्या फाटकाचा कर्रर्कन आवाज करीत तो आत गेला. थोड्याच वेळात तो बाहेर आला आणि त्यानं मला आत जाण्याचा इशारा केला. अभिमानानं ऊर भरून आला होता. मार्चींग करीत आत जाऊन हॉल्ट केला. अटेन्शन होताना बुटांच्या एडीज एकमेकावर आपटल्यानं खाड्कन आवाज झाला. या आवाजासरशी एक कडक सॅल्यूट ठोकला गेला. अभिवादनाचा स्वीकार करून साहेब म्हणाले, 'सावरगावच्या चोरीची काही खबर मिळाली का?'

'होय सर, त्याच गावचे दोन आरोपी मिळाले. एकाचं नाव तुळशीराम आंध असून दुसऱ्याचं नाव जयंता टेलर आहे. त्यांनी तीन हजार रुपयाचे दागिने पुरून ठेवलेले काढून दिले आहेत' असं म्हणून मी दागिन्याची पोटली साहेबांच्या टेबलावर ठेवून सर्व दागिने दाखवले.

'शाब्बास ! तुमच्याकडून अपेक्षा होती म्हणून तर मी हा तपास तुमच्यावर सोपवला. आरोपींना पाहू या चला' असे म्हणून ते उठले अन् बाहेर येऊन जीप मध्ये बसवलेल्या दोन्ही आरोपींची विचारपूस केली. त्या दोघांनीही गुन्ह्याची पूर्ण हकीगत निवेदन केली. माझ्याकडे पाहून एस्. पी. साहेब म्हणाले, 'बाकीचे गुन्हेगार छापे घालून पकडा. त्यांच्याकडून राहिलेला माल काढण्याचा प्रयत्न करा. तुम्हाला मी बक्षीस जाहीर करीत आहे. तुमच्या स्टाफलाही बक्षीसे मिळतील. लागेल ती मदत घ्या. आणखीन एक जीप मी तुमच्याकडे देत आहे. तपास पूर्ण करून भेटा.'

'येस सर!' असे म्हणून मी माझ्या कामास लागलो. माझ्या ताब्यात आणखीन एक जीप देण्यात आली होती.

दोन्ही आरोपींनी सांगितलेल्या माहितीवरून माळेगाव, मरळडोह, मेडसी, शेंदूरजना, सेलू या ठिकाणी छापे घालून राहिलेले आठ आरोपी पकडण्यात आले. या तपासात दहा हजार रुपयाचे दागिने जप्त झाले. ते सर्व बंकटलालच्या मालकीचे होते. या टोळीचे सूत्रधार विठू आणि सखाराम आंध यांच्याकडून पातूर, भंडारज या ठिकाणच्या घरफोड्या चोऱ्यांमधील बारा हजारांचा माल हस्तगत केला गेला. एक महिनाभर सतत तपासाचे काम चालू होते.

माळेगाव येथील गुलाबराव पाटील व सरपंच यांनी तपासात मोलाची मदत केली. ती एस्. पी. साहेबांच्या निदर्शनास आणल्यावर; त्या दोघांनाही प्रशस्ती-पत्रके देण्यात येऊन त्यांचा मानसन्मान केला गेला. बंकटलाल यांचे चोरीस गेलेल्या मालापैकी दहा हजार रुपयाचा माल परत मिळाला. आठ महिन्यानंतर इतका माल हाती लागला हेच विशेष ! बाकीचा माल चोरट्यांनी सोनाराकडे दिला होता. दागिने गाळून सोन्याच्या कांबी बनवून ते सोने विकण्यात आले होते.

सावरगावच्या घरफोडी चोरीचे गुन्ह्यात अटक झालेल्या अपराध्याविरुद्ध कोर्टात दोषारोपपत्र दाखल करण्यात आले. त्याचा निकाल लागून आरोपींना सजा ठोठावण्यात आल्या. भंडारज व पातूर या

ठिकाणीही याच टोळीने चोऱ्या केल्या होत्या. त्या गुन्ह्यातही दोषारोप-पत्रे पाठविली गेली. या दोनही गुन्ह्यात आरोपींना सजा झाल्या आहेत.

सावरगावच्या केसचा निकाल झाल्यावर जप्त केलेले दागिने वंकटलाल यांना वापस करावेत असा कोर्टाचा हुकूम झाला. हे जप्त दागिने बाळापूर पोलिस स्टेशनला. ठेवण्यात आले होते. वंकटलाल यांना बाळापूरला बोलावून घेण्यात आले. तो दिवस माझ्या चिर-स्मरणात राहील. चोरीस गेलेला माल हस्तगत करून ज्याचा असेल त्याला परत करताना, जो आनंद मिळतो त्याचं वर्णन शब्दात करता येणार नाही.

मण नदीच्या तीरावरील उंच टेकडीवर बाळापूर पो. स्टेशन आहे. वंकटलाल पोलीस स्टेशनला आले, तेव्हा त्यांचा चेहरा हसरा होता. मला पाहून ते म्हणाले, ‘ घोडं अन् त्यावरची संपत्तीनं भरलेली गाठोडी वाहून गेली होती. तुम्ही घोडं अन् गाठोडी परत मिळवून दिलीत. चोरटे कोण हे तर समजलेच पण त्यांनी चोरलेला मालही मिळाला. राहून गेलं असेल एकादं गाठोडं. आठ महिन्यानंतर इतका माल मिळाला यातच तुमची धन्यता मानतो. नातेवाईकांवर माझा संशय होता. तो दूर झाला आहे. म्हातारपणी नातेवाईकांशी भांडण तंटा करण्याची पाळी आली होती. आपण माझी लाज राखलीत ’ असं म्हणून त्यांनी दागिन्याची पोटली ताब्यात घेतली. बाळापूरला ते स्वतःचे घोड्यावर बसून आले होते. दागिने घेऊन परत जात असताना मी म्हणालो, ‘ नदीच्या पात्रातनं जपून जा. घोडं वाहून जाणार नाही याची खबरदारी घ्या. ’ माझं बोलणं ऐकून ते खळखळून हसले. ते हसताना पाहून मलाही हसू आलं. आम्ही दोघं हसत असताना घोड्यावरून ते निघून गेले.

कल्पितापेक्षाही विस्मयकारक अशी ही सत्य घटना सन १९७१ मध्ये घडली आहे. ही सत्य घटना आजही माझ्या स्मरणात जशीच्या तशी राहिली आहे.



सात

# दरोडेखोरांशी सामना

रात्रीचे दहा वाजून गेले होते. पोलीस स्टेशनमधलं वातावरण थंडावू लागलं होतं. रोलकॉल केव्हाच सुटला होता. रोलकॉलवर पोलीस स्टेशनमधला बहुतेक स्टाफ उपस्थित असतो. ड्यूटी वाटप संपले की जो तो आपल्या कामगिरीवर निघून जातो. ठाणा हजेरीचे शिपाई सोडून बाकीचा स्टाफ निघून गेला होता. थोड्या वेळापूर्वी बाळापूर पोलीस स्टेशन गजबजून गेलं होतं. सायंकाळ झाली की तक्रारी नोंदवून घेणारा हेड कॉन्स्टेबल व त्याच्या हाताखालील स्टाफ कामात व्यस्त होऊन जातात. रात्रीच्या दहानंतर त्यांना उसंत मिळते. नेहमीप्रमाणं आजही सगळीकडं सामसूम झालं होतं. ऑफीसात मी गुन्ह्याचे नोंदणी बुक लिहित बसलो होतो. कॉन्स्टेबल युवराज मला आलेल्या फिर्यादी वाचून दाखवीत होता. मी त्याची नोंद करीत होतो. गुन्ह्यांच्या नोंदणीचं काम संपवून लवकर घरी जावं, या विचारात असतानाच टेबलावरील फोन खणखणला. मन साशंक झालं. रात्री दहा वाजता येणारा फोन म्हणजे काहीतरी भानगड हमखास असणार, असा विचार माझ्या मनात क्षणभर तरळला. दिवसभर काम करून थकून गेलो होतो मी. जरा नाराजीनं टेलिफोनचा रिसिव्हर उचलून कानाशी लावीत म्हणालो, 'पोलीस स्टेशन बाळापूर, सब इन्स्पेक्टर बोलतोय, आपण कोण ?'

'वाडेगावहून जगन्नाथ पाटील बोलतोय.' जगन्नाथ पाटलांचा परिचित आवाज ओळखला मी. ते वाडेगावचे सरपंच आहेत हे मला

माहीत होतं. मी त्यांना म्हणालो, 'बोला पाटील! काय खबर आहे?'

'तुलंगागावचे पाच-सहा लोक वाडेगावला आले आहेत. त्यांनी सांगितलं की तुलंग्याला प्रल्हाद लांडेच्या घरावर डाका पडलाय. दरोडेखोरांनी गोळीबार केल्यानं, त्यांच्या अंगावर जखमा झाल्या आहेत. बंदुकीचे बार काढीत रात्री सात वाजताच त्यांनी गावात प्रवेश केला. प्रल्हाद लांडेला आणि त्याच्या लक्ष्मीला दरोडेखोरांनी मारहाण करून जखमी केलं आहे. ते दोघेही वाडेगावला आलेले नाहीत. त्यांचे दागिने व पैसा घेऊन दरोडेखोर निघून गेले आहेत.'

'काय म्हणता ?सात वाजताच दरोडेखोर गावात शिरले! गावातले लोक जागेच असतील! त्यांनी काही प्रतिकार केला नाही का?' पाटलांचे बोलणे संपायच्या आत मी त्यांना विचारलं.

'रात्री साताची वेळ, सारं गाव जागंच होतं. बंदुकीचे बार ऐकून गावकरी भयभीत झाले. जे गावकरी प्रतिकार करण्यास बाहेर आले त्यांना गोफणीच्या गुंड्याचे तडाखे बसले, काही जण बंदुकीच्या काडतुसाचे छर्रे लागून जखमी झाले. चान्नी पोलीस स्टेशनमधले गाव पण चान्नीला फोन नाही, म्हणून मी आपल्याला फोन केला आहे पोलीस पार्टी घेऊन या. लोक भयभीत झाले आहेत. दरोडेखोर जवळच्या दुसऱ्या गावात लुटालूट करण्याची शक्यता आहे.'

जगन्नाथ पाटलांच्या आवाजात कंप होता, आर्जव होतं. तुलंगागाव पोलीस स्टेशन चान्नीमधलं गाव आहे हे माहीत असताना त्यांनी बाळापूरला फोन लावून ही घटना सांगितली होती. त्यांचा उद्देश उघड होता. पोलिसांना लवकर खबर पोहोचली तर दरोडेखोरांना पकडणं शक्य होतं. दुसरं असं की दरोडा पडल्याचं ऐकून गावकरी भयभीत झाले होते. पोलीस पार्टी आल्यानं त्यांचं मनोबळ वाढणार होतं, भयभीतपणा जाणार होता.

'पाटील! काळजी करू नका. पोलीस पार्टी तुलंग्याला आताच रवाना करतो.' असं म्हणून मी त्यांना धीर दिला.

'साहेब, आपण आलात तर बरं होईल. दरोडेखोर दहा बारा आहेत. त्यांच्याजवळ बंदुका, लाठ्या, गोफणी आहेत. ते आणखी काहीही करू शकतात ' त्यांचं हे बोलणं ऐकून मी क्षणभर विचार करून म्हणालो, 'मी तुलंग्याला येऊन उपयोग नाही. दरोडेखोरांना पकडायचं आहे ना ! दिवस निघायच्या आत दरोडेखोर पकडले जातील. चान्नी ठाण्याला एक माणूस पाठवून खबर पोहोचवा. जखमी लोकांना दवाखान्यात पाठवा. दरोडेखोरांच्या मागावर मी निघत आहे. तुम्ही लवकर खबर दिली हे बरं झालं.' असं म्हणून मी रिसिव्हर ऱ्हॅंडलवर ठेवला.

दरोड्यासारख्या भीषण गुन्ह्याची खबर होती ती. आत्मविश्वासानं दरोडेखोरांना दिवस निघायच्या आत पकडतो असं बोलून गेलो होतो. जादूची कांडी फिरवून दरोडेखोर पकडून हजर करायचे, अशातला भाग नव्हता. मला आत्मविश्वास होता. त्याचं कारण असं की, मला तुलंगागावची माहिती होती. तीन हजार वस्तीचं हे गाव बाळापूरपासून वीस ते पंचवीस किलोमिटर अंतरावर होतं. दरोड्याची वेळ लक्षात घेता रात्री ७ वाजण्याची वेळ होती व रात्री १० वाजता मला खबर पोहोचली होती. तुलंगागावाकडे जाणारे सर्व रस्ते माझ्या परिचयाचे होते. फोन बंद केल्यावर मी टेबलावरला कागद घेतला. तुलंगा गावाच्या दिशेनं जाणाऱ्या रस्त्याचा नकाशा तयार केला. मला माहीत होतं की चंबळ खोऱ्यातला मानसिंग डाकू, काळाघोडा डाकू असे किती तरी दरोडेखोर नैसर्गिक दऱ्याखोऱ्यांचा आश्रय घेऊन डाके घालतात. तसला प्रकार हा नव्हता. इथं चंबळचं नैसर्गिक खोरं नव्हतं. तरी पण पोलीस खात्याला आव्हान देणारी घटना घडली होती. जगन्नाथ पाटलांना मी केवळ पोकळ आश्वासन दिलेलं नव्हतं. चंबळमधल्या दरोडेखोरांजवळ घोडे असतात. आपल्याकडल्या दरोडेखोरांजवळ घोडी नसतात अन् लपायला दऱ्याखोऱ्याही नव्हत्या. इथल्या दरोडेखोरांचं पळून जाण्याचं सोयीचं साधन म्हणजे रेल्वे, एस्. टी. बस किंवा स्वत: आणलेली जीप. तीन तासांच्या अवधीत मला खबर मिळाल्यानं मी त्यांचा पाठलाग

करून पकडू शकत होतो. व्यूहरचना बरोबर करायचं मी मनोमन ठरवलं होतं. एकदा जाळं फेकलं की ते कुठे ना कुठे मला मिळणार होते म्हणून मी आत्मविश्वासानं बोललो होतो.

विद्युतगतीनं व्यूहरचना करणं आवश्यक होतं. कागदावर तुलंगा गावाकडे जाणारे रस्ते काढून झाल्यावर मी जगन्नाथ पाटलांनी फोन करून जी खबर दिली त्याची नोंद पोलीस स्टेशन डायरीत घेतली. पोलीस स्टेशनमध्ये हजर असणाऱ्या सर्व स्टाफला तुलंगागावी दरोडा पडल्याची वार्ता समजली होती.

पो. कॉं. युवराजनं टेबलावरचा नकाशा पाहून विचारलं, 'हे सर्व रस्ते रोकणं कसं शक्य आहे?'

'तुलंग्याकडे सहा रस्ते जातात, तीन रस्ते वाडेगांव ते पातूर रस्त्याला जोडले गेले आहेत. या सर्व रस्त्यावर हत्यारी शिपाई सोडणं जरुर आहे.'

'साहेब आपल्याकडं पोलीस व्हॅन नाही. त्यातनं स्टाफही पुरेसा नाही. अकोल्याहून पोलीस गाडी येईपर्यंत दरोडेखोर निघून गेलेले असतील.' युवराजचं म्हणणं बरोबर होतं. दरोडेखोरांचा पाठलाग करण्यास वाहनाची गरज होती. प्रत्येक क्षण महत्त्वाचा होता.

मी युवराज म्हणालो, 'तू असं कर. पोलीस ठाण्यातली घंटा वाजव. पोलीस लाईनमध्ये असलेले शिपाई धोक्याची घंटा आहे, हे ओळखून ठाण्यात येतील. मी खाजगी मालट्रक मिळतात का ते पाहातो.' धोक्याची घंटा वाजवण्याकरिता कॉन्स्टेबल युवराज गेला.

बाळापूरमध्ये विजयकुमार शेठ गुजराथी यांच्याकडे दोन मालट्रक असल्याचं माहीत होतं.

'रणजीत! इकडं ये' असं म्हणून मी कॉन्स्टेबल रणाजीतला बोलावले. 'जीऽऽ साहेब' असे म्हणत तो आला. 'विजयकुमार शेठकडं जा अन् त्यांना म्हणावं अर्जंट काम आहे. साहेबांनी बोलावलय. त्यांना बरोबर घेऊन ये.'

'जी ऽऽ साहेब' असं म्हणून तो निघून गेला.

पोलीस ठाण्यातली घंटा घण् घण् घण् वाजत होती. कुणीतरी आपल्या डोक्यात घणाचे घाव घालीत आहे असं वाटत होतं. एक मन म्हणत होतं उगाच या भानगडीत पडलास चान्नी पोलीस स्टेशनमधलं हे गाव! फोनवरून खबर मिळाली म्हणून काय झाले! एखादी पोलीस पार्टी रवाना केली की आपली जबाबदारी संपली. चान्नीचा पोलीस सब इन्स्पेक्टर शिंदे घटनास्थळावर जाऊन तपास करील. रात्रीची वेळ! तशात थंडीचे दिवस असताना नसती उठाठेव करून जिवाला त्रास करून घेण्यात काय अर्थ? इतकं करूनही जर दरोडेखोर सापडले नाहीत तर आपलं हसू झाल्याशिवाय राहणार नाही.

दुसरं मन म्हणत होतं, 'वाडेगावच्या सरपंचाला पोकळ आश्वासन देऊन त्याचा विश्वासघात करणार आहेस का? तुझ्यावर विश्वास, श्रद्धा असल्यानं त्यानं फोनं करून दरोड्याची वार्ता सांगितली. त्यानं आपलं कर्तव्य बजावलं, तू मात्र कामचोर होऊ पाहतो आहेस. दरोडेखोरांच्या मागावर गेला नाहीस तर तुझं काही बिघडणार नाही कारण ते गाव तुझ्या हद्दीत येत नाही; पण म्हणून काय झाल! प्रल्हाद लांडेला व त्याच्या पत्नीला बेदम मारहाण झाली. दागीने अन् पैसा लुटला गेला. गावतली माणसं जखमी झाली त्याचं तुला काहीच का वाटत नाही? पोलीस म्हणून तुझं कर्तव्य तुला बजावलं पाहिजे. हे माझ्या हद्दीतलं गाव नाही असं म्हणून तुला कर्तव्य टाळायचं आहे का? चल ऊठ, हाती घेतलेलं काम पुरं कर!' माझ्या दुसऱ्या मनाचा विजय झाला होता. प्रयत्नांची शिकस्त करून व्यूहरचनेचा उपयोग करून दरोडेखोरांना पकडण्याचा निर्णय मनात घेतला.

घण् घण् घण् घंटेचे टोल पडतच होते. पोलीस लाईनीत राहणारे शिपाई अवेळी वाजत असलेली घंटा ऐकून ठाण्यात जमू लागले होते. पोलीस ठाण्यात वीस कर्मचारी जमले होते.

तेवढ्यात पो. कॉ. रणजीत विजयकुमार शेठला घेऊन ऑफिसात आला.

'विजयकुमार शेठ आले आहेत', तो म्हणाला. त्यांच्याकडे पाहत मी म्हणालो, 'एक जरूरी काम पडलं म्हणून मी आपणास इथं बोलावून त्रास दिला.'

'आपलं माझ्याकडे कोणतं काम आहे ते सांगा. विशेष असं काम दिसतंय.'

'शेठ! ठाण्यासमोर जमलेला स्टाफ आपण पाहिलातच. आज सायंकाळी ७ वाजता तुलंगा येथे दरोडा पडला, प्रल्हाद लांडेच्या घरावर. दागदागीनं, पैसा आडका लुटून नेला. गावकरीही जखमी झाले आहेत. दरोडेखोरांना पकडणं जरुर आहे. या कामासाठी आम्हाला आपल्या मदतीची अपेक्षा आहे.'

'मी कसा काय मदत करू शकतो. दरोडेखोरांना पकडणं साधी गोष्ट आहे कां?'

'तसं नव्हे! आपल्याकडं दोन माल ट्रक आहेत. त्या दिल्यात तर त्यांचा पाठलाग करून पकडता येईल. नाही म्हणू नका! तुमचा डिझेलचा खर्च सरकार देईल. ड्रायव्हरचाही खर्च देऊ. तुम्ही ट्रक्स् दिल्या तरच त्यांचा पाठलाग करता येईल.'

'इतकेच ना! चांगल्या कार्यासाठी मी उपयोगी पडतो हे आपणास माहीत आहे. दहा-पंधरा मिनिटांत दोन्ही ट्रक आणून उभ्या करतो. जातो मी' असं म्हणून ते निघून गेले.

ट्रक्स् येईपर्यंत जमलेल्या स्टाफला रस्ते कसे रोखून धरायचे याची माहिती मी सांगू लागलो.

मी म्हणालो, 'दरोडेखोर ही आपल्यासारखीच माणसं आहेत. तुलंग्याहून ते रात्री ७-३० वा. पळाले असावेत. तीन-साडे-तीन तासात ते जास्तीत जास्त १५ ते २० मैलांचं अंतर तोडू शकतात. तुलगा गावापासून वीस मैल अंतरावरून आपला स्टाफ तुलंग्याच्या दिशेनं जाईल. सहा रस्ते आहेत. प्रत्येक रस्त्यावर रायफल घेतलेले दोन शिपाई सोडण्यात येतील. रेल्वे स्टेशन पारस येथे एक पार्टी जाईल. बाळापूर व

खामगांव येथील एस्. टी. स्टॅण्डवर प्रत्येकी एक पार्टी पाठवण्यात येईल. पो. कॉं. रणजीत व पोलीस हेड कॉं. सूर्यभान हे माझ्याबरोबर राहतील. एक ट्रक बाळापूर ते पातूर मार्गानं जाईल व दुसरा ट्रक बाळापूर ते खामगाव मार्गानं जाईल. तुलंग्याकडे जाणाऱ्या रस्त्यावर पार्टीना सोडून देण्यात येईल' असं म्हणून मी त्यांना तुलंगा गावचा नकाशा दाखवला. तुलंग्याकडं जाणारे सर्व मार्ग दाखवले. कोणी कुठं जायचं ते ठरवून दिलं.

त्यांच्या शंका जाणून घेण्याच्या उद्देशानं मी म्हणालो, 'कुणाला काही शंका विचारायची असल्यास विचारावी.'

फर्स्टग्रेड जमा. शिंदे म्हणाले, 'आपला स्टाफ कमी पडतो. दोन, दोन शिपाई प्रत्येक पार्टीत आहेत. त्यांनी दरोडेखोर समोर भेटल्यास सामना करून पकडायचं कसं?'

त्यांचा प्रश्न बरोबर होता. दरोडेखोर संख्येनं दहाबारा असावेत.

त्यांना मी म्हणालो, 'घाबरून जाण्याचं कारण नाही. तुमच्याकडची हत्यारं श्रेष्ठ दर्जाची आहेत. आपल्याकडच्या दरोडेखोरांजवळ देशी तमंचे असतील फार तर. हत्यारांचा उपयोग करण्याची वेळ आली तर अवश्य उपयोग करा. एकजरी दरोडेखोर हाती लागला तरी हरकत नाही. बाकीचे आपण पकडून आणू शकतो.'

प्रत्येक कर्मचाऱ्यास रायफल देण्यात आली. तेवढ्यात दोन्ही ट्रक्स् पोलीस ठाण्यात आल्या. जगन्नाथ पाटलांना दिलेलं आश्वासन पूर्ण करण्याच्या दृष्टीनं पहिलं पाऊल पडलं होतं. वचनपूर्ती करण्यासाठी आणखी खडतर प्रवास करायचा होता. सुरुवात तर छान झाली होती.

बाळापूर ते खामगावकडे जाणाऱ्या ट्रकमध्ये तीन हत्यारी पार्ट्या घेऊन मी बसलो. माझ्याबरोबर कॉं. रणजीत व हेड कॉन्स्टेबल सूर्यभान होते. तुलंगा गावाकडे जाणाऱ्या फाट्यावर एक एक पार्टी सोडायची होती. तेथून या पार्टीतील लोक पायी तुलंगा गावापर्यंत जाणार होते. रस्त्यात कोठेही दरोडेखोरांचा मागमूस लागला तर वेळ प्रसंगी रायफलींचा उपयोग करण्याच्या सूचना देण्यात आल्या होत्या.

हेड कॉ. शिवाजी यांना बाळापूर ते पातूर रोडवर तुलंग्याकडे कोठून रस्ते फुटतात याची माहिती होती. त्यांना मी सांगितले,' शिवाजी, तुम्ही दुसरी ट्रक बरोबर घेऊन जा. जेथून फाटे फुटतात त्या ठिकाणी एक एक पार्टी उतरवा.'

'होय, साहेब ! आपण सूचना दिल्याप्रमाणे पार्ट्या तुलंग्याकडे रवाना करतो,' असे म्हणून ते पार्ट्यांसह दुसऱ्या ट्रकमध्ये बसले दोन्ही ट्रक रात्री १०॥ वाजता बाळापूरहून रवाना झाले. बाळापूर सोडल्यावर दहा किलोमिटर अंतरावर तुलंगा गावाकडे जाणारा रस्ता होता. तेथे ट्रक थांबवून रायफलधारी दोन शिपायांना सोडून देण्यात आले. त्यानंतरच्या फाट्यावर दुसरी पार्टी उतरली. टेंभुर्णा फाट्यावर तिसरी पार्टी उतरवली. टेंभूर्णापासून खामगाव जवळेच असल्यानं मी ट्रकसह खामगावला गेलो. माझा कयास होता की खामगावपर्यंत एस्. टी. ने येऊन दरोडेखोर पायी तुलंग्यापर्यंत गेले असावेत.

जमादार सूर्यभानला म्हणालो, 'एक पार्टी खामगांव एस्. टी. स्टॅण्डवर हजर राहील. एस्. टी. मध्ये बसणाऱ्या पॅसेंजरना चेक केले पाहिजे. असे सांगून मी खामगांव एस्. टी. स्टॅण्डवर उतरून प्रवाशांची कसून तपासणी केली. तपासणीत संशयास्पद असं कोणी दिसून आलं नाही. रात्री दोन वाजेपर्यंत काही मागमूस लागला नव्हता. तुलंग्याचा काढलेला नकाशा सोबत घेतला होता. पुनःपुन्हा तो नकाशा पाहत होतो. व्यूहरचनेत काही चुकलं तर नाही ना! अशी शंका येत होती. एखादी चूक देखील दरोडेखोरांच्या फायद्याची ठरणार होती.

रणजीतनं मला आठवण दिली, 'साहेब, पारस रेल्वे स्टेशनवर पहाटे चार वाजेपर्यंत जायचं आहे. नागपूर–दादर एक्सप्रेस चार वाजता पारस स्टेशनवर येते. खामगांवहून आपण निघालं पाहिजे. खामगाव एस्. टी. स्टॅण्डवर कॉ. महादेव व कॉ. गजानन हे आहेतच.'

'तू म्हणतोस ते बरोबर आहे. पारस रेल्वे स्टेशन चेक करायचं आपलं ठरलंच आहे.' असं म्हणून मी ट्रक पारस रेल्वे स्टेशनकडे नेण्यास सांगितलं. 'दिवस निघायच्या अगोदर दरोडेखोरांना पकडतो' असे

फोनवरून पाटलांना दिलेलं वचन मला बेचैन करीत होतं. उत्कंठा शिगेस पोहोचली होती. पारस रेल्वे स्टेशन हा या व्यूहरचनेतील एक अत्यंत महत्त्वपूर्ण टप्पा होता. ड्रायव्हरला मी सूचना केली, 'ड्रायव्हर, पारस रेल्वे स्टेशनवर पहाटे चारच्या अगोदर ट्रक पोहोचला पाहिजे.'

'ठीक आहे' असं म्हणून त्यानं गाडीचा वेग वाढवला.

हेड कॉ. सूर्यभान म्हणाले, 'आपण परत जात आहोत. ज्या फाट्यावर पार्टी सोडण्यात आल्या तेथे ट्रक थांबवून दरोडेखोरांची काही हालचाल दिसते का, ते पाहू. तसंच एखादी पार्टी यशस्वी होऊन कुणाला पकडून फाट्यावर आली असल्यास, त्यांनाही बरोबर घेता येईल.' त्यांच्या सूचनेस मी लगेच मान्यता दिली. टेंभुर्णी फाटा व पुढचे दोन्ही फाटे पाहिले पण कसलीच हलचाल दिसून आली नाही. एक एक क्षण महत्त्वाचा होता. रस्त्यात बाळापुरचा एस्. टी. स्टॅण्डही पाहिला पण तेथेही काही उपयोग झाला नाही.

पहाटे पावणे चार वाजता आमची ट्रक पारस रेल्वे स्टेशनजवळ येऊन थांबली. नागपूर-दादर एक्सप्रेस येण्यास पंधरा मिनिटांचा अवधी होता. ट्रक थांबवताना खबरदारी घेण्यात आली होती की ट्रक आल्याच स्टेशनातल्या लोकांच्या लक्षात येऊ नये. वळणावर ट्रक उभा करून आम्ही उतरलो. वळण संपताच स्टेशन दिसू लागलं. पारस गावापासून दोन किलोमिटर अंतरावर रेल्वे स्टेशन असल्यानं जवळपास वस्ती नाही. स्टेशनच्या बाहेर झोपडीवजा तीन हॉटेल्स्मधून लाईट येत होता. बुकिंग ऑफीसच्या खिडकीसमोर वेटींगरूम होती. शंटींग चाललं असल्यानं इंजिनाचा आवाज येत होता. बुकींग ऑफीसच्या खिडकीवरचा लाईट चालू होता. गडद अंधारातून स्टेशनच्या दिशेनं आम्ही येत होतो. हेड् कॉ. सूर्यभान, कॉ. रणजीत व मी असे तिघेजण होतो.

जाताना हळू आवाजात मी त्यांना म्हटलं, 'बाजूच्या तीन हॉटेलात कुणी बसलंय कां हे पाहिलं पाहिजे.' मी असं सांगितल्यावर आम्ही

हॉटेलकडं मोर्चा वळवला. हॉटेलमधले बेंच रिकामे होते. हॉटेलच्या कडेला असलेल्या भट्टया विझून गेल्या होत्या. बाकावर हॉटेलातली पोरं घोरत पडली होती.

आम्ही जवळ जावून पाहिलं तरी कुणी जागं झालं नाही. हेड् कॉ. सूर्यभान व कॉ. रणजीत बुकींग ऑफीस समोरच्या वेटींग हॉलकडं निघाले. अमावास्येची रात्र होती. काळोखामुळं ते बुकींग ऑफीसकडं कोणत्या रस्त्यानं गेले, मला लवकर लक्षात आलं नाही. वेटींगच्या हॉलकडे पाहिलं, तेव्हा ते दोघेही आत गेल्याचं दिसलं, पाठोपाठ फूर्रर्रं, फूर्रर्रऽ असा शिट्टीचा आवाज कानी आला पळतच मी तिथं गेलो. रणजीतनं एका इसमाच्या कंबरेला हातांचा विळखा घालून पकडून ठेवलं होतं. मला पाहताच तो म्हणाला, 'आम्हाला युनिफॉर्ममध्ये पाहून पांच-सहा जण पळाले. सूर्यभान त्यांच्या मागं गेलाय!' त्यानं धरून ठेवलेला इसम उंचा पूरा व सशक्त होता. पळून जाण्याचा तो प्रयत्न करीत होता. ते पाहून मी कमरेचं रिव्हॉल्व्हर हातात घेतलं. 'पळून जाण्याचा परिणाम काय होईल हे तुला दिसतंच आहे. हात पुढे कर' असं म्हणत मी त्याच्या हातात बेड्या ठोकल्या.

घामाघूम होऊन धापा टाकीत सूर्यभान परत आले. 'उभ्या पिकात पळून गेले. रणजीतनं धरलेलाच हाती लागलाय. आपल्याजवळ स्टाफ नाही त्यांचा पाठलाग मी एकट्यानं करून काही उपयोग नव्हता.'

'सूर्यभान, तू अकोल्यास फोन लावून जादा स्टाफ पाठवा म्हणावं. आम्ही विचारपूस करतो याला.' असं म्हणून मी त्या इसमाला विचारलं,

'खरं ते सांगून टाक, तुझं नाव काय?'

'जानू पाटील.'

'कुठे रहातोस?'

'खामखेडा' उत्तर आलं.

'खामखेडा? कुठं आहे हे गाव?'

'जळगांव जिल्ह्यात.' असं म्हणून त्याचं लक्ष्य खाली पडलेल्या

पिशवीकडं गेलं. पिशवी उचलून पाहिली असता त्यात एक गावठी बनावटीची पिस्तोल (तमंचा) व बारा बोअर बंदुकीची चार जिवंत काडतुसं मिळून आली. त्या गावठी पिस्तुलाची बनावट अशी खुबीनं करण्यात आली होती की त्या पिस्तुलात बारा बोअर बंदूकीचे काडतूस बसत होते. पिस्तुलाच्या घोड्याच्या दाबानं काडतूस उडवण्याची व्यवस्था होती त्यात.

बाकीच्या दरोडेखोरांनी पळून जाताना आपले सामान टाकून दिले होते. सामानाकडं पाहत मी जानूला विचारलं, 'कुणाचं आहे हे सामान.'

'आमचंच आहे. गाडी यायला वेळ होता म्हणून भाकरी खात बसलो होतो. इथं कुणी पोलीस येईल असं वाटलं नव्हतं. तुमचे दोन्ही पोलीस ड्रेसमध्ये दिसल्यावर पळापळ सुरू झाली. यानं मला पक्क पकडून ठेवलं. बाकीचे पळून गेले.'

बुकींग ऑफीससमोर हे दरोडेखोर गोलाकार बसून भाकरी खात होते. भाकरीच्या चवडी मळक्या फडक्यावर पडलेल्या होत्या. त्यांच्या जवळ पिशव्या होत्या. त्या बरोबर न्यायला देखील त्यांना वेळ मिळाला नव्हता. शिट्टीचा आवाज ऐकून स्टेशन मास्टर, रेल्वे कर्मचारी जमले होते. त्यांच्यादेखत तेथे पडलेल्या पिशवीतलं सामान तपासलं, त्यात सोन्याच्या एकदाणीचे मणी, सहा बॅटऱ्या, या बॅटऱ्या जीप कंपनीच्या होत्या. त्यात प्रत्येकी तीन सेल भरलेले होते. सहा गोफणी, तीन बिचवे, भाकरी बांधलेलं गाठोडे, असा माल मिळून आला. तो जप्त करण्यात आला. रात्रभर सतत केलेल्या परिश्रमाला फळ आलं होतं. म्हणून थकवा आल्याचं काही वाटलं नाही. सुतावरून स्वर्गाला जाता येतं म्हणतात. सूत हाती लागलं होतं.

जानूच्या नजरेला नजर भिडवीत मी त्याला विचारले, 'जान्या, तुझी माहिती सांगितलीस पण या टोळीत किती दरोडेखोर होते! त्यांची माहिती द्यावी लागेल. तुम्हा सर्वांचा म्होरक्या कोण? ही

माहिती दिली नाहीस, तर त्याचा परिणाम काय होईल हे तुला माहित आहे.'

माझ्या नजरेला नजर भिडविण्याची ताकद त्याच्यात राहिली नव्हती. गोफणी, बिचवे, वॅटऱ्या, बारा वोअर बंदुकीची काडतुसे, तमंचा या वस्तु आमचे हाती लागल्या होत्या. सोन्याच्या एकदाणीचे मणीही हाती लागले होते. लपवालपवी करण्यात काही अर्थ नव्हता हे त्यानं जाणलं. त्याच्या कपाळावर घाम तरारून आला होता. अंगानं पिळदार शरीरयष्टी असलेला जानू गोगलगाय बनला होता. त्याची उंची सहा फूट तरी असावी. डोकीवर गांधी टोपी, अंगात हिरवट रंगाचा फुल शर्ट असून त्यानं जाडंभरडं धोतर नेसलेलं होतं. मी विचारलेले प्रश्न एकून तो क्षणभर विचारमग्न झाला, तो म्हणाला, 'या टोळीचा मीच म्होरक्या आहे. माझ्या टोळीतील सर्वजण भिल्ल आहेत. हे खामखेडा गावचे आहेत. आम्ही दहाजणांनी हा डाका घातला.'

'खामखेडा हे गाव कुठं आहे ?'

'जळगांव जिल्ह्यात धरणगांव पोलीस स्टेशन आहे. या पोलीस स्टेशनच्या हद्दीत हे गांव आहे. अंजनविहीरे गावाजवळ नदी लागते ही नदी ओलांडून गेलं की एका उंच टेकडीवर हे भिल्लांचे गाव लागतं. त्यांची घरं मी दाखवू शकतो.'

'तुम्ही जळगांव जिल्ह्यात राहणारे. तुलंगा गावी आले कसे ? प्रल्हाद लांडेच्याच घरावर धाड कशी घातलीत.'

'तुमचं म्हणणं बरोबर आहे. तुलंगा गावचा व खामखेड्याचा काही संबंध येत नाही. या गावची माहिती मला किंवा माझ्या टोळीला असणं शक्य नाही. ही प्रल्हाद लांडेच्या घराची माहिती सारंगानं दिली.'

'हा सारंग कोण ? त्याला प्रल्हाद लांडेची माहिती असण्याचं कारण काय ?' मी त्याला विचारलं.

'सारंगधर हा प्रल्हाद लांडेच्या शेतीवर काम करणारा मजूर आहे. पांच–सहा महिन्यांपूर्वीच प्रल्हाद लांडे यांनी त्याला कामावरून काढून टाकल्यावर तो सासुरवाडीला आला. त्याचा परिचय झाल्यावर त्याला आमच्या टोळीत सामील करून घेण्यात आले. कामावरून काढून टाकल्यामुळं त्याचा प्रल्हाद लांडेवर रोष होताच. प्रल्हाद लांडेच्या घराची माहिती त्यानं आम्हाला दिली. त्यानं असंही सांगितलं होतं की प्रल्हाद लांडेच्या घरची सांपत्तिक स्थिती चांगली आहे. निदान चाळीस–पन्नास हजाराचा ऐवज मिळून जाईल. त्यानं दिलेल्या या माहितीवरून आम्ही दरोड्याची योजना तयार करून दरोडा घातला आहे.'

'तुलंग्याला तुम्ही कोणत्या मार्गानी आलात ?' मी विचारले.

'खामगांव मार्गे आलो. खामगांवहून बाळापूरकडे जाणाऱ्या शेवटच्या एस्. टी. बसने टेंभुर्णा फाट्यावर उतरलो. त्यावेळी सायंकाळचे सहा वाजले असतील. टेंभुर्णा फाट्यापासून दहा–बारा मैलावर हे गांव आहे. सारंगधर आमच्यावरोबर होता. त्यानं मार्ग दाखवला. रात्री साडेसातच्या सुमारास डाका घातला,' डाक्याच्या वेळी गावकऱ्यांना घाबरून सोडावं म्हणून बंदुकीचे आवाज केले. या डाक्यात जे दरोडेखोर सामील होते त्यांची नावंही त्यानं सांगून टाकली. त्याला पारस येथे असलेल्या पोलीस चौकीत नेऊन त्याची जबानी घेण्यात आली.

जबानी घेत असताना मी त्याला विचारलं, 'तुझा काम धंदा काय ?'

'मी एक सधन शेतकरी आहे. घरदार, मुलंबाळं सर्व काही आहे.' हे ऐकून आश्चर्य वाटल्यानं मी त्यास प्रश्न केला, 'असं असल्यावर तुला दरोडा घालण्याची गरज कां भासली ?'

'अंगात तारुण्याची रग, शेतात भरपूर पिकत असल्यानं पैशाची कमतरता नाही. हातभट्टांची दारू झोकावी अन् त्या नशेत भिल्लांना जमा करून मस्ती करावी असं चालायचं, तशात माझा अनैतिक संबंध एका सधन मारवाड्याचे पत्नीशी आला. तिच्याकडूनही पैसे मिळू

लागले. भिल्लांच्या संगतीनं बिघडून गेलो. रात बे रात त्यांच्या संगतीत राहू लागलो. त्यांनी मला त्यांचा म्होरक्या निवडलं. कधी पोलिसांच्या हाती लागलो नाही. आपण पारस रेल्वे स्टेशनवर यायला पंधरा-वीस मिनिट वेळ लावला असता तर दादर एक्सप्रेसनं आम्ही निघून गेलो असतो. कुणालाही आमची खबर लागणं शक्य नव्हतं.'

पहाटेचा गार वारा वाहू लागला होता. रात्रभर जागरण झाल्यानं डोळ्यावर झोपेची गुंगी येऊ लागली होती. जगन्नाथ पाटलांना फोनवर मी म्हणालो होतो, 'दिवस उगवायच्या आत मी दरोडेखोरांना पकडतो.' या शब्दाची आठवण सारखी येत होती. हे शब्द म्हणजे केवळ अश्वासन नव्हतं हे मला दाखवून द्यायचं होतं. जानूला बरोबर घेऊन आम्ही ट्रकनं पारसहून वाडेगांवला आलो.

दिवस निघायला अवधी होता. वाडेगावच्या मोटार स्टॅण्डवर शांतता होती. ट्रक रस्त्याच्याकडेला उभा करून सरपंच जगन्नाथ पाटील यांना बोलावणं पाठवलं. थोड्याच वेळात जगन्नाथ पाटील व तुलंग्याचे सरपंच मेतकर ट्रकजवळ आले.

त्या दोघांना पाहून मी म्हणालो, 'दिवस उगवायचाय अजून! मी म्हटलं होतं ना की दरोडेखोर पकडून दाखवितो.'

'काय म्हणता! दरोडेखोराला पकडलंय' असं म्हणून त्यांनी ट्रकमध्ये पाहिलं. जानूच्या हातात बेड्या होत्या. कॉन्स्टेबल रणजीतनं जप्त केलेलं देशी पिस्तोल (तमंचा), काडतुसं, विचवे, गोफणी, बॅटऱ्या दाखवल्या, त्यात त्याचा उद्देश जानू हा दरोडेखोरच आहे हा पुरावा दाखवण्याचा होता. आम्ही जप्त केलेल्या वस्तू पाहून झाल्यावर जगन्नाथ पाटील म्हणाले, 'फोनवरून आपण म्हणालात ते खरं करून दाखवलं. दिवस निघायच्या आत दरोडेखोर पकडू शकाल असं वाटलं नव्हतं. आपण इतक्या आत्मविश्वासानं बोललात तरी कसे?'

'दरोडेखोर आपल्यासारखीच माणसं. दरोडा घालायच्या अगोदर तिथं येण्याचा व परत जाण्याचा मार्ग ते ठरवीत असतात. त्यांच्या मार्गा-वर जाळं टाकलं की ते त्यात अडकल्याशिवाय राहत नाहीत. आपण

मला लवकर खबर दिली नसती तर यांना पकडता आलं नसतं. पारसला जायला पंधरा–वीस मिनिटे वेळ झाला असता तर हा मिळू शकला नसता. बाकीचे नऊ दरोडेखोर पळून गेले आहेत. त्यांना शोधून काढणं तितकसं अवघड नाही.'

'कमाल केलीत साहेब ! असा दरोडा या भागात कधी पडला नव्हता. आठ–दहा तासाच्या अवधीत दरोडा हाती लागल्याचंही आठवत नाही !'

'हे सर्व श्रेय तुमचं, तुम्ही फोन करून मला कळविलं नसतं तर हा दरोडा हाती लागला नसता.'

'फोन करणं मला भागच होतं. प्रल्हाद लांडे यांच्या लक्ष्मीचा हात तुटलाय. दवाखान्यात प्लॅस्टर केलं आहे त्या हाताला. दरोडेखोरांनी गोफणीतून केलेल्या गोटमारीमुळे सहा जण गंभीर जखमी झाले आहेत. एकाचा डोळा फुटला आहे. जखमी लोकांना अकोल्याच्या दवाखान्यात पाठवलं आहे. एकच दरोडेखोर हाती लागलेला दिसतोय.'

'दरोडेखोरांचा म्होरक्याच हाती लागलाय. जानू पाटील हे त्याचं नाव. खानदेशाचा राहणारा आहे. दुसरे दरोडेखोर पकडायचेत तेव्हा मला पुढील तपास करण्यासाठी गेलं पाहिजे.' असं म्हणून मी ट्रकमध्ये बसलो. सरपंच मेतकर व जगन्नाथ पाटील यांच्या चेहऱ्यावर हास्य दिसून येत होतं. ट्रक मधून मी बाळापूर पोलीस स्टेशनला आलो. तपास कामासाठी अकोल्याहून दोन जीपा व स्टाफ मागवण्यात आला होता.

दरोडेखोरांच्या टोळीचा नायक जानू पाटलानं सांगितलेल्या माहितीवरून खामखेडा गावी जावून बाकीच्या भिल्लांना पकडायचं होतं. धरणगांव पोलीस स्टेशनच्या परिक्षेत्रात खामखेडा हे गाव येत असल्यानं प्रथम धरणगांव येथे जावून माहिती घेऊन पुढं जायचा बेत आखला. पोलीस कॉन्स्टेबल महादेव हा जळगाव जिल्ह्यातला राहणारा. त्याचं गावही खामखेडचापासून जवळ असल्यानं त्याला मी बरोबर घेतलं होतं.

धरणगाव पोलीस स्टेशनच्या आवारात आमच्या पोलीस गाड्यांनी प्रवेश केल्यानं ते पोलीस स्टेशन ढवळून निघालं. आमच्या

पोलीस गाड्यांवर अकोला पोलीस असं लिहिलं होतं. आपलं काम तसंच सोडून जो तो बाहेर आवारात शिरलेल्या गाड्यांकडं पहात होता.

धरणगावचे फौजदार लगबगीनं ऑफीसच्या बाहेर आले. मी त्यांच्यासमोर जात म्हटलं, 'मी पोलीस सब इ. भादुले, तपास कामासाठी आलो आहे.'

'ठीक आहे. या ना ऑफीसात' असे त्यांनी म्हटल्यावर मी त्यांच्या ऑफीसात गेलो.

'बोला! काय काम काढलं आहे धरणगावात?' त्यांनी विचारलं.

'धरणगावात तपासाचं काही काम नाही. आम्हाला खामखेडा गावी जायचं आहे. आमच्या भागात तुलंगा येथे दरोडा पडला होता. त्यात जानू पाटील हाती लागला आहे. त्यानं भिल्लांची नावं सांगितली आहेत. त्यांना पकडून त्यांच्या घरांच्या झडत्याही घ्यायच्या आहेत. या भिल्लांना ओळखणारे काही शिपाई बरोबर दिल्यास काम सोपं होईल.'

'काम वाटतं तेवढं सोपं नाही. मी या भिल्लांना जाणतो. खामखेडा गाव टेकडीवर वसलं आहे. गावातला पोलीस पाटील, सरपंच इतकंच काय; गावचा कोतवालही भिल्लांपैकी आहे. तुमच्या पोलीस गाड्या त्यांना लांबूनच दिसतात. जाताना प्रथम अंजन विहीरेगाव लागतं. रस्त्यावर नदी आडवी वाहत आहे. नदीच्या अलीकडेच मोटारी थांबवून जावं लागतं. पोलीस येत आहे हे दिसताच भिल्ल लोक पळून जातात. तुमच्या हाती या दरोड्यातला एकही भिल्ल सापडणं कठीण आहे. माझा स्टाफ मी देत आहे; पण त्यांच्यावर कसा छापा घालायचा ते आपण ठरवा.'

धरणगावच्या ठाणेदारानं ही माहिती दिल्यावर माझ्या उत्साहावर विरजण पडल्यासारखं झालं. आशा निराशेचा लपंडाव चालला होता. भिल्लांना पकडणं साधंसुधं काम नव्हतं. धरणगावच्या फौजदारांनी मला खामखेडा गाव कसा आहे हे सांगून टाकलं होतं. गड सर

करण्याची कामगिरी मला करायची होती. शत्रू बेसावध असताना अचानकपणे छापा घालायचा होता. एक दोन दिवसावर अमावास्या असल्यानं काळोखी रात्र होती. धरणगाव पोलीस स्टेशनचं भिल्लांविषयीचं रेकॉर्ड मी चाळून पाहिलं. खामखेड्याच्या आसपास रेताड जमीन असल्यानं, शेती करणारे भिल्ल संख्येनं कमी होते. नदीच्या काठी खुशाल हातभट्टीची दारू पिऊन चोऱ्या, दरोडे घालावेत, स्वच्छंदपणे जंगलात हिंडावं, असं त्यांचं जीवन चाललं होतं. आडवळणाचं गाव असल्यानं पोलीसवाला तिकडं फिरकत नव्हता. एकटा दुकटा पोलीस जाऊन तरी काय करणार ? एकटंचा दुकट्या पोलिसाला ते जुमानत नसत. धरणगावच्या ठाणेदाराचा निरोप घेऊन आम्ही रात्री ८ च्या सुमारास धरणगावहून निघालो. रात्री अकराचे सुमारास अंजनविहीरे गावाजवळ आमच्या गाड्या मी थांबवल्या. रात्रीचे ११ वाजले होते. आजूबाजूस काळोख दाटला होता. एक हाताच्या अंतरावरचं दिसत नव्हतं.

गाड्या वळणावर थांबविल्यानं मोटारी आल्याचं माहीत होणं शक्य नव्हतं. सगळीकडे शांतता अन् स्तब्धता पसरली होती. धरणगावच्या पोलीस हेड कॉन्स्टेबलला रस्त्याची माहिती होती. पहाटे ४ वाजता टेकडी चढून जाऊन ज्यांची नावं जानूनं सांगितली होती त्यांना ते साखरझोपेत असतानाच पकडायचं ठरवलं होतं.

पोलीस गाड्या तिथेच ठेवून आम्ही सर्वजण पायी निघालो. अंजनविहीरे गावच्या बाहेरून जात होतो. थोड्याच अंतरावर गेल्यावर नदीच्या पाण्याचा स्पष्ट आवाज येत होता. नदीच्या पात्रातील वाळूतून चालत जात असताना पाण्याचा प्रवाह लागला. पहाटेची चारची वेळ झाल्यानं थंड वारा वाहू लागला होता. टेकडीवरील झोपड्यातून दिव्याचा प्रकाश बाहेर पडत असल्यानं गाव जवळ असल्यासारखं वाटत होतं. नदीचं पात्र ओलांडून गेल्यावर टेकडीची चढण लागली. ही चढण चढून खामखेडा गावात आम्ही प्रवेश केला. जवळ टॉर्च असूनही त्याचा उपयोग करता येत नव्हता. आपसातलं बोलणं थांबलं होतं. श्वास

जोरानं चालू लागले. लक्ष्य जवळ आलं होतं. गावात प्रवेश करताच गावातली इमानी कुत्री भुंकू लागली. पहाटे चारची वेळ असल्यानं जिकडे तिकडे सामसूम दिसत होते. झोपड्यातली माणसं गाढ झोपली होती. कुत्र्यांच्या भुंकण्यानं काहींची झोप चाळवली गेली. कुत्र्यांना शिव्या हासडून पुन्हा झोप घेत पडली. अश्यात टॉर्चच्या उजेडात ज्या भिल्लांची जरूरी होती त्यांच्या घरासमोर पोलीसांना उभं करण्याचं काम चालू झालं. टॉर्चचा उजेड पाहून व कुत्र्यांच्या भुंकण्याचा गदारोळ ऐकून जागे झालेले भिल्ल पळू लागले. नऊ पैकी सहा जणांना पकडण्यात आम्ही यशस्वी झालो. तीन गुन्हेगार अंधाराचा फायदा घेऊन पळून गेले होते. सहा जणांच्या घरांच्या झडत्या घेण्यात आल्या. त्यांच्या कडून दोन हजार रुपये किंमतीचा दरोडयातला माल मिळाला.

सहा दरोडेखोरांना घेऊन आम्ही धरणगावला परत आलो. धरणगावातील लोक व पोलीस स्टेशन धरणगावचा स्टाफ आमच्या पोलीस व्हॅनभोवती दरोडेखोरांना पाहण्यास जमला. अखंड परिश्रमाचे सार्थक झाले होते. धरणगावला विश्रांती घेतली. सतत परिश्रमानं माझ्याबरोबरचे लोक थकून गेले होते. नागपूरच्या महाराज बागेत वन्य पशूंना पाहण्याकरिता लोक येत असतात, त्याप्रमाणं आमच्या पोलीस व्हॅनमधील दरोडेखोरांना पाहण्याकरिता धरणगावचे लोक येत होते. विश्रांती घेतल्यावर आम्ही धरणगावहून निघालो. जाण्यापूर्वी राहिलेल्या तीन दरोडेखोरांची माहिती धरणगाव पोलीसांना देण्यात आली.

धरणगावहून निघून बाळापूरला पोहोचलो. पकडलेल्या दरोडेखोरांना न्यायालयासमोर हजर करून रिमांड घेतला. या दरोडयात जखमी झालेले तुलंगा गावचे लोक अकोल्यास सरकारी दवाखान्यात असल्याने तेथे गेलो.

प्रल्हाद लांडे व त्यांच्या पत्नीस भेटून दरोडेखोरांना पकडल्याचे सांगितले. प्रल्हाद लांडे यांचा जबाब घ्यायचा होता. त्यांना मी विचारले, 'दरोडयाची हकीकत सांगा. आपण घरीच होता तेव्हा जे काही घडले ते वर्णन करून सांगा.'

प्रल्हाद लांडे कॉटवर पडून होते. त्यांचा हात फ्रॅक्चर झाल्यानं प्लॅस्टर लावलेलं होतं. त्यांनी गुन्ह्याची हकीकत डोळ्यात पाणी आणून सांगितली. ते म्हणाले, 'दरोडा पडला त्यावेळी सात, साडेसात वाजण्याचा सुमार होता. घरात मी जेवण करीत बसलो होतो. घराचा दरवाजा उघडाच होता. हातात काठ्या घेऊन चार–पाच जण घरात घुसलेले दिसले. त्यांची तोंडे फडक्यांनी झाकलेली होती. धोतर व शर्ट घातलेले होते. त्यांचे डोळे माझ्यावर रोखले गेले, जेवणाचं ताट बाजूला करून मी उठलो. काय होतंय हे कळण्याचे अगोदर त्यांनी मला काठ्यांनी मारण्यास सुरुवात केली. स्वयंपाकघरातून माझी पत्नी धावत आली. तिलाही मारहाण चालू झाली. 'चोर, चोर' असं मी मोठ्यानं ओरडलो. बाहेरून बंदुकीचा आवाज येत होता. त्यांच्यापैकी एकजण म्हणाला, 'चूप बैठो! चाबी लाव नहीं तो मार डालेंगे' अचानकपणे दरोडेखोरांनी घेरल्याचं लक्षात आलं. माझे व माझ्या पत्नीचे प्राण वाचवायचे होते. माझ्या कमरेला असलेली तिजोरीची चावी दिली. तरी मारहाण चालूच होती. माझ्या पत्नीलाही बेदम मारहाण करण्यात आली होती. तिनं 'चोर! चोर! वाचवा' असा टाहो फोडला होता. गाव सारं जागं होतं. आमचा आवाज ऐकून गावातली मंडळी जमू लागली; पण घराबाहेर असलेल्या दरोडेखोरांनी त्यांना गोफणीच्या गुंड्यांनी व बंदुकीच्या गोळ्यांनी जायबंदी केलं. मला मार बसत आहे हे पाहून पत्नी माझ्या अंगावर ओणवी झाली, 'मारू नका हो! जे काही असेल ते घ्या' असं ती म्हणत होती. तिच्या हाताचे हाड काठीच्या तडाख्यामुळं मोडलं. बंदुकीचे बार चालू होते, तरी गावातली माणसं भ्याली नाहीत. त्यांनीही दगडफेक चालू केली. तेव्हा मात्र दरोडेखोरांचे धाबे दणाणले हाती मिळेल ते त्यांनी घेतले. गावातल्या माणसांनी दगडफेक चालू केल्यानं ते अंधाराचा फायदा घेऊन पळून गेले.'

'त्यांना पकडण्यात आलं आहे. तुमची एकदाणी व रोकड मिळाली आहे' मी त्यांना सांगितलं. तेव्हा ते म्हणाले, 'आपण दरोडेखोरांना पकडल्याचं मला समजलं आहे. आमच्या गावात असा दरोडा पडला नव्हता. आपले कृत्य धन्यवादास पात्र आहे. दवाखान्यातून बाहेर पडलो

की त्या दरोडेखोरांना पाहून घेण्याची इच्छा पुरी करतो.' दरोडयाची हकीकत सांगताना त्यांचे डोळे आसवांनी डबडबून गेले होते. त्यांची जबानी घेऊन मी तेथून निघालो.

झालेल्या घटनेचे दुवे जोडण्यात आले. पकडलेल्या गुन्हेगारां-विरुद्ध दोषारोपपत्र दाखल करण्यात आले. त्यात त्यांना शिक्षाही झाल्या. ही घटना सन १९७१ मध्ये घडलेली आहे.

पोलिसांचे आभार मानण्यास तुलंग्याची जनता विसरली नाही. त्यांनी मला तुलंगा गावी बोलावून घेतलं. ग्रामपंचायतीसमोर गावकरी जमले होते. त्यांनी धन्यवाद दिले. दरोडयाची खबर मिळताच व्यूह-रचना केल्यानं तसंच वेळ न गमावता पाठलाग केल्यानं, हा गुन्हा उघड-कीस आला. प्रल्हाद लांडे व त्यांच्या पत्नी, या दोघांनी दवाखान्यातून परत आल्यावर माझी भेट घेऊन कृतज्ञता व्यक्त केली.

दरोडेखोर पकडले गेले ते सर्वांच्या सहकार्यामुळे. चान्नी पोलीस स्टेशनच्या परिक्षेत्रात येणाऱ्या तुलंगा गावच्या नागरिकांनी चान्नी पोलीस स्टेशनला न जाता वाडेगावला येऊन सरपंच जगन्नाथ पाटील यांच्याशी संपर्क साधला. सरपंच जगन्नाथ पाटलाने वेळ न गमावता टेलीफोनवरून मला ही खबर दिली. चान्नी येथे जाण्याच्या फंदात ते पडले असते तर दरोडेखोर निघून गेले असते. बाळापुरच्या विजयकुमार शाहा यांनी दोन ट्रक पोलीस स्टेशनमध्ये पाठवून दिले. मला खबर मिळाल्यावर जाळं फेकण्याचं काम मी केलं. दोन्ही ट्रक मिळाले नसते तर जाळं फेकणं शक्य तरी झालं असतं का? कॉ. रणजीत यानं दरोडे-खोरांचा म्होरक्या 'जानू' याला पकडण्यात दाखविलेले शौर्य वाखाण-ण्याजोगं आहे. त्यानं दाखवलेल्या अजोड धैर्यामुळेच जाळ्यात मासा अडकला. या दरोडयाच्या तपासात लहानमोठ्या सर्वच कर्मचाऱ्यांनी सहकार्य दिलं. भिल्लांची वस्ती असलेल्या आणि दुर्गम टेकडीवर वस-लेल्या खामखेडा गावात छापे मारून सहा दरोडेखोरांना पकडण्यात जी कुशलता स्टाफनं दाखवली त्याला तोड नाही. हे 'खामखेडा ऑपरेशन' आठवलं की त्या दिवशीची पहाट ध्यानी येते. आम्ही आल्याची चाहूल

लागण्याअगोदरच हे दरोडेखोर पकडले गेले होते. आम्ही आल्याचा सुगावा लागला असता तर त्यापैकी एकही हाती लागला नसता. या सर्वांचा मी सदैव ऋणी आहे.

दरोडेखोर हे आपल्यासारखीच माणसं असतात. सर्वांनी त्यांच्याशी सामना देण्याचं धैर्य दाखविलं तर हे दरोडेखोर पकडले जातात.



आठ

# जैतुनबीचे कारस्थान

सन १९६१ साली सांगली जिल्ह्यांतील बबलादी या गावी खून झाल्याची घटना माझ्या मनांच्या खोल कप्प्यात कुठेतरी घर करून अद्या-पही रेंगाळत राहिली. तब्बल सोळा वर्षानंतरही या घटनेचे विस्मरण तर दूरच राहो परंतु त्याची स्मृती ताजी राहिली अन् त्याला कारणही तसेच होते ! मनाचा समतोल राखून या गंभीर घटनेच्या संबंधात मीं सारासार विचार केला नसता तर या खुनाच्या प्रकरणावर कदाचित कायमचा पडदा पडला असता. या खुनाच्या प्रकरणात मृतकास नैसर्गिक-रीत्या मरण आले असल्याचे भासविण्यात आल्याने, तसेच मृतकाची पत्नी, मुले, नातेवाईक यांना त्याचे मरणात काही संशय दिसून न आल्याने, या प्रकरणावर कायमचा पडदा पडून हत्या करणारे उजळ माथ्याने वावरले असते.

खुनाचा प्रकार म्हटला की आपल्या मनःचक्षुसमोर ठिकठिकाणी जखमा असलेली, रक्ताचे थारोळ्यांत पडलेली लाश, त्या लाशेवरील रक्ताने माखलेले कपडे, घटनास्थळावर आसपास कुठेतरी रक्ताने बर-बटलेला सुरा पडलेला, पिंजारलेल्या केसांचा व डोळयात लाली असलेला मारेकरी, भयभीत चेहरा झालेले प्रेताचे संबंधित नातेवाईक, सायरन वाजवीत पोलिसांच्या आलेल्या मोटार गाड्या, त्या जाळीदार मोटार गाडयातून उतरणारे पोलीस, हातात बेड्या घातलेला गुन्हेगार, अशी चित्रे तरळतात. या केसच्या बाबतीत मात्र सामान्यतः मनःचक्षुसमोर जशी

चित्रे तरळतात, त्या प्रमाणे काहीही घडलेले नव्हते. प्रेताच्या अंगावर जखमा तर नव्हत्याच, पण साध्या खरचटण्याच्या खुणा देखील नव्हत्या.

विषप्रयोगाचा प्रकार म्हणावा तर तसेही काही दिसून आले नव्हते. विष पोटात गेल्यावर ज्याला विष दिले गेले असते, तो तडफड करतो. त्याच्या तडफडीमुळे घटनास्थळावर असणारे सामान अस्ताव्यस्त होते. ज्याचेवर विषप्रयोग केला गेला असेल तो ओकाऱ्याही करतो, परंतु या घटनेच्या बाबतीत तशी काही चिन्हे घटनास्थळावर नव्हती. प्रेताचे गळयावर अथवा नाजूक भागावर कोठेही जखमा अगर वण उमटलेले नव्हते. या आगळया वैशिष्टयामुळे ही खुनाची केस मनात खोलवर कुठेतरी रेंगाळत राहिली.

•

जत तालुक्यांतील उमदी या पाच सहा हजार लोकसंख्या असलेल्या गावी, नाशिकचा कोर्स संपल्यावर पहिल्यांदाच फौजदार म्हणून नेमणूक झालेली होती. म्हैसूरराज्यातील विजापूर जिल्ह्याच्या सरहद्दीवर हे पोलीस स्टेशन असल्यामुळे त्याला महत्त्व आलेले होते. कानडी भाषा बोलणारांची संख्या बरीच असल्याने, अनेकदा माझी पंचाईत व्हायची. उमदी ठाण्याच्या हद्दीत असणाऱ्या पन्नास-साठ गावामध्ये माडग्याळ, संक, जाडू बवलादी अशी कानडी भाषेतील नावे असलेल्या गावांचा भरणा होता. कामचलाऊ कानडी भाषा मी थोडयाच दिवसात अवगत केली होती. कुणी माझ्याकडे भेटावयास आले की आपुलकी निर्माण व्हावी म्हणून मी म्हणत असे "गौडरु बर्री ! कुंड्री, एन ऐतु" (या पाटील, बसा, काय खबरवात) थोडक्यात सांगायचं म्हणजे सुरुवातच मुळी कानडी भाषेतून व्हायची ! खरं म्हणजे अंगात फौजदारी रुजली नसल्यानं, ठाण्यात रिपोर्ट देण्यासाठी कोणी आला की मी काहीसा बिचकून जात असे. हाताखालचा स्टाफ नवीन फौजदार कसा काम करतो ते लक्ष्य देऊन पाहत असे. वरकरणी मात्र बिचकून गेल्याचे चेहेऱ्यावर कधी दिसू दिले नाही. दिवसेंदिवस बिचकण्याचे प्रमाण कमी कमी होत गेले.

एके दिवशी सकाळी नऊ वाजता मी व पोलीस हेड् कॉन्स्टेबल झेंडे पोलीस स्टेशनमध्ये टपाल पाहण्यात गुंतलो असताना ववलादी गावचा मलकाप्पा कोतवाल. आला कोतवाल ठाण्यात आला की मी विचकून जात असे कारण हे लोक हमखास काहीतरी रिपोर्ट घेऊनच येतात हे माहीत होते. तो ऑफिसात येताच मी विचारले, "एनरी मल्लापा, एक आग्याद" (कायहो मल्लापा, काय झाले आहे). मल्लापास मराठी बोलता येत असूनदेखील, त्याची मातृभाषा कानडी आहे म्हणून मी कानडी भाषेतून सुरुवात केली होती. मल्लापास माहीत होते की मला एकदम काम चलावू कानडी येते. माझ्याशी कानडी बोलण्याच्या फंदात न पडता तो चक्क मराठीत म्हणाला, "पोलीस पाटलानं दिलेला रिपोर्ट घेऊन आलोय. रामलींग आप्पा तेली याच्या पोटात एकाएकी दुखून तो मरण पावलाय."

"आण रिपोर्ट इकडे" असे म्हणून त्याचे हातातून मी रिपोर्ट घेतला व वाचू लागलो. त्यातला मजकूर असा होता—

"रामलींग आप्पा तेली याचे पोटात एकाएकी दुखून तो मरण पावला आहे. त्याचे नातेवाईकांना मरणाबाबत काही संशय नसून ते पुढील क्रियाकर्माकरिता प्रेत घेऊन जाण्याची परवानगी मागत आहेत. प्रेताच्या अंगावर मारहाणीच्या निशाण्या नाहीत. तरी पुढील कारवाई व्हावी." रिपोर्ट वाचून झाल्यावर मल्लापा कोतवालास मी विचारले, "तू स्वत: रामलींग आप्पाचे प्रेत पाहिले आहेस काय? प्रेताच्या अंगावर मारहाणीच्या निशाण्या वगैरे काही तुझ्या नजरेस आल्या काय?"

"रामलींग आप्पाचे प्रेत मी पाहिले आहे. त्यांच्या अंगावर काही जखमा दिसून आल्या नाहीत. त्याचे मरणाचे बाबतीत कोणी काही संशय व्यक्त केलेला नाही." मल्लापा म्हणाला, मी सुटकेचा नि:श्वास टाकला. खुनाची भानगड दिसत नाही असे वाटले.

माझेजवळ पोलीस हेड कॉ. झेंडे हे उभे होते. ते म्हणाले, "साहेब, या प्रकरणात काही गुंतागुंत दिसत नाही. आपण हुकूम दिलात तर मी

बबलादी गावी जा न रामलींगआप्पा यांचे मरणाचे कारणांचा तपास करून येतो. अकस्मातरीत्या तो मरण पावल्याची नोंद घेऊन रवाना होतो." मी काहीच न बोलता विचारमग्न झालो.

या केसमध्ये काही झंझट दिसत नाही, तेव्हा हवालदार झेंडे यांना बबलादीस पाठवावे या विचारात असताना दुसरा विचार मनात चमकून गेला की रामलींगआप्पा यांना पोटदुखीच्या आजाराने नैसर्गिकरीत्या मरण आले असे रिपोर्टात आहे मृत्यू नैसर्गिकरीत्या आला असेल तर पोलीस स्टेशनला रिपोर्ट पाठविण्यात अर्थ नव्हता व तशी गरजही नव्हती. प्रेताची विल्हेवाट लावण्यासाठी पोलीसांची परवानगी मागितली गेली आहे, तेव्हा या प्रकरणात काही तरी काळेबेरे आहे अशी शंका मनात डोकावू लागली. हा विचार चमकून जाताच मी हेड कॉन्स्टेबल झेंडे यास बबलादीस पाठविण्याचा विचार झटकून टाकला. हे प्रकरण स्वत: तपासास घ्यावयाचे ठरविले. अकस्मात मयताची नोंद करून निघालो.

उमदी ते बबलाद हे अंतर अंदाजे दहा किलोमिटरचे असावे. मी बरोबर हवालदार झेंडे व दोन शिपाई घेऊन सायकलीवरून बबलादी या गावी आलो. नेहमीप्रमाणे प्रथम ग्रामपंचायत ऑफीससमोर गेलो.

बबलादी गावचे पोलीस पाटील कासमभाईंनी चेहेऱ्यावर उसने हास्य आणून आमचे स्वागत केले. कासममियाँ याला पाहताच माझं तितकंसं चांगलं मत झालं नाही. त्याचा बांधा सडपातळ, वर्ण काळा, नाक सरळ, खूनशी डोळे असा तो होता. पाच फुटाचे आसपास उंची, डोकीवर पांढरा रुमाल, अंगात हिरवट मळकट हाफशर्ट व धोतर नेसलेला पोलीस पाटील, तोलून मापून बोलणारा होता. त्याच्या अंतरंगात काय चालले आहे हे चेहेऱ्यावरून अगर त्याच्या बोलण्यावरून ओळखता येत नव्हते. मी फौजफाटा बरोबर घेऊन आल्याचे त्याला तितकेसे रुचलेले दिसले नाही.

"साहेब, आपण तकलीफ घेण्यासारखे काही नव्हते. झेंडे हवाल-

न्दार यांना पाठविले असते तरी चालण्यासारखे होते. रामलींगआप्पाचे प्रेत पाहून खात्री करा. त्याचे प्रेत त्याचे रहाते घरात पडलेले आहे. त्याचे प्रेत ताब्यात द्या म्हणून त्याचे नातेवाईक गडबड करू लागले आहेत," कासमभाई म्हणाले.

" रामलींगआप्पाच्या पोटात दुखून मरण पावला, त्याच्या मरणाचे बाबतीत संशय नाही म्हणता मग पोलीसठाण्यात रिपोर्ट पाठविण्याची काय गरज होती?" मी विचारले. माझ्या प्रश्नामुळे तो चपापून गेला पण स्वत:ला सावरीत तो म्हणाला, "वबलादी गावचे लोक पुढे काहीं दिवसांनी माझेवर काही आरोप करू नये म्हणून मी रिपोर्ट पाठवून मोकळा झालो." असा त्यांनी खुलासा केला.

ग्रामपंचायत ऑफिसात सामानसुमान ठेवून मी, पो. पाटलास घेऊन रामलींगअप्पा याचे घरी गेलो. घरासमोर दहा-बारा लोकं प्रेत-यात्रेच्या तयारीत दिसले. आम्हा पोलिसांना पाहाताच त्यांना नाराजी वाटली असावी. तसे त्यांचे चेहरेच सांगत होते. मी घरात गेलो, तेव्हा एका पलंगावर रामलींगआप्पा यांचे प्रेत दिसले. अगदी झोपी गेलेल्या माणसासारखे ! घरात भरपूर प्रकाश येत नव्हता म्हणून लाश घरातील अंगणात आणली. प्रेताचा पंचनामा सुरू केला. प्रेताच्या पहाणीत डोक्या-वर, गळयावर, छातीवर, पोटावर, पायावर जखमांचे वळ तर दूरच राहो परंतु साध्या खरचटण्याच्यादेखील खुणा दिसून आल्या नाहीत. प्रेताच्या अंगावरील कपडे काढून सर्व भाग बारकाईने निरीक्षण करून पाहिला. प्रेत उलटेसुलटे करूनही पाहिले परंतु कोठेही मारहाणीच्या निशाण्या दिसल्या नाहीत.

प्रेताच्या जवळपास त्याची पत्नी, मुले, जी वयानं चोवीस पंचवीस वर्षांची होती ती. इतर नातेवाईक यांना मी "रामलींगआप्पास मरण कशामुळे आले ?" हे विचारले असता त्यांनी "पोट दुखू लागले व त्यातच त्यांचा अंत झाला. कोणाशी काही वाकडे नव्हते. कोणावर संशय नाही" असे उत्तर देऊन त्यांनी प्रेत ताब्यात द्यावे म्हणून विनंती केली.

पोलीस पाटील तेथेच उभे होते. ते म्हणाले, " रामलींगआप्पा एक प्रतिष्ठित नागरिक असून त्याचे प्रेताची चीरफाड होऊ नये अशी सर्वांची इच्छा आहे, अंगावर तर माराचे वण नाहीत, तरी प्रेत त्यांच्या ताब्यात द्यावे." पोलीस पाटलानं उगाच फोडणी दिल्याचे मला पसंत पडलं नाही. मी मनात ठामपणे निर्णय घेतला की तपासकाम पूर्ण झाल्याखेरीज प्रेत ताब्यात द्यावयाचे नाही. "प्रेत तपास पूर्ण झाल्याखेरीज ताब्यात मिळणार नाही. रामलींगआप्पास मरण कसे आले हे डॉक्टरच सांगू शकतील, म्हणून पोस्ट मॉर्टेमकरिता ही लाश पाठवीत आहे." असे मी बजावून सांगितले. कासमभाईचा चेहेरा पडलेला दिसला. प्रेताचा पंचनामा करून मी ते प्रेत जत या तालुक्याचे गावी पोष्ट मॉर्टेमकरिता पोलीस कॉन्स्टेबल बरोबर देऊन पाठविले.

प्रेत रवाना केले तरी हे प्रकरण नैसर्गिक मृत्यूचे आहे की खुना-सारख्या गंभीर अपराधाचे आहे, याचे गूढ कायमच होते.

विषप्रयोगाचा प्रकार तर नाही ना ! कशाला मनात शंका ठेवावी या उद्देशाने मी रामलींगआप्पाचे घराची बारकाईने पहाणी केली. या पहाणीत विषारी औषधाची अगर कीटकनाशकाच्या बाटल्या घरात मिळाल्या नाहीत. घरात कोठेही मृतकाने धडपड केल्याच्या, ओकारी केल्याच्या खाणाखुणा दिसून आल्या नाहीत.

तेव्हा वाटू लागले उगाच तंगड्या तोडत बबलादीला आलो.

डॉक्टरच्या रिपोर्टावर सर्व अवलंबून होते. रामलींगआप्पाच्या मृत्यूच्या कारणाचे गूढ उकलले गेल्याखेरीज पुढील तपासाचे पाऊल उचलता येत नव्हते. तर्कवितर्कांचे अनेक तरंग मनात उठून विरून जात होते.

ग्रामपंचायत ऑफिसात येऊन मुक्काम केला. रात्र झाली तरी डोळ्यावर झोपेची झापडदेखील येत नव्हती. डोळे मिटण्याचा प्रयत्न केला की रामलींगआप्पाची पलंगावर चिरनिद्रा घेत पडलेली लाश डोळ्यासमोर तरळू लागे. शेतीवाडी, घरदार, मुलेबाळे असलेला सुखवस्तु आप्पाजी एकाएकी जगाचा निरोप घेऊन जावा हे पटण्यासारखे

नव्हते. वयाने पन्नाशी ओलांडलेल्या या इसमाचा कोणी शत्रू असल्याची माहिती मिळाली नव्हती.

थ्री डब्ल्यूज्पैकी शेवटच्या दोन डब्ल्यूज्मध्ये काही तथ्य दिसून येत नव्हते. सुरुवातीचा डब्ल्यू (वूमन) बाईचे प्रकरण उरले होते. आप्पाजींचे वय लक्षात घेता त्यातही फारसे स्वारस्य नसावे. मृत्यू नैसर्गिकच असावा असे विचार करीत असतानाच, केव्हा झोप लागली हे समजलेदेखील नाही.

दुसरा दिवस उजाडला तसा मी बेचैन झालो. प्रेतासोबत गेलेल्या पोलीस कॉन्स्टेबलला मी बजावून सांगितले होते की प्रेताचे पोस्टमॉर्टेम होताच, डॉक्टरकडून पोस्टमॉर्टेम नोटस् घेऊन बबलादीस निघून ये. मेडिकल ऑफीसरचे मत मिळाल्याखेरीज तपासाची थंडावलेली चक्रे पुन्हा फिरू शकत नाहीत. त्याने मला लवकर परत येतो असे आश्वासन दिले होते.

दुपारी दोन वाजता पोलीस कॉन्स्टेबल एस्. टी. ने बबलादीस पोस्टमॉर्टेम नोटस् घेऊन आला. नोटस् पाहण्यास मी अधीर होऊन गेलो होतो. तो येताच त्याने मला नोटस् दिल्या, त्यात खालीलप्रमाणे मेडिकल ऑफीसर, जत यांनी आपले, रामलींगआप्पा तेली यांचे मरणाचे कारण व्यक्त करणारे मत दिलेले होते–

" The death of Ramlingappa has been caused by suffocation, legatuse marks were not present. Some soft sabstance might have been used to press mouth or throat to cause suffocation of the deceased." (रामलींगआप्पाचा मृत्यू गुदमरल्यामुळे झाला आहे. मयताच्या गळ्याभोवती गळा दाबण्याच्या खुणा नव्हत्या. मृतक गुदमरून जावा म्हणून त्याचे गळ्यावर अथवा तोंडावर मऊ पदार्थ ठेवून दाबला असावा)

पोस्ट मॉर्टेम नोटस्मध्ये मयताचे अंगावर मारहाणीच्या काही निशाण्या नव्हत्या असेही नमूद केलेले होते.

जत येथील मेडिकल ऑफीसरच्या अहवालावरून मृत्यूच्या कारणाचे गूढ उकलले गेले होते. गुन्हेगारांनी आपण पकडले जाऊ नये, काही पुरावा मिळू नये अशी खबरदारी घेऊन चतुराईने हा अपराध केला होता. रामलींगआप्पा पोटदुखीच्या आजाराने मेल्याचे नाटकही रचण्यात आले होते.

पोस्ट मॉर्टेम नोटस्च्या आधाराने, मी या रहस्यमय खुनाची नोंद रेकॉर्डला घेऊन मी स्वत: तपास घेतला.

खुनाच्या गुन्ह्याची नोंद होताच, तपासाची चक्रे जोराने फिरू लागली. तपासाची सुरुवात मल्लापा कोतवालाने दिलेल्या खबरीपासून सुरू केली. डॉक्टरच्या अहवालामुळे रामलींगअप्पास कशाने मरण आले हे समजले. आता खून करणारे गुन्हेगार कोण व त्यांनी कोणत्या कारणास्तव खून केला? अशा दोन प्रमुख समस्या मला सोडवायच्या होत्या.

मल्लापा कोतवालाने आणलेल्या खबरीत रामलींग आप्पा पोटदुखीने मरण पावला असे होते. या पोटदुखीवर गावातील डॉक्टरानी इलाज केल्याचे दिसून आले नाही. मयताचा मोठा मुलगा वयाने पंचवीस वर्षांचा असावा. त्यास मी बोलावून घेऊन विचारले. "रामलींगआप्पा यांचे पोटात दुखण्यास केव्हा सुरुवात झाली? पोट दुखू लागल्यावर डॉक्टरला इलाज करण्यासाठी बोलावले होते का?"

मयताचा मुलगा बसाप्पा हा या प्रश्नांच्या भडिमाराने गडबडून गेला. खरी हकीकत सांगणे भागच आहे हे ओळखून तो म्हणाला, "साहेब, घटनेच्या दिवशी मी व माझा भाऊ कल्लाप्पा सायंकाळी सहा वाजता शेतावरून परत आलो. वडील रामलींगअप्पा घरी हजर नव्हते. शेतातील काबाडकष्टामुळे थकून भागून गेलो होतो. जेवणखावण करून अंथरुणावर अंग टाकताच झोप लागली. रात्री दोन वाजण्याचा सुमार असेल. दारावर कोणीतरी थाप दिल्याचे ऐकू आले. मी खडबडून जागा झालो व दरवाजा उघडला. तेव्हा कासमभाई पाटलाची रिस्तेदार जैतुनबी हिचे चारही जावई आप्पाजींना एका बाजेवर टाकून घेऊन आले होते. दरवाजा उघडताच त्यांनी बाज आत आणली. हा काय प्रकार आहे हे

मी त्यांना विचारले असता ते म्हणाले, 'आप्पाजी, रातको जैतुनबी के तरफ आये थे। उनके पेट में दर्द उठा। दर्द के मारे हातपांव झाड रहे थे। उनका हात पाव हिलाना भी बंद हो गया, तब हम सबने उनको खटिया पर डालकर यहाँ लाया। जैतुनबी के घरपर रखते, तो सारे गांव में तुम सबकी बेइज्जती होती,' असे म्हणून निघून गेले. मी वडिलांचे अंगास हात लावून पाहिला. शरीर थंडे पडून गेले होते. त्यांची प्राणज्योत मालवलेली होती. मी घरातील सर्वांना ते पोटदुखीने मरण पावल्याचे सांगितले कारण ते जैतुनबीच्या घरी गेले होते हे मला गुपित ठेवायचे होते. मी माझा भाऊ कल्लप्पा यालाही सर्व प्रकार समजावून सांगितला.

"सकाळी गावातील लोकांना माहीत पडले की आप्पाजी पोटदुखीच्या आजाराने मरण पावले. मूठमाती देण्याची तयारी झाली परंतु सरपंचानी पोलीस पाटलास बोलावून रिपोर्ट पोलीस स्टेशनला पाठविण्यास सांगितले.

"जैतुनबीचे घरी रात्रीचे वेळी वडील जात असत. त्या दोघांचा अनैतिक संबंध होता हे माहीत असूनही आम्ही लोक लज्जेकरिता कोणास सांगत नव्हतो. जैतुनबीच्या जावयाला हे पसंत नव्हते म्हणून त्यांनीच खून केला आहे.'

अशी हकीकत बसाप्पाने सांगितल्यावरून या प्रकरणात कोण गुन्हेगार आहेत हे माहीत पडले. खून रात्रीच्या वेळी जैतुनबीच्या घरात झाला असल्यामुळे प्रत्यक्ष पुराव्याचा अभाव होता. केवळ गुन्हेगारांची नावे माहीत पडून उपयोग नसतो. त्यांनीच हा गुन्हा केला आहे हे पुराव्यानिशी सिद्ध करावे लागते.

जैतुनबीच्या घराकडे मी मोर्चा वळविला. घरात अचानकपणे पोलीस आलेले पाहून तिचा चेहरा काळवंडला. पंचावन्न वर्षे वय असलेल्या या बाईचे निम्म्याहून अधिक केस पांढरे झालेले होते. तिच्याकडे पाहिले असता आकर्षण वाटण्यासारखे काही नव्हते. ही काटकुळी अंगावर

मळकट कपडे घातलेली विधवा बाई, या वयात आप्पाजीवर भुरळ घालू शकली, याचेच मला राहून राहून आश्चर्य वाटत होते.

तिला तिच्या घरीच अटक केली व ग्रामपंचायत ऑफिसात आणले. विचारपूस करताना ती दाद देत नव्हती. " मला काही माहीत नाही " हे तिचे उत्तर ठरलेले होते.

बोलून चालून ती बाईमाणूस! कोणत्या वेळी काय आरोप करील हे सांगता येत नाही. तिच्या तोंडून मला खरी हकीकत वदवून घ्यावयाची होती. सक्तीने विचारपूस करणे म्हणजे धोका पत्करणे होते. पोलिसांनी बलात्कार करण्याचा प्रयत्न केला, अब्रू घेतली असे नाना आरोप या कजाग व धूर्त बाईने केले असते. तपास तर दूर राहो पण माझे विरुद्ध चौकशीचे वारंट उभे राहिले असते.

मन:स्थिती गोंधळल्यासारखी झाली. परंतु मला अडचणीवर मात करावयाची होती. आता मी निराळाच पवित्रा घेतला. तिच्या चारही जावयांना, ज्यांची नावे स्मरणात नाहीत, त्यांना अटक करून हातात बेड्या घालून, हे तिला दिसतील असे जरा दूर अंतरावर उभे ठेवले.

नंतर मी जैतुनबीजवळ जाऊन म्हणालो, " हमें सब कुछ मालूम हो गया हैं । तुम्हारे चारों दामादों ने असलीयत तो बताही दी । अब तुमही क्यों छुपाना चाहती हो । उनकी तरफ देखो, पोलीस के हिरासत में सब कुछ उगल दिया हैं । "

पोलीसांनी बेड्या घालून आपल्या चारही जावयांना अटक केल्याचे तिने पाहिल्यावर, तिचे धैर्य खचून गेले. प्रश्नांच्या भडिमारापुढे ती टिकाव धरू शकली नाही.

जैतुनबीने हकीगत सांगण्यास सुरवात केली. ती म्हणाली, " मी पाच वर्षांपूर्वीच विधवा झाले. चारही मुलींची लग्ने बबलादी येथे होऊन याच गावात जावई राहतात. विधवा झाल्यावर घरात मी एकटीच असे. थोडीफार शेती आप्पाजींचे शेतीस लागून आहे. रामलींग आप्पाचा

परिचय वाढत जाऊन ते रात्री-बेरात्री मला भेटावयास येत. ही बाब जास्त दिवस गुपित राहू शकली नाही. माझ्या चारही जावयांना व मुलींना आप्पाजी घरी येतात हे पसंत नव्हते. आप्पाजीबरोबर असलेला अनैतिक संबंधापासून परावृत्त करण्याचा त्यांनी प्रयत्न केला पण त्यात त्यांना अपयश आले.

"घटनेच्या दिवशी रात्री दहा वाजण्याचा सुमार होता. बबलादी खेडेगांव असल्याने सगळीकडे शांत वातावरण होते. रामलींग अप्पा घरी आले. माझ्या चारही जावयांनी त्यांचेवर पाळत ठेवली असावी. येताना आप्पाजी माझेकरिता नवीन पातळ घेऊन आले होते, हे पाहून माझ्या आनंदाला पारावार राहिला नाही. हा आनंद फार काळ टिकणारा नव्हता याची कल्पनाही नव्हती. रामलींग आप्पा खुशीत आले होते. त्यांना काय माहीत होते की प्रत्यक्ष मृत्यू त्यांची प्रतीक्षा करतो आहे ?

"कोणीतरी दरवाजा उघडण्याचा प्रयत्न केला म्हणून मी 'कौन है !' असे विचारले. बाहेरून उत्तर आले 'मैं मेहमूदअल्ली हूं। दरवाजा खोलो तुम्हारी बेटी सक्त बीमार पड़ी है।"

"माझा जावई मेहमूदअल्ली बाहेर उभा होता. माझी मुलगी आजारी असल्याचे सांगितल्यामुळे मी रामलींगआप्पांना पलंगाखाली लपण्यास सांगून दरवाजा उघडला. दरवाजा उघडताच 'आप्पाजी कहां है ?' असे म्हणत माझे चारही जावई घरात घुसले. पलंगाखाली लपलेल्या आप्पाजींना त्यांनी बाहेर ओढले. त्यांच्या अंगाला कापरे भरले होते, अंगाला दरदरून घाम सुटला होता. त्यांना बाहेर ओढताच 'मेलो, मेलो, धावा ! धावा !' असे तो मोठ्याने ओरडताच त्यांना खाली पाडून पलंगावरील उशी घेऊन त्यांचे तोंडावर ठेवून दाबण्यात आली. मी सोडवण्यास गेले असता महमूदने लाथ मारल्याने बाजूला जाऊन पडले. आप्पाजींचे पायावर, छातीवर ते बसले, त्यामुळे त्यांना काही हालचाल करता आली नाही. त्यांचे धडपडणे हळूहळू बंद पडले. अन् त्यांच्या प्राणाचा पोपट फडफड करीत उडून गेला. धडपड बंद

पडल्यावर ते चौघेही उठले. प्रेताची विल्हेवाट कशी लावावी ही समस्या 'आ' वासून त्यांचेपुढे उभा होती. आप्पाजींचा खून झाल्याचे पाहून मी घाबरून गेले. चारही जावई फासावर लटकणार होते म्हणून मी त्यांना सूचना दिली की बाजेवर प्रेत ठेवून आप्पाजींच्या घरी न्या. प्रेतावर जखमा नाहीत. पोटदुखीने मेला असे सांगा. त्यांच्या इज्जतीला बट्टा लागेल म्हणून घरातले लोक तो माझ्याघरी गेला होता हे कोणास सांगणार नाहीत.

"माझ्या सूचनेप्रमाणे रामलींग आप्पाचे प्रेत बाजेवर ठेवून रात्री दोन वाजता ते चौघे जण घेऊन गेले.

"माझ्या जावयांना वाचविण्याकरिता टाकलेला डाव यशस्वी झाला पण आपण तो डाव उधळून टाकला आहे." अशी हकीकत जैतुनबीने सांगितली.

पुराव्याच्या दृष्टीने जैतुनबीची जबानी कुचकामी होती. जैतुनबी व तिच्या चार जावयांनी रामलींगआप्पा यांचा खून केला होता हे सत्य असले तरी त्यांना पुराव्यासह न्यायालयासमोर हजर करून शिक्षा करविणे जिकीरीचे काम बाकी राहिले होते. प्रत्यक्ष पुरावा नसल्यामुळे या पाचही आरोपींची खुनासारख्या गुन्ह्याशी सांगड घालणे अगत्याचे होते.

जैतुनबीच्या घराचे आसपास राहणाऱ्या लोकांपैकी एकाने सांगितले की, "रात्री ११ चे सुमारास घरातील सर्वजण झोपले होते. मी झोपण्याचे तयारीत असताना 'मेलो! मेलो! धावा, धावा!' असा आवाज जैतुनबीचे घरातून दोन वेळा आला. त्यानंतर आवाज येणे बंद झाल्याने, तो काय प्रकार आहे हे मी पाहण्यास गेलो नाही."

या हत्याकांडाचे तपासात जो अप्रत्यक्ष पुरावा गोळा करता आला त्यावरून खालील मुद्दे मी सिद्ध करू शकतो—

(१) खून झाला त्या रात्री जैतुनबीच्या घरी रामलींग आप्पा गेले होते. रात्री दहा–साडेदहा वाजण्याचे सुमारास पानपट्टीचे दुकान

बंद करून चाललेल्या पानठेलेवाल्याने रामलींगआप्पास जैतुनबीच्या घरात जाताना पाहिले होते.

(२) जैतुनबीच्या घरातून रात्री ११ च्या सुसारास ' मेलो, मेलो, धावा, धावा ' असा आवाज आला होता.

(३) जैतुनबीचे चारही जावई रामलींग आप्पांना बाजेवर घालून रात्री दोनच्या सुमारास आप्पाचे घरी आले होते.

(४) रामलींग आप्पास घरी आणले त्यावेळी त्यांची हालचाल बंद होती व ते मयत झालेले होते.

(५) रामलींग आप्पाचा व जैतुनबीचा अनैतिक संबंध होता व हे तिच्या जावयांना पसंत नव्हते.

(६) ज्या घरात खून झाला ते घर जैतुनबीच्या मालकीचे होते आणि अपराध घडला त्या दिवशी सायं. ६ वाजता ती शेतावरून घरी परत आली होती.

तपासाचे काम पूर्ण झाल्यावर या पाचही गुन्हेगारांविरुद्ध मी, दोषारोपपत्र दाखल केले. केवळ परिस्थितीजन्य पुराव्यावर केस आधारित होती.

सांगली येथील सेशन्स कोर्टात ही केस चालली. सेशन्स कोर्टाने जैतुनबी व तिच्या चारही जावयांना जन्मठेपेची शिक्षा दिली.

या केसची स्मृती अशाकरिता मनात रेंगाळत राहिली होती की पोलीस पाटलाचे रिपोर्टावर मी भरवसा ठेवला असता, अंगावर जखमा नाहीत म्हणून प्रेत ताब्यात दिले असते. तर या खुनाचे प्रकरणावर कायमचा पडदा पडून, जैतुनबीसह पांचही गुन्हेगार, न्यायासनासमोर आणले गेले नसते व त्यांना जन्मठेपेसारखी कठोर शिक्षाही झाली नसती.

△△

नऊ

# बोलकी डायरी

सन १९७५ चा डिसेंबर महिना होता. सकाळचे साडेसात वाजले होते. तरी थंडी कमी नव्हती. उमरेड तालूक्यातील वेलतूर पोलीस स्टेशनचे ठाणेदार एस्. एल्. शिंदे सकाळीच पोलीस ठाण्यात येऊन बसले होते. डिसेंबर महिना असल्यामुळे वर्षअखेरची पुष्कळशी कामे त्यांना हातावेगळी करावयाची होती. म्हणून ते आजकाल मुद्दाम सकाळी लौकरच पोलीस स्टेशनात येत होते. कागदपत्रांच्या ढिगाऱ्यावरून त्यांनी नजर टाकली. पहिली फाईल चाळली आणि प्रथमच चहा घेण्याचे ठरवून त्यांनी ती बाजूला सारली. शिपायाला बोलाविण्यासाठी त्यांनी जेव्हा मान वर केली तेव्हा त्यांना समोरून एक तिशीच्या आसपासचा इसम घाबऱ्या घाबऱ्या पोलीस स्टेशनात शिरताना दिसला. पोलीस स्टेशनच्या आवारातच तो एका कॉन्स्टेबलशी काही तरी बोलला आणि लगेच तो व पोलीस कॉन्स्टेबल त्यांच्या ऑफिसात आले. खाडकन पाय आपटून सॅल्यूट करून कॉन्स्टेबल म्हणाला–

"साहेब, हा इसम खुनाची खबर घेऊन आला आहे!"

"काय? कुणाचा खून झालाय?" साहेबांनी विचारले.

"महादेवरावांचा! त्यांच्याच शेतावर मी सालदार म्हणून काम करतो." त्या इसमाने उत्तर दिले. त्यानंतर शिंदे व तो इसम यांच्यात झालेल्या प्रश्नोत्तरांतून असे निष्पन्न झाले की, त्या इसमाचे नाव बाळा पंचम असे असून तो हरदोली गावचा राहणारा आहे. त्याच्याजवळ

जमीन नसल्यामुळे तो त्याच गावचे श्री. महादेवराव यांच्या शेतीवर सालदार म्हणून काम करीत होता. महादेवरावांचे वय झाले होते. त्यातून त्यांना मधुमेहाचा विकार होता. त्यामुळे ते अस्थिपंजर झाले होते. त्यांना स्वत: जमिनीची मशागत करणे शक्यच नव्हते; म्हणून त्यानी बाळा पंचम यास सालदार म्हणून ठेवून घेतले होते. बाळा पंचमवर त्यांचा खूप विश्वास होता म्हणूनच कुठेही बाहेर अगर तालुक्याच्या गावी जायचे असल्यास ते आपल्या-बरोबर बाळा पंचम यास घेऊन जात. आदल्या दिवशी देखील ते कोर्टाच्या कामासाठी आपल्या रिंगीतून (गाडी) उमरेड या तालुक्याच्या गावी गेले होते. कोर्टाचे काम आटोपल्यानंतर ते दोघे रिंगीतून उमरेड-हून हरदोलीस परत येत असताना विरखंडीच्या जंगलात तीन माणसांनी लाठ्या–काठ्यांनी महादेवरावांवर प्राणघातक हल्ला केला. त्यावेळी ते रिंगीतून खाली रस्त्यावर पडले.

त्याची कैफियत ऐकून शिंदे यांनी विचारले, "अरे पण त्या लोकांनी महादेवरावांना काठ्यांनी झोडपायला सुरुवात केली तेव्हा तू कुठे होतास ? तू त्यांच्या बचावाचा काहीही प्रयत्न केला नाहीस का ?"

"साहेब, ते तिघेजण लाठ्याकाठ्या घेऊन आले होते. मी निःशस्त्र होतो. महादेवराव तर अशक्तच होते. त्या तिघांपुढे माझे एकट्याचे काय चालणार ? रात्रीचे साडेआठ वाजले असतील. आमची रिंगी विरखंडीच्या जंगलातून चालली होती. आजूबाजूला कुणी नव्हते. आमचे मालक महादेवराव तसे नेहमी आजारीच असायचे कालसुद्धा सकाळी लौकर उठून उमरेडच्या कोर्टात गेले होते. ते थकलेही होते. म्हणून ते गाडीतच पेंगत होते. मी पुढे रिंगी चालवीत होतो. मागील बाजूस मालक पेंगत होते. माझे लक्ष पुढे होते. इतक्यात डोक्यात काठी घातल्याचा आवाज झाला व त्या पाठोपाठ "मेलो रे बापा !" म्हणून मालकांनी मारलेली आरोळी ऐकू आली. त्या क्षणी मी मागे वळून पाहिले तो तीन माणसे काठीने मालकांवर वार करीत असलेली दिसली. रात्र होती, तरीपण हल्लेखोरांच्या पुसटशा आकृत्या मला दिसत होत्या.

पहिली काठी डोक्यावर पडताच मालक रिंगीतून खाली पडले. त्यानंतरही ते हल्लेखोर त्यांना काठ्यांनी झोडपत होते. सडकेवर ते निपचित पडलेले पाहून मी घाबरलो. त्या तिघांपुढे माझे एकट्याचे काय चालणार साहेब? मी त्या लोकांच्या भीतीने रिंगी भरधाव सोडली व हरदोलीस आलो. झालेली घटना मालकिणीस व गावकऱ्यांना सांगितली. गावकरी लगेच माझ्याबरोबर आले. नंतर आम्ही मालकांचे प्रेत गावात आणले. मालकिणीने तर ते प्रेत पाहून हंबरडा फोडला. त्यांच्याच सांगण्यावरून मी आता आपणाकडे मालकांच्या खुनाची खबर देण्यास आलो आहे." वाळा पंचमचे डोळे भरून आले होते.

"बरं पंचम, ती हल्ला करणारी माणसे तुझ्या ओळखीची होती काय?" फौजदार शिंदे यांनी विचारले.

"साहेब, रात्रीचा टाईम होता तेव्हा मला अंधारातून कसे दिसणार?" वाळा म्हणाला.

"काय रे, तुझ्या मालकाचे कुणाबरोबर तरी वैर होते काय?" निदान त्या दृष्टीने खुनाचा हेतू लक्षात येईल असे वाटून शिंदे ह्यांनी प्रश्न केला.

"तशी दुश्मनी नव्हती म्हणा, पण थोडे हेवेदावे होते; त्यातूनच कोर्ट-कचेऱ्या व्हायला लागल्या होत्या." वाळाने उत्तर दिले.

फौजदार शिंदे यांची आशा पल्लवित होऊ लागली.

"कुणाबरोबर त्यांचा कोर्टात दावा चालला होता?" त्यांनी पुढचा प्रश्न केला.

"साहेब, मालकांनी नवीन खरेदी केलेल्या शेतीच्या ताब्यासंबंधी आमच्याच हरदोली गावातील संपत डोमा, भगवान डोमा व त्यांचे वडील डोमा चिधू या तिघांत व आमच्या मालकांत उमरेड येथील कोर्टात दिवाणी दावा चालू होता. या दिवाणी दाव्याची तारीख काल उमरेड कोर्टात होती. म्हणून तर मालकांनी मला सकाळी ९ वाजताच रिंगी जुंपून आणावयास सांगितली होती. कोर्टाचे काम चार वाजता

आटोपल्यावर आम्ही दोघेही रिंगीने हरदोली गावाकडे निघालो आणि रस्त्यात हा असा प्रकार घडला." पंचमने डोळे पुसले.

पंचमचे आपल्या मालकावर खूप प्रेम असल्याचे दिसून येत होते. पण पोलिसांना भावनावश होऊन चालत नाही. शिंदे साहेबांनी त्याला आणखी एक प्रश्न केला–" बाळाजी, काल कोर्टात डोमाजी व त्याची दोन्ही मुले, संपत व भगवान ही आली होती काय ?"

" हो, ते तिघेजण त्यांच्या रिंगीने आमच्या अगोदरच कोर्टात आले होते–" बाळाजीने उत्तर दिले.

" मग ते तुमच्या अगोदर निघून गेले काय ?"

" नाही वा, त्यांची रिंगी आमच्या रिंगीच्या मागोमाग निघाली होती." बाळा पंचमने जवाब दिला.

" बरं पंचम, आता एक शेवटचा प्रश्न विचारतो," फौजदार साहेब म्हणाले–" नीट आठवून सांग, त्या हल्लेखोरांच्या ज्या पुसट आकृत्य तुला रात्री दिसल्या त्यांच्यात आणि डोमाजी नि त्याचे मुलगे यांच्यात काही साम्य वाटले का ?"

" व्हय, व्हय, तसा बराचसा सारखेपणा दिसला खरा ! पन उगीच आपल्या तोंडून दुसऱ्याचे नाव कसे सांगायचे ? तसे बघितले तर साहेब, मला बी त्यांचाच संशय येतोय ! वैऱ्यांनी दावा साधला साहेब; माझ्या मालकांचा जीव घेतला त्यांनी." असे म्हणून बाळा पंचम रडू लागला.

बाळा पंचमची जबानी ऐकून फौजदारसाहेबांचा संशय दृढ होऊ लागला. संपत डोमा, भगवान डोमा व त्याचे वडील डोमाजी या तिघांनी शेताच्या दिवाणी दाव्याच्या खटल्याचा निकाल महादेवरावांचा खून करूनच लावल्याची शक्यता मूळ धरू लागली.

बाळा पंचम याने दिलेल्या खबरीवरून वेलतूरच्या ठाणेदारांनी गुन्ह्याची नोंद घेतली. त्याने तिघा आरोपींची नावे फिर्यादीत गोवली

होती. त्याप्रमाणे त्यांना अटक करून त्यांच्याकडून कबुलीजवाब घेतल्या-नंतर ही केस हातावेगळी करता येईल असे ठाणेदारांना वाटले.

तत्पूर्वी हरदोली गावी जाऊन महादेवरावांच्या प्रेताचा पंचनामा करणे जरूरीचे होते. म्हणून ठाणेदार आपल्या सहकाऱ्यांसह हरदोलीस गेले. मयताच्या अंगावर झालेल्या जखमांचे वर्णन, तसेच मयताचे कपडे तपासत असताना त्यांच्या खिशात असलेली तंबाखूची डबी. काही सुपाऱ्या याही गोष्टींची नोंद त्यांनी केली. त्याचप्रमाणे मयताच्या खिशात एक लहानशी डायरीपण सापडली. ठाणेदारांनी ती डायरी सहज चाळून पाहिली असता त्यावर मयताने आपल्या हस्ताक्षरात मजु-रांना दिलेल्या मजुरीचा जमाखर्च लिहिलेला त्यांना आढळला. त्याशिवाय काही रकमांच्याही नोंदी होत्या. तपासाच्या दृष्टीने या डायरीचा काही फारसा उपयोग करता येईल असे त्यांना वाटले नाही, तरीपण त्यांनी त्या डायरीची नोंदही पंचनाम्यात करून खिशात सापडलेल्या सर्व वस्तूं-बरोबर डायरीही जप्त केली. हे सर्व झाल्यानंतर ठाणेदारांनी ते प्रेत मरणोत्तर तपासणीसाठी उमरेड येथील सरकारी दवाखान्यात पाठवून तिघा संशयित आरोपींना पकडून आणण्याचा हुकूम सोडला.

संशयित आरोपीत संपत डोमा, भगवान डोमा व त्याचे वडील डोमाजी गावातच राहत असल्यामुळे त्यांना पकडून आणण्यास काही वेळ लागला नाही.

तिघांना जेव्हा कळले की आपणास खुनाच्या आरोपावरून धरले जात आहे तेव्हा त्यांना रडूच फुटले. आपण कुणाचाही खून केला नाही असे ते शपथेवर सांगू लागले, पण बहुधा सर्वच गुन्हेगार सुरुवातीला आपण गुन्हा केलाच नाही असा आव आणतात, हा अनुभव शिंदे यांना नवीन नव्हता. त्यांनी या तिन्ही आरोपींची सात दिवसाची पोलीस कस्टडी रिमांड घेतली.

रिमांडच्या मुदतीत वेगवेगळ्या प्रकारांनी विचारपूस केली पण त्या तिघांनीही डोळ्यात आसवे आणून आपण निरापराध आहोत हे

सांगितले. संपत डोमा तर म्हणाला, " साहेब खरेच आम्ही खून केला नाही. आमचा व महादेवरावांचा दिवाणी कोर्टात दावा चालू होता हे खरे ! पण आम्ही त्या दिवशी आंबोली गावातच थांबलो होतो. महादेव राव व त्यांचा सालदार हे दोघेही त्यांच्या रिंगीतून चार वाजताच निघून गेले होते."

गुन्हा झाला त्या समयी जर गुन्हेगार दुसरीकडे होते तर त्यांच्या-वर आरोप कसा करता येईल ? तेव्हा या तिघांची 'ॲलिबी' तपासणे आवश्यक होते. इतका तपास चालू असूनसुद्धा तिघांचा नकार ठाम होता, त्यांच्या डोळयांत अश्रू होते व आता तर ते गुन्हा झाला त्या वेळी आपण आंबोली गावात होतो असे सांगत होते हे पाहून ठाणेदारांनी त्यांचे म्हणणे पडताळून पाहण्याचे ठरविले. ते स्वतः आंबोली गावात गेले व त्या तिघांच्या म्हणण्याचा खरेपणा पडताळून पाहू लागले. त्या तपासात गुन्हा घडला त्या वेळेस हे तिघेही आंबोली गावात हजर अस-ल्याचे निश्चित सिद्ध झाले.

काहीतरी घोटाळा होत होता खास ! वास्तविक या तिघांना महादेवरावांचा खून करण्याइतपत कारण होते. त्या दिवशी तशी संधी होती. बाळा पंचमसारखा मयत इसमाचा विश्वासू नोकर साक्षीदार होता, परंतु त्या तिघांचा इन्कार ठाम होता आणि आता तर खुनाच्या समयी ते अन्यत्र उपस्थित असल्याचे दिसत होते.

आता तपासाची चक्रे उलट फिरायची वेळ आली म्हणून शिंदे यांनी आजवर केलेला तपास सुरुवातीपासून पुन्हा तपासून पाहण्याचे ठरविले. बाळा पंचम याने आरंभी दिलेल्या खबरीत लिहून दिले होते की विरखंडी जंगलातून जाणाऱ्या रस्त्यावर मालकाचे प्रेत पडले होते व हरदोली गावात येऊन, त्याने ही खबर सांगताच गावकरी त्याला बरोबर घेऊन जंगलातील त्या रस्त्यावर गेले होते. पण रस्त्यावर त्यांना ते प्रेत दिसले नव्हते. ते सर्वजण प्रेत हुडकत असताना बाळा पंचम एकदम ओरडला होता– " हे पहा, मालकांचे प्रेत इथे लपवून ठेवले आहे ! "

त्या ठिकाणी खरोखरच मालकाचे प्रेत झुडुपाआड लपविलेल्या स्थितीत पडलेले गावकऱ्यांना दिसले व तिथूनच ते प्रेत लपवून ठेवल्याची नेमकी जागा बाळा पंचम यासच कशी सापडली ?—हा प्रश्न शिंदे फौजदारांच्या डोक्यात येताच एक संशयाची पाल त्यांच्या मनात चुकचुकली.

विरखंडीच्या जंगलात अंधाऱ्या रात्री हा खून झाला असल्याने प्रत्यक्ष ही घटना कुणीच पाहिलेली नव्हती. बाळा पंचम हा तर फिर्यादी होता. झालेल्या खुनाला तो एकुलता एक साक्षीदार होता. त्याने जरी ही घटना पाहिली असल्याचे सांगितले होते तरी अंधारामुळे आपण खुनी हल्लेखोरांना ओळखू शकलो नाही हे पण सांगितले होते. म्हणजे सुरुवातीला वाटले तितके हे प्रकरण सोपे नव्हते. शिंदे यांनी विरखंडीच्या जंगलात जाऊन बारकाईने निरीक्षण केले, पण तेथेही त्यांना पुराव्याच्या दृष्टीने उपयोगी पडेल असा एकही दुवा मिळाला नाही. दरम्यान महादेवरावांच्या प्रेताचा मरणोत्तर तपासणी रिपोर्ट त्यांना मिळाला. त्या अहवालात 'महादेवराव मधुमेहाचे पेशंट होते, ते कमालीचे अशक्त होते त्यामुळे त्यांच्या डोक्यावर बोथट हत्याराने झालेल्या जखमेतून रक्तस्राव झाल्याने मृत्यू आला' असे मत मेडिकल ऑफिसर यांनी दिले होते.

शिंदे फौजदार विचारात पडले होते. ते बेचैन झाले होते, कारण खुनी व्यक्तींबद्दल निर्णायक पुरावा अजून हाती येत नव्हता. सत्य समजत नव्हते. तपासाला नवीन साधन दिसत नव्हते. तेवढ्यात त्यांच्या मनात विचार आला—'चला, मयताची डायरी तरी चाळून बघू.' त्यात मजुरांना दिलेल्या रकमांच्या नोंदी त्यांनी अगोदरच पाहिल्या होत्या. ती डायरी काळजीपूर्वक तपासताना शिंदे यांची नजर एकाएकी एका नोंदीवर खिळली. ज्या दिवशी महादेवराव उमरेड येथील कोर्टात गेले होते त्याच तारखेची ती नोंद होती. मयत महादेवराव यांनी त्या दिवशी रु. ६६७४ चे सोने खरेदी केल्याचे लिहिले होते. शिंदे यांच्या डोक्यातील विचारचक्र जोराने फिरू लागले,

बाळा पंचम त्या दिवशी सकाळी नऊ वाजल्यापासून महादेवरावांबरोबर होता, तेव्हा त्याला आपल्या मालकाने सहा हजार सहाशे चौऱ्याहत्तर रुपयांचे सोने विकत घेतले ही गोष्ट ठाऊक असावयास हवी होती. पण त्याने त्यावद्दल कुठेही आपल्या जबावात उल्लेख केलेला त्यांना आढळला नाही! इथे काहीतरी पाणी मुरते आहे, असे शिंदे यांना वाटले व त्यांनी लगेच बाळा पंचम यास बोलावणे पाठविले.

बाळा पंचम पोलीस स्टेशनात आल्यानंतर त्यांनी त्याला विचारले– "बाळा पंचम, उमरेडच्या कोर्टात तुम्ही गेलात त्यावेळी तू मालकाबरोबरच होतास, मग कोर्टातील काम संपल्यानंतर तुम्ही कुठे कुठे गेला होता, हे तू मला आठवण करून सांगशील का?"

"आम्ही दुसरीकडे कुठेच गेलो नाही साहेब. चार वाजता मी रिंगी जुंपली आणि आम्ही तडक घराकडेच यायला निघालो." बाळा पंचमने बेधडक उत्तर दिले. आता मात्र शिंदे यांची खात्री झाली की बाळा पंचम धादांत खोटे बोलतो आहे. ते झटकन आपल्या जागेवरून उठले आणि बाळा पंचमच्या खांद्यावर हात ठेवून त्यांनी जरबेने विचारले– "बाळ्या, मालकांनी घेतलेले साडेसहा हजारांचे सोने कुठे लपविले आहेस ते सांग!"

"म...मला...माहीत नाही, साहेब–" बाळा चाचरत म्हणाला.

"अस्सं, तुला ठाऊक नाही काय? ठीक आहे, तुला कसे बोलते करायचे ते मला माहीत आहे, बाळ्या!" शिंदे म्हणाले.

त्यांनी लागलीच बाळा पंचमला तिथल्या तिथे अटक करून कोठडीत डांबले. त्याला मागाहून फैलावर घेता येईल असा त्यांनी बेत केला. ते लगेच उमरखेड येथील सराफ बाजारात गेले व त्या ठिकाणच्या सोन्याचांदीच्या दुकानी जाऊन त्यांनी तपासास सुरुवात केली. तेव्हा त्यांना श्री. रामजी ठाकरे यांच्या दुकानात उपर्युक्त रकमेचे सोने खरेदी केल्याची नोंद मिळाली. त्यानंतर श्री. जगन्नाथ सोनार यांच्या रजिस्टरमध्ये महादेवरावांनी त्याच दिवशी त्यांच्या दुकानातून सोन्याच्या

पाटल्या करून घेतल्याची नोंद आढळली. त्या रजिस्टरवर मयत महादेव-रावांची सही पण होती. जगन्नाथ सोनार याने सांगितले की त्या दिवशी महादेवराव व वाळा पंचम दोघेही त्यांच्या दुकानी आले होते. श्री. सोनार दोघांनाही चांगले ओळखत होते. महादेवराव तर त्यांच्या जुन्या गिऱ्हाइकांपैकी एक होते. त्या लोकांचे जावजवाव घेऊन शिंदे तडक परतले.

वाळा पंचम धडधडीत खोटे बोलला होता यात आता शंका नव्हती. दिवाणी दाव्याचा फायदा घेऊन त्याने डोमा आणि त्याच्या मुलांवर हळूच संशय ढकलून दिला होता. शिंदे यांच्या डोळ्यांसमोर संपत डोमा, भगवान डोमा व डोमाजी या तिघांचे चेहरे तरळून गेले. त्यांचे पाण्याने डबडबलेले डोळे आठवले.

आता वाळा पंचमच्या विरुद्ध सज्जड पुरावा उपलब्ध झाला होता; त्यामुळे संपत डोमा, भगवान डोमा आणि त्यांचे वडील वेकसूर झाल्याचे आपोआपच स्पष्ट झाले होते. त्यामुळे त्याच दिवशी या तिघाही संशयितांना शिंद्यांनी त्वरित मुक्त केले व खरा आरोपी वाळा पंचम याची सात दिवसांची पोलीस कस्टडीची रिमांड घेतली.

गुन्ह्याची खवर देणारा वाळा पंचम हाच खरा आरोपी होता !

पोलीस कस्टडीचे सात दिवस भरण्यापूर्वीच वाळा पंचम याने आपल्या गुन्ह्याची कवुली देऊन टाकली. तिचा सारांश असा होता–

उमरेड कोर्टाची तारीख संपल्यानंतर महादेवराव वाळा पंचम-बरोबर सराफा बाजारात गेले. त्या ठिकाणी रामजी ठाकरे यांच्या दुकानी सोनेखरेदीचा व्यवहार झाला. त्यानंतर ते सोने जगन्नाथ सोनारा-कडे पाटल्या बनविण्यासाठी त्यांनी दिले. पाटल्या तयार करून घेतल्या-नंतर महादेवरावांनी त्या पाटल्या आपल्या अंगरख्याच्या खिशात ठेवल्या. नंतर चहा–पाणी पिऊन त्यांनी आपल्या रिंगीतून हरदोली गावाची वाट धरली.

महादेवराव मधुमेहाने आजारी असून शरीराने अशक्त होते. ते काठीच्या सहाय्याशिवाय चालूही शकत नव्हते. त्यांना रिंगीत बसवून वाळा पंचमाने रिंगी हाकारली. अंधार पडू लागला होता. रिंगी त्यावेळी जंगलातून जात होती. आजूबाजूला कोणी नव्हते. फक्त रिंगीचा खडखडाट त्या नि:स्तब्ध शांततेचा भंग करीत होता.

रिंगीच्या चाकाबरोबर वाळा पंचमच्या डोक्यातही एका भयानक विचाराचे चक्र फिरू लागले होते. त्याच्या डोळ्यांपुढे मालकांच्या खिशातील साडे सहा हजार रुपयांच्या सोन्याच्या पाटल्या तरळू लागल्या.

या जंगलात जर मालकाला ठार मारून त्या पाटल्या पळविल्या तर कुणाला कळणार आहे? मालकाला ठार मारणे वाळा पंचमच्या दृष्टीने अवघड बाब नव्हती.

त्याने सहज मागे दृष्टी टाकली. मालक झोप आल्याने पेंगू लागले होते. त्यांची काठी त्यांच्या शेजारी पडलेली होती. वाळाने रिंगी उभी केली व खाली उतरून रिंगीत ठेवलेली काठी हस्तगत केली. मालक झोपेतून जागे होतात न होतात तोच वाळाने त्यांच्या डोक्यावर एका पाठोपाठ एक असे काठीचे दोन तडाखे लगावले. दोनच तडाख्यांत मालकाची प्राणज्योत अनंतात विलीन झाली. जी काठी ते जिवंत असताना त्यांना प्रवासात साथ देत होती त्याच काठीने त्यांच्या जीवनमार्गावरील प्रवासाचा अंत व्हावा, हा दैवदुर्विलास होता!

मालक मेलेले पाहिल्याबरोबर वाळा पंचमने अगोदर त्यांच्या खिशातील सोन्याच्या पाटल्या काढून घेतल्या. त्यांची प्लास्टिकची डबी बाहेर फेकून दिली व पाटल्या आपल्या खिशात ठेवल्या. नंतर मालकांचे प्रेत रिंगीतून ओढून बाहेर झुडुपात लपवून ठेवले.

रिंगीने घरी जाऊन त्याने त्या सोन्याच्या पाटल्या घरातच खड्डा खणून पुरून टाकण्यानंतर रक्ताचे डाग पडलेला शर्ट घरात टांगून ठेवला. तो धुऊन काढण्याचे भानही त्याला राहिले नाही. नंतर तो बोंबाबोंब करीत आपल्या मालकिणीकडे आला व तीन हल्लेखोरांची कपोलकल्पित हकीकत त्याने मालकिणीस व गावकऱ्यांना सांगितली.

पुढे तीच हकिकत त्याने पोलीस स्टेशनमध्ये सांगितली.

बाळा पंचमने दिलेल्या कबुलीजबाबावरून आता सर्व प्रत्यक्ष पुरावा व मुद्देमाल मिळविण्यासाठी शिंदे दोन पंचांना बरोबर घेऊन बाळा पंचम सोबत त्याच्या घरी आले. त्याने नेमका एका ठिकाणी खड्डा उकरून सोन्याच्या दोन पाटल्या काढून दिल्या. तसेच वरती खुंटीवर टांगून ठेवलेला, रक्ताने माखलेला शर्टही पोलिसांसमोर हजर केला. त्यानंतर शिंदे ह्यांनी जंगलात जाऊन प्लास्टिकच्या डबीचा शोध घेतला. ती डबी हस्तगत करणे पुराव्याच्या दृष्टीने अत्यावश्यक होते. ती डबी देखील बाळा पंचमने शोधून काढली. त्यानंतर रक्ताने माखलेल्या शर्टची तपासणी करण्यात आली. त्यावरील रक्त व मयताच्या रक्ताचा ग्रुप एकच होता, असे मत तपासणीअंती तज्ज्ञांनी दिले. असा भरभक्कम पुरावा गोळा करून शिंदे यांनी बाळा पंचम याच्याविरुद्ध दोषारोपपत्र तयार करून न्यायालयात दाखल केले.

या खुनाच्या केसचे वैशिष्टच हे की खून होताना पाहणारा कुणीच साक्षीदार नव्हता.

महादेवरावांच्या डायरीवरून मिळालेल्या सूत्राच्या आधारावरून पोलिसांनी खुनी इसमास बरोबर पकडले. सर्व पुरावा परिस्थितिजन्य होता.

नागपूर येथील सेशन्स कोर्टात ही केस चालली. सत्रन्यायाधीशांनी समोर आलेला पुरावा लक्षात घेऊन आरोपी बाळा पंचम यास ३०७ भारतीय दंड विधानाप्रमाणे दोषी ठरवून सात वर्षे सक्तमजुरीची शिक्षा ठोठावली. खुनासारख्या गुन्ह्यास सात वर्षे सश्रम कारावासाची शिक्षा कमी म्हणावयास पाहिजे. पण पोस्टमॉर्टेम रिपोर्टमध्ये 'मयत इसम अत्यंत अशक्त असून मधुमेहाचा पेशंट होता' हे नमूद होते. त्याचा फायदा बाळाला मिळाला असावा, म्हणून ही सौम्य शिक्षा झाली.

महादेवरावांचा खून करताना बाळा पंचमला कुणीच पाहिले नव्हते. त्यामुळे त्याला वाटले होते, आपण थोडा अभिनय केला, थोडी

बनवाबनवी केली, तर सुटून जाऊ. पण मयत महादेवरावांच्या खिशात सापडलेली मूक डायरी बोलली, असेच म्हणावे लागेल. तिच्यात असलेली नोंद काळजीपूर्वक वाचून त्याप्रमाणे शिंदे यांनी पावले उचलली व आरोपीला न्यायासनासमोर खेचले.

ती डायरी बोलकी नव्हती असे कोण म्हणेल ?



दहा

# दुहेरी खून

प्रात:काळची थंड हवा अंगावर शिरशिरी आणीत होती.

गवळी देवराव सीताराम कळपांडे हा सायकल चालवीत नागपूर येथील वर्धा रोडवरील पेट्रोल पंपाकडे जाऊ लागला होता. नित्याप्रमाणे सायकल पंपा वर ठेवून, तेथे असलेली आपली एम. टी. ए. ४०३३ नंबरची जावा मोटारसायकल घेऊन डेअरीस दूध पुरवठा करण्याकरिता तो जाणार होता. विचारांच्या तंद्रीत तो पेट्रोल पंपाजवळ आला. सगळीकडे सामसूम होते. दिशा उजळून निघाल्या तरी पंपावरचे विजेचे दिवे जळतच होते. तेथे काम करणारे जागो पुंडलीक बोबडे व गुलाब गणोरकार हे दोघेही केबिनमध्ये झोपा काढत असतील असे त्यास वाटले. सायकल भिंतीला टेकवून तो केबिनच्या दरवाज्यात आला.

आत डोकावून पाहताच त्याच्या अंगावर शहारे आले. डोळे भीतीने विस्फारले गेले, पाय लटपटत असल्याचे त्यास जाणवले.

केबिनमध्ये जागो बोबडे व गुलाब गणोरकार यांची प्रेते रक्ताच्या थारोळ्यात, त्यांच्या बिस्तऱ्यावरच पडलेली होती. गुलाबच्या मानेवर, डाव्या हनुवटीवर, डाव्या कानाजवळ तीक्ष्ण शस्त्राच्या ताज्या जखमा होत्या व त्या जखमांतून रक्त आल्याने त्याचे कपडे रक्ताने ओलेचिंब झालेले होते. जागोच्याही गळ्यावर, छातीवर, डोक्यावर तीक्ष्ण

शस्त्राच्या जखमा होत्या व त्याचेही प्रेत रक्ताने न्हाऊन निघाले होते. आतील दृश्य पाहून भयभीत झालेल्या देवरावने स्वत:स सावरले.

भिंतीस टेकून ठेवलेली सायकल त्याने घेतली. सोनेगाव पोलीस स्टेशन अवघ्या तीन फर्लांग अंतरावर होते. सायकलवर टांग मारून तो पोलीस स्टेशनकडे निघाला खरा, पण त्याने पाहिलेल्या भयानक दृश्याचा पगडा त्याच्या मनावर इतका पडलेला होता की, सायकलचे पायडलदेखील त्यास धड मारता येईना. त्यामुळे त्या घांदलीत तो एकदा सायकलवरून पडला. कसाबसा उठून उभा राहिला. त्याने पुन्हा सायकल उचलली व तो पोलीस स्टेशनकडे जाऊ लागला. पोलीस स्टेशन आल्यावर सायकल बाहेर ठेवून त्याने आत प्रवेश केला. त्याला कुणी हटकले नाही. तो सरळ साहेबांच्या रूममध्येच घुसला.

पोलीस फौजदार मोबीन हे टेबलावर डोके ठेवून चक्क झोपले होते. रात्रभर नाइट राउंड करून ते थकून-भागून परत आले होते आणि त्यांचा डोळा लागला होता.

धापा टाकीत रूममध्ये दाखल होताच देवराव ओरडला,

" साहेब ! साहेब ! दोन खून झाले आहेत ! "

" काय म्हणतोस ! खून झालेत ? दोघांचे खून ? काय खबर आहे, नीट सांग. "

दिनांक १३-८-१९७७ रोजी सोनेगाव पोलीस स्टेशनमध्ये देव-राव काळपांडे यांनी या घटनेची प्रथम खबर दिली. पोलीस उपनिरी-क्षक मोबीन यांनी गुन्ह्याची नोंद घेतली आणि लागलीच त्यांनी पोलीस निरीक्षक एन्. एस्. केशपागे यांना घटनेचे वृत्त कळविले.

सोनेगाव पोलीस स्टेशनचे इन्चार्ज केशपागे यांनी येऊन तावडतोड तपासाची सूत्रे हाती घेतली. डबल मर्डरची केस होती आणि अर्थातच गुन्हा गंभीर स्वरूपाचा होता. त्यांच्या मनात खळबळ उडून गेली. हे खून कुणी केले असावेत ? अन् ते करण्यामागे कारण तरी काय घडले असावे ? हे दोन प्रश्न त्यांच्यासमोर आ वासून उभे होते. अपराधी

हा अपराध करीत असताना नकळत काही खाणाखुणा तिथे सोडीत असतो, तर काही आपल्याबरोबर अजाणतेपणी घेऊन जात असतो. या खाणाखुणा शोधून काढण्यातच तपास करणाऱ्याचे खरे कसब असते. घटना–स्थळाचे परीक्षण महत्त्वाचे असते.

डॉग युनिट, फिंगरप्रिंट तज्ज्ञ, सी. आय. डी. फोटोग्राफर यांना घटना स्थळावर फोनद्वारे पाचारण करून केशपागे हे त्या ठिकाणी स्टाफसह गेले. श्वानपथकातील 'टो टो' नावाच्या कुत्र्यास घेऊन फौजदार वाशीमकर घटनास्थळी येऊन थडकले. 'टो टो' ने केबिन-मध्ये जाऊन वास घेतला अन् तो तडक रस्त्यावर आला. रेल्वे स्टँडकडे गेला आणि तेथून सोमलवाडा चौकात येऊन तो भुंकू लागला. गुन्हेगार कोणत्या मार्गाने निघून गेला, तो मार्ग अचूक दाखविला. काचेवर व ड्रॉवरच्या कप्प्यावर सापडलेले फिंगर प्रिंटस् पुसट असल्याने निरुपयोगी असल्याचे फिंगर प्रिंट तज्ज्ञाने कळविले.

केशपागे यांच्या हाती अद्यापही काही धागादोरा आलेला नव्हता.

दोन तरुणांच्या निर्घृण हत्येची वार्ता शहरात वाऱ्यासारखी पसरली. भयग्रस्त झालेले शेकडो नागरिक पेट्रोल पंपाच्या आसपास जमा होऊ लागले. पोलिसांनी गुन्हेगारांचा शोध त्वरेने लावला पाहिजे हा एकच सूर त्यांच्या बोलण्यातून येऊ लागला. पोलीस खात्याला ते एक आव्हानच होते !

केबिनमधील टेबलाचा कॅश ड्रॉवर पाहिला तर तो बंद होता. या ड्रॉवरची चावी जागो किंवा गुलाब यांच्याजवळ असलीच पाहिजे असा अंदाज करून त्यांच्या शरीरावरील कपड्यांचे खिसे तपासण्यात आले, परंतु चावी मिळून आली नाही म्हणून केबिनमध्येही सर्वत्र शोध घेण्यात आला. तेव्हा चावी गायब झाली असल्याचे ध्यानी आले.

जागो पुंडलीक बोबडे व गुलाब शामराव गणोरकार या दोघांच्या प्रेतांचे पंचनामे आदी कामे आटोपून दोन्ही प्रेते पोष्टमॉर्टेम तपासणी-करिता पाठविण्यात आली.

एव्हाना पेट्रोल पंपाचे मालक परशराम बिजाराम राठोड हे त्या ठिकाणी आलेले होते. घटना स्थळाची पाहाणी करीत असतानाच केशपागे यांनी परशराम राठोड यांच्याकडे चौकशी सुरू केली.

"जागो व गुलाब काल किती वाजता कामावर आले होते ?" त्यांनी विचारले.

"दिनांक १२–८–७७ रोजी म्हणाजे काल दुपारी दोन वाजल्या-पासून ते कामावर आले. आमचा नोकर हेमराज याने त्यांना कामाचा चार्ज दिला होता."

"अस्सं ! कॅश ड्रॉवरची चावी हेमराजने कुणाजवळ दिली होती व काल दिवसभर झालेल्या विक्रीचे किती पैसे ड्रॉवरमध्ये ठेवले होते ?" केशपागे यांनी पुढचा प्रश्न टाकला.

"हेमराजनं जागो बोबडेकडे चावी दिली होती. आता ड्रॉवरमध्ये पैसे किती असतील म्हणाल तर जरा कागदपत्र तपासून सांगतो साहेब !"

राठोडशेठनी कॅश–रजिस्टर, पावतीपुस्तक वगैरे कागदात डोके खुपसून आकडेमोड चालू केली. जरा वेळानं मान वर करीत ते केशपागे ह्यांना म्हणाले,

"हां ! हेमराजनं चार्ज देताना जागोला रुपये ९४४.३१ एवढी रक्कम मोजून दिली होती. त्यानंतर जागो आणि गुलाब ह्यांनी ३७६ रुपयांची पेट्रोल व डिझेल विक्री केल्याचं या पावत्यांवरून दिसतं. म्हणजे एकूण रु. १३२०.३१ ही रक्कम टेबलाच्या ड्रॉवरमध्ये असायला पाहिजे." राठोडजींनी चटपट हिशेब केला होता.

या तपशिलाची नोंद घेत केशपागे ह्यांनी आणखी प्रश्न विचारला,

"रात्री पेट्रोल पंपावर जागो व गुलाब यांच्या व्यतिरिक्त आणखी कुणी झोपण्यास येत असते काय ?"

"दोघांशिवाय आणखी कुणी येत नाही साहेब ! पण काल रात्री कुणी आले असल्यास मला त्याची माहिती नाही."

अद्याप खुनामागील हेतू स्पष्ट झाला नव्हता. चोरीसाठी हा गुन्हा घडला असल्यास ड्रॉवर उघडून पैसे सुरक्षित आहेत किंवा नाहीत ही खात्री करायला हवी होती. म्हणून अखेर चावीवाला लक्ष्मण दगडूजी मेश्राम यास बोलविण्यात आले. त्याने चावीच्या जुडग्यातून चाव्या लावून पाहिल्या. एका चावीने ड्रॉवर उघडले गेले, परंतु त्यात रक्कम मिळून आली नाही. त्यावरून पैशाकरिता खून करण्यात आले हे उघड झाले. पण खून कुणी केला हे कोडे उलगडले नव्हते. झोपलेल्या अवस्थेत असतानाच जागो व गुलाब यांना ठार मारण्यात आले, ही गोष्ट घटनास्थळ पाहूनच दिसून आली होती.

खून कुणी केला हा प्रश्न केशपागे यांना सतावीत होताच.

केबिनमधील सामान यत्किंचितही अस्ताव्यस्त झाले नव्हते. सर्व वस्तू कशा जिथल्या तिथं व्यवस्थित होत्या. त्यावरून, जागो आणि गुलाब यांनी मारेकऱ्याचा मुकाबला केला नव्हता असे अनुमान निघत होते. हे दोघेजण आपापल्या अंथरुणात मरून पडले होते ही वस्तुस्थितीही याच निष्कर्षाला बळकटी आणीत होती.

का प्रतिकार केला नव्हता त्यांनी आपल्या मारेकऱ्याचा ?

या प्रश्नाचं उत्तरदेखील गुन्ह्याच्या जागेची परिस्थितीच देत होती.

मयतांच्या दोन बिछान्याशेजारी एका पोत्याची आणखी एक पथारी पडलेली होती. अर्थातच कुणीतरी इसम त्या ठिकाणी झोपला होता. मयतांच्या परवानगीशिवाय त्यांना खेटून याप्रमाणे कुणी नवखा मनुष्य झोपणे शक्य नव्हते. याचाच दुसरा अर्थ असा होता की, मयतांनी आपल्या मारेकऱ्याला आपण होऊन घरात घेतला होता व त्याची झोपण्याची सोय केली होती. अर्थातच, त्याच्यापासून आपल्या जिवाला धोका असल्याची भीती त्यांना वाटली नसली पाहिजे.

केशपागे यांच्या डोक्यात विचारचक्र चालू होते.

कोण असणार असा इसम ? एखादा ट्रक ड्रॉयव्हर ? कुणी जुना नोकर ? की त्यांचा दोस्त वगैरे ?

"पेट्रोल पंपावरून किती नोकरांना कामावरून कमी करण्यात आले आहे ?" इन्स्पेक्टर केशपागे ह्यांनी एकाएकी परशुराम राठोडना विचारले.

"सात–आठ जणांना ?"

"मग त्यांची नावं आणि पत्ते द्या बघू...पण अगदी अलीकडे कुणाला दूर केलंय नोकरीवरून ?"

"मुद्गल नावाच्या नोकरास मी पंधरा दिवसांपूर्वीच कामावरून काढून टाकले आहे. तो चोरून पेट्रोल व डिझेल विकत होता. विक्रीच्या पैशाची रक्कमही काही वेळा त्याने चोरली होती." राठोड यांनी ही माहिती दिली, तेव्हा केशपागे यांना आशेचा किरण दिसला. मनुष्य लायक वर्णनाचा दिसत होता. त्यांनी पुन्हा विचारले,

"मुद्गलचे पूर्ण नाव काय ? कुठे राहतो ?"

"मुद्गल पुंडलिक बोकडे असे त्याचे नाव आहे. तो सोमलवाडा चौकाच्या पुढे राहतो." राठोड यांनी ही माहिती देताच केशपागे यांनी पोलीस उप–निरीक्षक भाऊराव देशमुख यांना मुद्गल यास हजर करण्याच्या कामगिरीवर रवाना केले.

देशमुखांनी मुद्गल यांच्या घरावर छापा घातला. परंतु तो मिळून आला नाही. त्यांनी त्याच्या घराची झडती घेतली. घरात त्याची पँट व शर्ट अर्धवट ओलसर स्थितीत असल्याचे आढळून आले. म्हणून देशमुखांनी हे कपडे जप्त केले. मुद्गल हा फरार झाल्याने त्याच्यावरचा संशय बळावला. दिनांक १६–८–७८ रोजी त्यास अटक करण्यात आली. त्यानेच गुन्हा केला असे सिद्ध करण्यासारखा पुरावा अद्यापी उपलब्ध झालेला नव्हता.

केवळ संशयावरून त्याला ताब्यात घेण्यात आले होते.

इन्स्पेक्टर केशपागे यांनी संशयित मुद्गल याच्यावर प्रश्नांची झोड उठविली, परंतु तो ताकास तूर म्हणून लागू देईना. परंतु त्यामुळे कच न खाता केशपागे यांनी प्रश्नांचा भडिमार चालूच ठेवला. हे दोन खून झाले त्यावेळी आपण आपल्या शेजारच्या शेडमध्ये झोपलो होतो;

अशी माहिती मुद्गल याने दिली. मुद्गल सांगत असलेली प्रत्येक घटना अर्थातच पडताळून पाहण्यात येत होती. तेव्हा शेडमध्ये झोपल्यासंबंधीचा त्याचा दावा निखालस खोटा असल्याचे आढळून आले. त्यावरून मुद्गल हा आपली हकीकत सांगताना खऱ्या-खोट्याची सरमिसळ करीत असल्याचे स्पष्ट झाल्याने त्याच्याविषयीचा आपला संशय निराधार नसल्याची खूणगाठ केशपागे यांनी मनाशी बांधली होती.

आज तीन दिवस मुद्गलवर अहोरात्र प्रश्नांची सरबत्ती चालू होती. त्यामुळे अखेरीस तो टेकीस आला व गुन्ह्याची कबूली देऊन मोकळा झाला. त्याच्या कथनाप्रमाणे गुन्ह्याचा तपशील पुढीलप्रमाणे होता.

मुद्गल याने राठोड यांच्या ह्या पेट्रोलपंपावर नोकरी केली असल्याने पंपावर रोजचा गल्ला हजार रुपयांवर जमतो आणि ही रोकड टेबलाच्या ड्रॉवरमध्ये ठेवण्यात येते ही सर्व वित्तंबातमी अनायसेच त्याला होती. पंपावरील नोकरवर्गाबरोबरही त्याचा चांगला परिचय होता.

ता. १३-८-७७ च्या रात्री ही रक्कम पळविण्याच्या उद्देशाने तो तयारी करूनच नऊ वाजता पेट्रोलपंपावर गेला. त्याने एक कुऱ्हाड आपल्यासमवेत आणली होती. ती केबिनच्या बाहेर लपवून ठेवून तो शहाजोगासारखा आत गेला. जागो आणि गुलाब केबिनमध्ये झोपण्याच्या तयारीत होते. आपणही आज इथेच झोपणार आहोत असे मुद्गलने त्यांना सांगितल्यावरून त्यांनी त्याला एक पोते आणि आपल्या शेजारी झोपावयास जागा दिली. हा इसम एक हजार रुपयांच्या चोरीसाठी आपल्या दोघांच्या जिवावर उठणार आहे अशी तिळमात्र शंका त्यांच्या मनात डोकावली नव्हती ही गोष्ट उघड आहे.

रात्रीचे बारा वाजून गेले होते. सर्वत्र सामसूम झाली होती. केबिनमध्ये दोघांना गाढ झोप लागली असली तरी हा एक खूनी चोर चक्क जागा होता. हळूच उठून केबिनचे दार उघडून तो बाहेर गेला आणि त्याने आपली कुऱ्हाड हस्तगत केली.

पुन्हा केबिनमध्ये शिरताच त्याने कुऱ्हाडीचे दोन घाव सपासप जागो व गुलाब यांच्या गळ्यावर घालून त्यांना भयंकर जायबंदी केले आणि त्याच सपाट्यात आणखी प्रहार करून ठार केले. जागोच्या कमरेला टेबलाच्या कॅश ड्रॉवरची चावी होती. त्या किल्लीने ड्रॉवर उघडून त्याने आतील सर्व रक्कम लंपास केली आणि कुलूप ड्रॉवर पूर्ववत बंद केला व तो तेथून लागलीच पसार झाला.

"ती कुऱ्हाड कुठे आहे?"

केशवागे यांनी मुद्‌गल यास विचारले.

"ती कुऱ्हाड मी पंपाजवळच असलेल्या विहिरीत त्याच वेळी फेकून दिली आहे, साहेब!"

सदर पेट्रोल पंपानजीकची विहीर आता पोलिसांना आपल्या-बरोबर नेऊन मुद्‌गल याने दाखविली. विहिरीला पाणी भरपूर होते. त्यामुळे कुऱ्हाडीचा शोध घेणे कठीण झाले. अखेर फायरब्रिगेडच्या मदतीने विहिरीतील सर्व पाणी उपसून काढण्यात आले तेव्हा कुठे तळाशी पडून असलेली ती कुऱ्हाड सापडली. तिच्यावरील रक्त अर्थातच पाण्याने धुऊन गेलेले होते.

आता चोरून नेलेली रक्कम!

"या पैशापैकी पन्नास रुपये मी घरामध्ये एका डब्यात ठेवलेले आहेत व बाकीचे माझ्या वडिलांना दिले आहेत."

मुद्‌गल याने सत्य परिस्थिती सांगून स्वतःच्या घरातील डब्यातून ५० रुपये काढून पोलिसांच्या स्वाधीन केले. त्याचे वडील पुंडलिक बोकडे यांनीही त्यांच्याकडे या गुणी लेकाने दिलेली १,२२४ रुपयांची रक्कम पोलिसांसमोर हजर केली. त्यांनी लगोलग मॅजिस्ट्रेटसमोर कबुलीजबाब दिला.

राहता राहिली प्रेताच्या अंगावरील रक्ताने माखलेली चादर. गुन्हा केल्यावर पळून जाताना मुद्‌गल याने ती चादर एका पाण्याने भरलेल्या डबक्यात टाकून दिली होती. ती आता त्याने पोलिसांसमोर

काढून दिली. त्याचे स्वत:चे रक्ताळलेले कपडे त्याने घरी जाऊन साफ धुऊन टाकले होते. त्यामुळे त्यांच्यावर रक्ताचे डाग सापडू शकले नाहीत.

केशपागे यांनी झपाट्याने तपास करून पुराव्याचे दुवे सांधून मुद्गल याच्याविरुद्ध खून व चोरी केल्याबद्दल आणि त्याच्या वडिलां-विरुद्ध चोरीचा माल घेतल्याबद्दल आरोप पत्र रवाना केले.

पोलिसांनी श्रमपूर्वक सादर केलेला पुरावा ग्राह्य मानून नागपूर येथील सेशन्स कोर्टाने दि. १५–७–७८ रोजी मुद्गल यास आजन्म कारावासाची कठोर सजा ठोठाविली. त्याच्या वडिलानाही दोन वर्षं कारावासाची शिक्षा न्यायाधीशांनी फर्माविली.

गुन्ह्याच्या जागेच्या निरीक्षणावरून आणि तेथील परिस्थिती बारकाईने अवलोकून इन्स्पेक्टर केशपागे यांनी जे आडाखे बांधले ते बिनचूक असल्याची पावतीच कोर्टाच्या या निकालावरून मिळाली होती.



अकरा

# रनबीर बिडीचे लेबल

ता. १९ जून १९७५ ची ती काळरात्र होती. रात्रीचा आठ वाजण्याचा सुमार असेल ! भंडारा जिल्ह्यातील रजेगाव काळोखाने लपेटले गेले होते. दिवसभर शेतावर परिश्रम करून दमूनभागून आलेले गावकरी जेवणखाण आटोपून अंथरुणावर अंग टाकण्याच्या तयारीत होते. रस्त्यावरील रहदारी वाढलेली होती. सर्व गावात नीरव शांतता पसरली होती. एकाएकी गावातली कुत्री भुंकू लागली.

सर्व गाव अजून जागाच होता. कुत्री भुंकण्याच्या आवाजापाठोपाठ 'ठोऽठोऽ' असे बंदुकीच्या आवाजाचे धमाके ऐकू येऊ लागले. बंदुकीचा आवाज ऐकून हवालदिल झालेल्या गावकऱ्यांना काय घडत आहे याचा अंदाज लवकर आला नाही. गावात दरोडेखोर शिरले असतील याची त्यांना कल्पनाच आली नाही. बंदुकीच्या आवाजापाठोपाठ गावातील रूपलाल पोवार यांच्या घरातील माणसांनी केलेली आरडाओरड कानी आली, तेव्हा पोवार यांच्या घरावर दरोडा पडल्याचे गावकऱ्यांना समजले. दरोडेखोरांच्या तावडीतून घरातील माणसांची सुटका करणे सोपे नव्हते. दोन बंदुकधारी दरोडेखोर घराच्या दरवाजाजवळील कठड्यावर उभे राहून गावातील लोकांच्या मनात दशहत निर्माण करण्याकरिता बंदुकीचा आवाज काढीत होते. दरोडेखोरांचा सूत्रधार आपल्या काही साथीदारांसह पोवार यांच्या घरात घुसला होता. सर्वांच्या तोंडावर फडकी बांधलेली होती. घरातील बायकामंडळी घाबरून गेली

होती. त्या वाड्यात एक ग्रामसेवक भाड्याने राहत होता. तो आपल्या खोलीबाहेर येताच त्याला दरोडेखोरांनी घेरले. हा प्रकार पाहून त्याच्या अंगाचा थरकाप उडाला.

" चावी लाव ! " असे हुकमी आवाजात एकजण म्हणाला. " मेरे पास चाबी नहीं है । मैं किरायेदार हूं । " असे तो विनवून म्हणाला. तो भाडेकरू आहे हे माहीत पडताच दरोडेखोरांनी ग्रामसेवकास एका जागी बसवून ठेवले. तो ग्रामसेवक बसल्याबसल्या दरोडेखोरांचे निरीक्षण करीत होता. एका दरोडेखोराच्या उजव्या हाताच्या पंजास चार बोटे नाहीत हे त्याच्या लक्षात आले. घरातील बायकांनी धाडस करून सांगितले की, कुलपाच्या चाव्या मालकाजवळ असून ते बाहेरगावी गेले आहेत. चाव्या मिळत नाहीत हे पाहून त्यांनी तिजोरी फोडण्यास सुरुवात केली. तिजोरीवर लोखंडी पहारीने आघात होऊ लागले. त्याचा ' खण्, खण् ' असा जोराचा आवाज होऊ लागला. घराच्या आसपास दूर अंतरावर टोळक्याटोळक्याने जमलेल्या गावकऱ्यांना तो आवाज ऐकू येऊ लागला. गावकऱ्यांनी गोटमार सुरू केली. सूं सूं करीत गोटे येत होते. बाहेर उभे असलेले दोन दरोडेखोर दरवाजाच्या आड झाले.

सर्व गाव जमा होऊन गोटमार करीत आहे हे पाहून दरोडेखोरांचा धीर खचला. तिजोरी फोडण्यात त्यांना यश आले नाही. भयभीत होऊन त्यांनी काढता पाय घेण्याचे ठरविले. त्यांच्या सूत्रधाराने परवलीचा इशारा करताच ते घराबाहेर पडू लागले. जाता जाता त्यांच्या हाती कापडी निवारीचे एक बंडल व एक साडी पडली. बाहेर पडताना त्यांनी, जमलेल्या गावकऱ्यांनी रस्ता अडवू नये व पाठलाग करू नये म्हणून त्यांच्यावर बंदुकीच्या फैरी झाडल्या. त्यामुळे एका गावकऱ्यास वर्मी गोळी लागून तो जागच्याजागी मरण पावला व चार जण गंभीररीत्या जखमी झाले. त्यांचा पाठलाग करणे म्हणजे मृत्यूच्या कराल दाढेत जाणेच होते ! शिवाय ते चौदा जण होते. त्यांचा पाठलाग करण्याचे धाडस कोणी केले नाही.

ते पळून जात असताना एक बैलगाडी गावाबाहेरून येताना त्यांना

दिसली. ती बैलगाडी अडवून आत बसलेल्या एका स्त्रीच्या गळ्यातील तीन–चार तोळे सोन्याची गरसोळी चोरट्यांनी ओढून काढून घेतली, त्यानंतर ते अंधारात दिसेनासे झाले. गावकऱ्यांच्या दगडफेकीस घाबरून त्यांनी पोबारा केला होता. दरोडेखोरांच्या हाती फक्त कापडांची निवार, एक साडी व एक सोन्याची गरसोळी इतकाच माल लागला. मालमत्तेचे विशेष नुकसान झालेले नसले तरी एक गावकरी गोळीबारात मरण पावला होता व चारजण छर्रे लागून जखमी झाले होते.

मौजा रजेगाव हे लाखणी पोलीस स्टेशनच्या हद्दीत येत असल्याने गावच्या कोतवालासोबत काही गावकरी लाखणी येथे आले व त्यांनी झालेला प्रकार लाखणीचे इनचार्ज पोलीस उपनिरीक्षक श्री. सुलतान बक्ष यांना सांगितला. श्री. बक्ष यांनी गुन्ह्याची नोंद भारतीय दंड विधान कलम ३९७ प्रमाणे केली. वरील पोलीस अधिकाऱ्यांनाही या घटनेची खबर दिली. दरोड्याची वार्ता वणव्याप्रमाणे आजूबाजूच्या गावांत पसरली. जो तो आपला पोलीसठाण्यावर तोंडसुख घेत होता. रात्री आठ वाजता सर्व गाव जागा असताना दरोडा घालून गुन्हेगारांनी पोलीस खात्यास आव्हानच दिले होते. ठाणेदार श्री. सुलतान बक्ष हे स्टाफसह घटनास्थळावर रवाना झाले.

सुलतान बक्ष हे रजेगावला येऊन पोचले त्यावेळी गावात कोलाहल माजला होता. श्री. बक्ष यांनी प्रथम गोळीबारात जखमी झालेल्या गावकऱ्यांना भंडारा येथील हॉस्पिटलमध्ये रवाना केले. रक्ताच्या थारोळ्यात पडलेल्या इसमाच्या प्रेताचा पंचनामा करून प्रेत पोस्ट-मॉर्टेमकरिता पाठविले. श्री. पोवार यांच्या घरासमोर पडलेली रिकामी काडतुसे ताब्यात घेतली. घटनास्थळाचे सूक्ष्म निरीक्षण करता गावाच्या बाहेर रस्त्याच्या कडेला मातीचा भुसभुशीत भाग होता, त्या भागावर मोटरच्या टायरच्या निशाण्या दिसून आल्या. टायर मार्क्सवरून तेथे दोन मोटरी येऊन थांबल्या होत्या, हे सिद्ध झाले. दरोडेखोरांनी गुन्हा करण्यासाठी येताना व गुन्हा करून परत जाताना मोटारी उपयोगात

आणल्या होत्या. या दोन मोटारी कोणत्या मेकच्या होत्या, हा प्रश्न सोडविणे क्रमप्राप्त होते. टायर मार्क्सच्या अंतरावरून दोन्ही मोटारी अॅम्बसेडर कार असाव्यात असा निष्कर्ष निघाला.

या टायर मार्क्सच्या जवळच मारूची एक रिकामी बाटली, चारमिनार सिगारेटची आणि विडयांची थोटके दिसली. वारकाईने पाहत असताना चोळामोळा झालेला एक कागदही पडलेला आढळला. तो कागद म्हणजे विडीबंडलावरील लेबल आहे, हे दिसून आले. त्या लेबलवर 'रनवीर विडी, राजनांदगाव (म. प्र.)' असे छापलेले होते. रजेगावच्या आसमंतात कोठेही रनवीर विडी मिळत नाही, हे पोलिसांना माहीत होते. दरोडेखोरांपैकी कोणीतरी ही विडी पीत असावा व तो मध्यप्रदेशातील असावा, हे अनुमान निघाले. भंडाऱ्यापासून जवळच मध्यप्रदेशची बॉर्डर लागते. त्या बाजूकडून ही टोळी आली असावी असा कयास तपास करणाऱ्या अधिकाऱ्यांनी केला.

पोलीस पाटलाने खैरी गावाकडे एम्. पी. मध्ये जाणाऱ्या रस्त्याने दोन अॅम्बसेडर कार जाताना पाहिल्याचे सांगितले. त्या दोन कारपैकी एक हिरव्या रंगाची व दुसरी अॅश कलरची असल्याचा खुलासा त्याने जबाबात केला.

रजेगावाहून तपास करीत करीत पोलीस भंडाऱ्यास आले. भंडाऱ्यावरून जो हायवे रोड मध्यप्रदेशात जातो, त्या मार्गावरून पोलिसांनी मध्यप्रदेशाकडे जाण्याचे ठरविले. त्यांनी आपल्या सोबत दोन पोलीस जीपगाडया घेतल्या व ते हायवे रोडने निघाले. रस्त्यात कोठे गाव दिसले की 'रनवीर विडी मिळते काय ?' याचा तपास करीत होते. रस्त्यात लागणारा प्रत्येक पेट्रोलपंप ते चेक करीत होते. ता. १२-६७५ रोजी किती अॅम्बेसेडर कारनी पेट्रोल घेतले ही माहिती काढून कारचे नंबर नोट करीत होते.

असा तपास करीत करीत ते मध्यप्रदेशच्या बॉर्डरवर असलेल्या महाराष्ट्र राज्यातील देवडी या गावी आले. या गावाच्या पुढे मध्य-प्रदेशाची सुरवात होत होती. रस्त्याच्या कडेला हे गाव लागताच

जीपगाड्या थांबल्या. साध्या वेशातील कॉन्स्टेबल्स् गावात गेले. या गावात त्यांना जप्त केलेल्या लेबलप्रमाणे रनवीर विडी मिळत असल्याचे आढळून आले. देवडी या गावी काही धागादोरा मिळतो काय याचा तपास करण्याचे ठरले. या गावात कोणी गुन्हेगार राहतो काय, कोणी जेलमधून नुकताच सुटून आला काय, याचा त्यांनी मागोवा घेतला. परंतु त्यांना अशा कोणत्याही गुन्हेगाराची माहिती मिळाली नाही.

दरोडा झाल्या दिवसापासून पोलिसांना उसंत नव्हती. वेळेवर जेवण मिळत नव्हते, रात्री झोप मिळत नव्हती, अशी त्यांची स्थिती होती. देवडी येथील क्वालिटी रेस्टॉरंटमध्ये चहा फराळ घेऊन मगच ते पुढे जाणार होते. क्वालिटी रेस्टॉरंटमध्ये तपास पार्टीतील लोक गेले. रेस्टॉरंटचे मालक श्री. जैन हे गल्ल्यावर वसलेले होते. पोलीस अधिकारी सुलतान बक्ष, पराड वगैरे रेस्टॉरंटमध्ये गेले. त्यांनी रेस्टॉरंटच्या मालकास रजेगाव येथील श्री. पोवार यांच्या घरावर पडलेल्या दरोड्यासंबंधी माहिती सांगून "त्या दिवशी कोणी नवखे लोक हॉटेलात आले होते काय ?" अशी चौकशी केली. श्री. जैन यांनी पोलीस अधिकाऱ्यांचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले. मग ते म्हणाले, "मला आठवत आहे ती तारीख जूनची बारा असावी. सायंकाळचे पाच वाजले असतील, तेव्हा मी गल्ल्यावरच बसलो होतो. एक हिरव्या रंगाची ॲम्बेसेडर हॉटेलसमोर येऊन उभी राहिली. त्यातील सहा जणांनी कारच्याबाहेर येऊन हॉटेलात प्रवेश केला. त्यांनी चहाची ऑर्डर दिली. ते सर्वजण हिंदीतून बोलत होते. हॉटेलातील पोऱ्याने पाण्याने भरलेले सहा ग्लास टेबलावर ठेवले. पाण्याचे ग्लास उचलून घेताना, त्या सहा जणांपैकी एकाच्या उजव्या हाताच्या पंजास चार बोटे नाहीत, असे माझ्या ध्यानात आले. चहा प्याल्यानंतर ते बिल देऊन बाहेर पडले. त्यांच्यापैकी एकाने हॉटेलच्या बाहेर असलेल्या पानठाण्यावरून रनवीर बिडीचे बंडल विकत घेतले व नंतर ते कारमध्ये बसून भंडाऱ्याकडे रवाना झाले."

श्री. जैन यांच्या माहितीवरून, ते सहा जण दरोडेखोरच होते यात शंका नव्हती. जैन यांनी या सहा इसमांना जवळून पाहिले असल्याने

त्यांचे वर्णन उपयोगी पडणार होते. म्हणून अधिकाऱ्यांनी श्री. जैन यांना विचारले, "आपण या सहा जणांचे वर्णन करू शकता काय ?"

"एका इसमाच्या उजव्या हाताच्या पंजास चार बोटे नव्हती, तो काळसर रंगाचा बुटका होता. बाकीच्या इसमांना जर दाखविण्यात आले तर मी ओळखू शकतो."

"त्यांची हिरव्या रंगाची कार आपण पाहिली आहे. त्या कारचे वर्णन आठवून सांगा."

"त्या कारचा नंबर मला आठवत नाही. परंतु मला चांगले आठवते की त्या कारच्या दोन्ही मडगार्डच्या मध्ये लाल पट्टा आहे; पाठीमागील बाजूस असलेल्या सामान ठेवण्याच्या डिकीवर खोचा पडलेला आहे. इतकेच माझ्या स्मरणात आहे." असे श्री. जैन यांनी सांगितल्यावर त्यांचा लेखी जबाब घेण्यात आला. मध्यप्रदेशातूनच दरोडेखोर आले होते, हे उघड झाले.

त्यानंतर दोन पोलीस जीप्सपैकी एका जीपमधील पोलीस पार्टीस राजनांदगाव येथे पाठविण्यात आले. दुसरी जीप तेथून २५ मैलांवर असलेल्या दुर्ग या गावी रवाना झाली.

दुर्गमधे फिरत असताना पोलिसांना मच्छी मार्केटजवळ दोन्ही मडगार्डच्या मध्ये लालरंगाचा पट्टा असलेली ॲम्बेसेडर कार उभी असलेली दिसली. तिच्या मागील बाजूच्या डिकीवर खोचा पडल्याची खूणही दिसून आली. गाडीत फक्त ड्रायव्हर बसलेला होता. क्षणाचाही विलंब न लावता पोलिसांनी ड्रायव्हरच्या केबिनचे दार उघडून त्याच्यावर झेप घातली व त्याला बाहेर ओढले ! अचानकपणे पोलिसांनी अटक केल्यामुळे तो गडबडून गेला. त्याला स्वप्नातही असे वाटले नव्हते, की अशा रीतीने पोलीस पकडतील ! आता लपवालपवी करण्यात काही अर्थ नाही हे त्याने ओळखले. या गडबडीत त्या कारच्या दिशेने मच्छी मार्केटकडून येणारा एक इसम हा प्रकार पाहून पळून गेला. त्याचे नाव

छन्नू असल्याचे अटक केलेल्या ड्रायव्हरने सांगितले. पकडलेल्या ड्रायव्हरने आपले नाव जगन्नाथ असल्याचे सांगितले.

ड्रायव्हर जगन्नाथ याने गुन्ह्याची हकीकत सांगितली ती अशी–

"भंडारा जिल्ह्यातील रजेगावचा राहणारा भाऊराव हा भिलई येथील स्टील प्लँटमध्ये काम करतो. भिलई येथे त्याचा परिचय कटवास, नायडू व तिलकधारी या गुन्हेगारांशी झाला. या तिघांनी त्यास भंडारा जिल्ह्यात एखादे चांगले सावज आहे काय म्हणून विचारले असता, त्याने रजेगाव येथील रूपलाल पोवार यांच्या घरात अमाप संपत्ती ठेवलेली आहे, अंदाजे दहापंधरा किलो सोने आहे, असे सांगितले होते. सावजाची माहिती मिळताच पोवार यांचे घर पाहून येण्याचे ठरले. दरोडा घालण्याच्या आधी पंधरा–वीस दिवस कटवास, इस्माइल, नामदेव, छन्नू असे रजेगावास आले. त्यांनी 'आपण जंगलचे ठेकेदार आहोत' अशी बतावणी करून रूपलाल पोवार यांचे घर पाहून घेतले. घरात तिजोरी आहे, त्यात संपत्ती दडलेली आहे की नाही याचीही त्यांनी माहिती काढली व ते परत आले.

"भाऊराव याने दिलेली सावजाची बातमी बरोबर असल्याचे त्यांनी इतर साथीदारांना सांगितले. कटवास याच्याजवळ गावठी बंदूक होतीच. तो म्हणाला होता, 'बाजा लगेगा.' बंदुकीला त्याने बाजा असा परवलीचा शब्द वापरला होता.

"दुर्गचाच रामसरन हाही या टोळीत सामील झाला. तो गावात जुव्याचे व शराबचे अड्डे चालवीत असे व त्याच्याजवळ लायसेन्सची बंदूक होती. त्याने बाजा (बंदूक) बरोबर आणण्याचे कबूल केले आणि तोच या टोळीचा सूत्रधार बनला. एकूण १४ जण या टोळीत सामील झाले. सर्वांनी मिळून दरोडा घातला, पण हाती पैसा अडका लागला नाही."

अटक केलेला आरोपी जगन्नाथ याने त्याच्या इतर साथीदारांचे पत्तेही सांगितले.

या टोळीचा प्रमुख सूत्रधार रामसरन हा उत्तर प्रदेशात पळून गेला होता. उपपोलीस अधीक्षक श्री. लोहार यांनी त्याला बंदुकीसह पकडून आणले. आरोपी जगन्नाथ याने सांगितलेल्या माहितीवरून ठिक-ठिकाणी छापे घालून भंडारा पोलिसांनी बारा दरोडेखोरांना पकडले.

या गुन्ह्याच्या तपासात उपनिरीक्षक सुलेमान वक्ष, पराड, निरीक्षक डिग्रसकर, श्री. चोवे, तसेच पोलीस अधीक्षक श्री. नेगी यांनी अतोनात परिश्रम घेतले.

रूपलाल पोवार यांच्या घरात राहणारा ग्रामसेवक, तसेच देवडीचे हॉटेल मालक जैन व हॉटेलातील पोऱ्या यांनी ओळखपरेडमध्ये आरोपींना ओळखून काढले. या गुन्ह्याच्या तपासात एकूण अटक झालेल्या बाराही आरोपींना ओळखून काढण्यात आले. गुन्ह्याच्या ठिकाणी मिळालेली काडतुसे व गुन्हेगारांच्या ताब्यातून जप्त झालेल्या बंदुका विशेषज्ञाकडे तपासणीकरिता पाठविण्यात आल्या. 'जप्त झालेल्या बंदुकीतूनच ती काडतुसे उडालेली होती' असा अभिप्रायही विशेषज्ञा-कडून आला.

यागुन्ह्यातील आरोपी नायडू व तिलकधारी हे फरारी राहिले. पोलीस निरीक्षक श्री. डिग्रसकर यांनी या गुन्ह्याचा तपास पुरा करून बारा आरोपींविरुद्ध दोषारोपपत्र पाठविले.

सत्र न्यायाधीश, भंडारा यांच्या कोर्टात केस चालली. केस चालू असताना दरोडेखोरांना पाहण्यासाठी लोकांच्या झुंडीच्या झुंडी येत असत.

सत्र न्यायाधीशांनी या केसचा निकाल देऊन, मुख्य सूत्रधार राम-सरन यास आजन्म कैदेची व बाकीच्यांना प्रत्येकी दहादहा वर्षे कारा-वासाची सजा दिली.

△△

बारा

# पिपरी मर्डर केस

नुकती उमललेली कळी आगीच्या ज्वालात फेकून दिल्यावर जशी आगीत होरपळल्यानं जळून काळी राख बनते, तशी आठरा वर्षांची, तारुण्यानं रसरसलेली, काश्मीरी सफरचंदाप्रमाणे अंगावर लाली असलेली शामबाई, तिच्या पतीनं रॉकेल ओतून माचिसची पेटती काडी लावल्यानं आगीचा डोंब उठून त्यात होरपळून काळी पडली होती तिच्या कमळाच्या पाकळ्याप्रमाणे मुलायम अन् देखण्या अंगावर मोठमोठाले फोड उठलेले होते. पाण्यांतून बाहेर काढलेला मासा तडफड करून मरतो, तशी ती तडफड करून, तीन दिवस, मृत्यूशी झूंज देऊन मरण पावली होती. या प्रसंगाची आठवण आली की नागपूरच्या मेयो हॉस्पीटलमधील कॉटवर कापूस पसरून त्यावर टाकलेली, अंग भाजल्यानं काळी पडलेली शामबाई दिसू लागते. तिची तडफड डोळ्यांसमोर येऊन वाटते, स्त्री जन्मा हीच का तुझी कहाणी !

या खुनाचे केसचा तपास माझ्याकडेच होता. दिनांक २३–५–७६ रोजी गोविंदलाल शंकरलाल यादव, उमर वर्षे २३, राहणार मौजा कन्हान पिपरी, जिल्हा–नागपूर याने आपली पत्नी शामबाई, उमर वर्षे १८ हिला ठार मारण्याच्या इराद्यानं तिचे अंगावर रॉकेल तेल ओतून, तिचा जीव जाईल हे माहीत असताना माचिसची काडी लावून पेटवून दिलं. त्यात तिचं अंग भाजून झालेल्या जखमांमुळं ती मरण पावली अशा तऱ्हेचे दोषारोपपत्र मी न्याय दंडाधिकारी वर्ग १ यांचे रामटेक कोर्टात

दाखल केलं होतं. तपासाचे कागदपत्र पाहून व या केसमध्ये प्राथमिक पुरावा आहे म्हणून ती केस सत्र न्यायाधीशांचे कोर्टात पाठविण्यात आलेली होती. नागपूर शहराला भूषणावह ठरलेल्या उत्तुंग व भव्य अशा इमारतीत हे कोर्ट आहे. लहान मुलं खेळातील पत्ते एकावर एक ठेवून बंगले तयार करतात, तशी ही आलीशान इमारत मोठाले पत्ते एकावर एक ठेवून बांधली आहे असं वाटतं. कोणाचेही लक्ष्य वेधून घेणाऱ्या या इमारतीत लीफ्टची सोय केलेली आहे. ही केस सत्र न्यायाधिशांचे कोर्टात सुरू होणार होती, म्हणून मला तिथं जायचं होतं. सेशन्स कोर्टात चालणारी केस म्हटलं की पोलिसांची धावपळ सुरू होते. तपासाचा डोंगर चढून झालेल्या श्रमाचे चीज अपराध्यास सजा झाली तरच होते. तपासांत हाती आलेले दुवे बरोबर जुळवून व्यवस्थितपणे विद्वान न्यायाधिशासमोर मांडावे लागतात. केसची पैरवी करण्यासाठी सरकारकडून वकील नेमलेला असतो. प्रथम सरकारी वकीलास जमा केलेल्या पुराव्यांची माहिती द्यावी लागते. अशी माहिती या केसच्या संबंधाने देण्याकरिता मी सरकारी वकील श्री. असगरअल्ली यांचेकडे, त्यांचे ऑफीस भव्य न्याय मंदीराचे इमारतीत असल्यानं तिकडे चाललो होतो.

या बिल्डींगमधील लिफ्टच्या केबीनमध्ये शिरून उभा राहिलो. लीफ्टमनला कोणत्या माळ्यावर जावयाचे हे सांगण्याचे भान राहिले नव्हते. मी काही बोलत नाही असे पाहून, "आपको कौनसे मालेपर जाना है ?" असा प्रश्न लिफ्टमनने विचारल्यावर मी भानावर येऊन त्यात सांगितले, "तीन नंबरपर जाना है ।" तिसऱ्या माळ्यावर आल्यावर वकील असगर अल्ली याचे ऑफिसात गेलो. ते माझीच वाट पाहत असावेत. मला पाहताचं ते म्हणाले, "मैं आपकी राह देख रहा था । पिपरी मर्डर केसकी फाईल टेबलपरही पडी है; आप देख लेना । इस केस में मुझे कुछ उम्मीद दिखाई नाहीं देती । एकही चष्मदीद गवाह पर केस खड़ा है । दूध वेचनेवाली अंबीबाई विन ओव्हर हो सकती है । कॉस एक्झॉमिनेनमें वो टिक नहीं सकेगी । अंबीबाई अपने

बयानपर अडिग रही तो कुछ हो सकता है । आपका क्या खयाल है ?" पोलीस तपासाच्या कागदपत्रांचे अध्ययन करून ते बोलत होते. त्यांच्या चेहेऱ्यावरून त्यांना खुशी झालेली दिसली नाही. मला माहीत होतं की या केसमध्ये कौशल्य पणाला लावून विशेष असं काही करता येण्यासारखं नव्हतं. केवळ शामबाईच्या मरणापूर्वी घेतलेल्या जबाबावरून आरोपी गोविंदलाल यास शिक्षा होणार नव्हती.

मी म्हणालो, "वकीलसाब, आपने जो भी कहा सच है । मैं जानता हूं, शामबाईका मृत्यूपूर्व बयान कन्व्हीक्शन के लिये काफी नहीं है । मुझे तो लगना है की अंबीबाई अपना इमान नहीं बेचेगी ।"

"इस केस में जो भी जुटाव जुट गए है, मैं उनको पेश करुगा । आजसेही तो केसकी शुरुआत हुई है । लगातार चार पांचदिन अदालत में आपको आना पडेगा । कोर्ट रूम के सामने जो बैंच रखे हुए है वहां बैठना, पुकारा होतेही में आवूंगा" असं ते म्हणाल्यावर मी कोर्ट रूम समोर ठेवलेल्या बेंचवर जाऊन बसलो.

ही घटना जशी घडत गेली तशी चित्रपटप्रमाणे माझ्या मन:चक्षुसमोर येऊ लागली.

२३-५-७६ ही तारीख कायमची स्मरणात राहील अशीच ती घटना होती. सकाळचे नऊ वाजले असतील. कामठी पोलीस स्टेशन मधील माझ्या ऑफिसात मी बसलो होतो. ठाण्यात येऊन मला पाच दहा मिनिटेही झाली नसतील, टेबलावरील फोनची घंटा घणघणली. क्रेडलवर ठेवलेला रिसीव्हर उचलून कानाला लावीत मी म्हणालो, "पोलीसस्टेशन कामठी, इन्स्पेक्टर भादुले बोलतो ! आपण कोण ?"

तिकडून आवाज आला, "कन्हान औट पोस्त से हेड् कॉन्स्टेबल बडेलाल बात कर रहा हूं । ग्राम पिपरी में रहने वाले गोविंद यादवने उसकी औरत शामबाई को जलाकर मार डालनेकी कोशीश की है । तीन महा पहलेही उनकी शादी हुई थी । शामबाई की हालत बहुतही खराब हो गयी है । आपको इतल्ला देना था इसलिये फोन किया ।"

हेड् कान्स्टेबल बडेलाल यांनी गंभीर स्वरूपाच्या गुन्ह्याची खबर दिलेली होती. गोविंदा यादव यानं खुनाचा प्रयत्न केला होता. मी बडेलाल यांना फोनवरून सूचना देताना म्हणालो, "मैं वहां आ रहा हूं। मैं पहुंचने तक अॅम्बुलन्स बुलाना। गोवींदा यादव मिला तो फौरन कस्टडी में लेना। शामबाईकी हालत खराब हैं, इसलिये दो पंचोंको बुलाकर उसका मृत्यूपूर्व बयान लेना। मौकेपर जो भी चीज मिलती हैं पंचों के सामने जप्त कर लेना। समझ में आया!" "जी हां, गोवींदा यादव भाग खडा हुआ हैं। मिलतेही गिरफ्तार कर लुंगा।" बडेलाल म्हणाले. मी रिसीव्हर क्रेडलवर ठेवून दिला. टेबलावर पडलेल्या सामानाची आवरा आवर केली. पोलीस ठाण्याचे रेकॉर्डवर भारतीयदंड विधान कलम ३०७ प्रमाणे गुन्ह्याची नोंद करून तपास हाती घेतला.

कितीतरी जळीतांच्या केसेसचा तपास मी केलेला होता! भाजून जखमी झालेला माणूस, मग तो कमी भाजलेला असो की जास्त, त्याच्या जगण्याचा भरवसा देता येत नाही. काही केसेसच्या बाबतीत तर असं अनुभवास आलं आहे की हे लोक चांगले शुद्धीत असतात. असं वाटतं की आता ते मरणार नाहीत परंतु पाच सहा दिवसांनी ते दगावतात. शॉक बसून त्यांची तब्वेत केव्हा सिरीयस होईल हे सांगता येत नाही. हातावर, पायावर मामुली भाजल्याच्या जखमा झालेले लोक काही दिवसानंतर कायमचे निघून गेले. हा अनुभव जमेस धरूनच हेड् कॉ. बडेलाल यांचा फोन येताच गुन्हा कायम करण्यात दिरंगाई केली नाही. शामबाई यात दगावून, या गुन्ह्याच्या खुनाचे प्रकरणात रूपांतर होणार हे मी गृहीतच धरलेले होते.

पिपरीगाव माझ्या माहितीचा होता. कन्हान नदीच्या तीरावर पिपरीगाव वसलेलं आहे. औट पोष्टापासून दोन फर्लांगावर गाव आहे. कन्हान गावचाच तो एक भाग आहे असं वाटतं परंतु दोन्ही गावच्या ग्रामपंचायती वेगळ्या आहेत. गंभीर स्वरूपाच्या गुन्ह्याची नोंद ठाण्यांत होताच, तेथील वातावरण गरम झाले. हुकूमावर हुकूम सुटू लागले. पोलीसव्हॅन सज्ज झाली. बरोबर येणारा स्टाफ व्हॅनमधे जाऊन बसला.

त्या पोलीस व्हॅननं प्रथम मी कन्हान पोलीस औट पोष्टावर आलो. कामठी ते कन्हानचे अंतर सहा किलो मिटर आहे. तेथून पुढे अवघ्या दोन तीन फर्लांगावर पिपरी गाव होते. हेड कॉं. बडेलाल यांना भेटून त्या केसच्या संबंधाने माहिती घेऊन पुढे जायचे ठरविले होते. आमची वाट पाहत बडेलाल बाहेर उभे होते.

धिप्पाड देहाचा, गालावर झुपकेदार मिशांचे आकडे असलेला; साडेसहा फूट उंची असलेला बडेलाल, नावाप्रमाणेच शरीरानेही बडा होता. त्याच्या मातापित्याने योग्य नाव ठेवले होते. काशी, अलाहाबाद, मथूराकडील पुरभैय्याशीच त्याची तुलना करावी लागेल. तिकडचीच ठसकेबाज हिंदी बोलभाषा तो बोलत असे. युनिफॉर्ममध्ये आणखीनच तो बडा दिसत होता. व्हॅनमधून मी खाली उतरलो, तेव्हा त्यानं युनिफॉर्मची डोकीवरील कॅप नीटनेटकी केली, खाकी शर्टच्या बटणाशी चाळा करीत ती बरोबर लागली गेली आहेत की नाही याची खात्री केली, अटेन्शनच्या पोजिशन मध्ये येवून, पायातील अॅम्युनिशन शूजचा खडाक् आवाज करून सॅल्यूट ठोकला. त्याच्या अभिवादनाचा स्वीकार करीत मी औट पोष्टासमोर आलो.

मी म्हणालो, "अॅम्बुलन्स आई है क्या ?"

"जी हां अभी अभी आई है । पिपरीमें दो कांस्टेबिल रखे हैं । मौका पंचनामा और शामबाईका बयान हुआ है ।" बडेलाल म्हणाले.

"इस घटनाकी शुरूआत कैसे हुई और आपने क्या काम किया बताना " असे मी विचारल्यावर नेहमीच्या सवयीप्रमाणे त्यांनी ओठावरून गालावर झेपावणाऱ्या आकडेबाज मिशा कुरवाळून बोलण्यास सुरुवात केली.

ते म्हणाले, "अजी साहब ! क्या बताना ! नाईट राऊंडकी झंझट निबटते निबटते भोर हो गयी। गंगाजलमें (कन्हान नदीत) में न्हा धोकर चौकीमें आया । सुबहके आठ बजे होंगे, इतनेमें नागपूर केमिकल्स फॅक्टरीके पिछवाडे रहनेवाला शंकरलाला, जिसे मैं पहचानता हूं; चौकीके तरफ भागते हुए आया ।

उसने आते ही कहा, ' जमादार साव, मेरी बहु शामबाई जल गयी है और उसके सारे बदनपर फफोले आ गए हैं। उसके कपडोंको कैसे अंगार लगी मालूम नही। आप फौरन चलकर जांच करो।'

"शंकरलालका चेहरा मोहरा देखकरही मुझे दाल में कुछ काला है, ऐसा लगा।

मैंने उसे पूछा, "शामबाई तुम्हारी बहु होते हुए भी, वो कैसी जली, यह तुम्हे कैसा मालूम नहीं ?"

उसने जवाब दिया, "मेरा बेटा गोविंदलाल और बहु शामबाई अलग कमरेमें रहते है। सुबहसेही दोनों में घुसर फूसर चल रही थी। मेरा बडा वेटा लखनलाल कन्हान कोल माईन में काम करता हैं। उसकी सात सालकी लडकी वहू के पासही रहती है। उसने जब चिल्लाना शुरू किया 'चाची जल गयी, चाची जल गयी' तब मैं कमरेमें घुस गया। बहू की हालत देखकर सुन्न सा रह गया। उसके बदन पर का पूरा कपडा जल गया था। मैंने पूछताछ की लेकीन उसने चुप्पी साध ली। आप वहां चलकर देख लिजीये।"

'उसने ऐसा कहनेके वाद मैंने युनिफारम चढाया और शंकरलाल के साथ गया। नागपूर केमिकल फॅक्टरीके पीछवाडे ग्राम पिपरी जाने-वाला रास्ता है, उसी रास्तेपर फॅक्टरीमें काम करने वालों की छोटीशी वस्ती, जो ग्राम पिपरीके अंतर्गत आती है, वहां शंकरलाल का मकान है। मकानके सामने लोगोंकी भीड लगी हुयी थी। कमरेमें मैं घुस गया। एक कोनेमें शामबाई पडी थी, उसके अंगपरके वस्त्र जल चुके थे। अध जले साडीके और ब्लाऊजके तुकडे बिखरे हुए थे। दिवालको लगकर जो चुल्हा है, वह जल रहा था। मिट्टीके तेल की खाली शीशी और माचीस के अध जले तुकडे भी वहां पाये गये। केरोसीन की गंध कमरेमें आ रही थी। शामबाई का वदन काला होकर फफोले आये थे।

मैंने धीरज वंध कर उसे पूछा, "शामबाई कपडोंको अंगार कैसी लगी ?"

उसने जो हकीगत बताई मैंने पंचोंके सामने रिकार्ड कर ली हैं।"

"कहां हैं वह बयान? मुझे दे देना" असे मी विचारताच वडे-लाल यांनी आपले हातातील पिशवीतून कागदपत्राची फाईल काढून शामबाईचा मरणापूर्वीचा घेतलेला जवाब माझे हातात दिला.

त्या जवाबातील मजकूर असा होता. या बयानाची भाषा हिंदीच होती. यादव घराणे हिंदीच बोलत होते. आपल्या मरणापूर्वीच्या जवानीत शामबाई म्हणते, "सारे बदनमें अंगार हो रहीं है। जो होना था टल नहीं सका। शादी होकर तीन माह भी नहीं हुए। इस कमरेमें मैं, मेरा मर्द और सरोज रहते हैं। मेरा जेठ लक्ष्मण यादव कोयला खदान में काम करता है और वही रहता है। कुछ दिन पहलेही उनकी लडकी सरोज मेरे तरफ आकर रहने लगी। सास यशोदाबाई और ससुर शंकर-लाल वाजूके कमरेमें रहते हैं। व्याह के वाद करीवन एक माह तक मुझे कोई तकलीफ नहीं थी। मेरे गोरे चिट्टे रंगकी तारीफ होती थी। एक माह के वाद परिवर्तन आ गया। शास और ससुरके कहनेपर पती गोविंदलाल मुझे मारपीट करने लगे। उनका कहना यह था की मैं असल खानदानकी नही हूं। आज भोर में उठकर कुवेका पानी लाया। कु. सरोज को जगाकर घरवार झाडूसे साफ करनेको कहा। उसने झाडू तो लगाया ही नहीं बल्की उसने अपने चाचाको चुगली की। वस इतनी ही बातपर वह उलझ पडे। मेरे गालपर दो चार थप्पड जडा दी और बोले, 'तुम असल खानदानकी नहीं है। तुम्हारे मां वाप भी असल खानदानके नही है।'

"मैंने उनसे कहा, 'मेरे मां बाप को बीच में क्यों लाते हो। आपके मां वाप तो मुझे घर के वाहर निकालने पर तुले है।'

"इसपर गोविंदलालजी ने कहा, 'तुम अगर असल खादानकी है और तुमारे माता पिता भी असल खानदानके है तो आज जलकर मर जायगी।'

"मेरे सब खानदानपर वह कीचड उछाल रहे थे। गये दो माह से मेरे खानदानकी बात निकाल रहे थे। ससुर शंकरलालजी भी मां

बापपर गालीयाँ देने लग गये थे। मायके जाना मेरे लिये ठीक नहीं था।

"मेरे पतीने जो चुनौती दी थी, उसका स्वीकार करते हुए मैंने कहां, 'मै तो असल खानदानकी हूं। जलकर मरनेको मैं तयार हूं। आपने अंगार लगानेके बाद भी मैं चिल्लाहट नहीं करूंगी, शोर नही मचाऊंगी।'

"मैंने चुनौतीका स्वीकार करते ही गोविंदलाल बौखला उठे। चुल्हा जल ही रहा था। उनको फॅक्टरी में काम पर जाना था, इसलिये दाल पकानेको रखी थी। गोविंदलालजीने मिट्टीके तेल की शीशी उठाई और मेरे तरफ देखा। मेरे फैसले पर मैं अडीग थी। मुझे खामोश देखकर उन्होंने साडीपर, ब्लाऊजपर मिट्टीका तेल छिडकाया। मैं खामोश थी। मिट्टीका तेल छिडकानेके बाद, उन्होंने माचीस उठाकर काडी खींच ली और नीचेसे साडी को लगायी। फिर क्या था! नीचेसे ज्वाला भडक उठी और उसके लपेटेमें में आ गयी। बदन जल रहा था फिर भी मैंने ना चिल्लाहट की, ना शोर मचाया। मेरी हालत देखकर वह भाग खडे हुए। सरोजने, 'चाची जल गयी, चाची जल गयी' ऐसा शोर मचाया। कुछ लोग दौडकर आए। अंगारने काम तमाम कर दिया था। मैं और मेरे माता पिता असल खानदान के है यह मैंने शाबीत किया है। मेरी बचनेकी उम्मीद तो नहीं, आपको जो भी करना है उसे मैं रोक नहीं सकती।"

बडेलाल यांनी माझ्याकडे दिलेला शामबाईचा मरणापूर्वीचा जबाब मी पुन्हा एकदा वाचला. कोठे तरी खटकत होते. काही तरी महत्त्वाची बाब सांगण्याचं तिनं टाळलं होतं. विवाह झाल्यावर तिच्या सौंदर्याची तारीफ करणारे, तिला एक महिन्यानंतर का छळू लागले होते? काही-तरी गूढ निश्चित होते. तपासाची सूत्रे मी बडेलालकडून घेतली. शामबाईचे बयानाव्यतिरिक्त गोविंदलालने तिच्या अंगावर रॉकेल ओतून पेटती काडी लावली असे सांगणारा कोणी साक्षीदार नव्हता. हा प्रकार घराचे आत झाल्याने व सकाळी आठच्या सुमारास घडला असल्याने

कोणी तो प्रकार पाहिला असण्याची शक्यता फार कमी होती. कुमारी सरोजही आपले काकांचे विरुद्ध काही सांगणार नाही हे गृहीतच धरले होते. तसेच शंकरलाल हा आपले मुलाविरुद्ध साक्ष देणे शक्य नव्हते. गुन्हेगार कोण हे माहीत पडलेलं होतं. गोविंदा यादव हा गुन्हा करून फरार झाल्यानं बडेलाल त्याला अटक करू शकले नव्हते.

बडेलाल यांचेकडून कागदपत्र घेऊन मी पिपरी गावी रवाना झालो. शंकरलाल यादव यांचे घरासमोर अॅम्यूलन्स उभी होती. घरात जाऊन शामबाईस पाहिले. कोणाच्याही काळजाचा थरकाप व्हावा अशा स्थितीत ती होती. तिला दवाखान्यात पाठविणे आवश्यक असल्याने पुन्हा तिला विचारपूस करीत बसण्यात अर्थ नव्हता. लोकांनी तिला अलगद उचलून अॅम्बुलन्समध्ये ठेवले. तो प्रकार पाहून माझं डोकं सुन्न होऊन गेलं होतं. मनात विचार आला स्त्री जन्मा हीच का तुझी कहाणी. अॅम्युलन्स चालू होऊन निघून देखील गेली तरी मी आपला विचारात मग्न झालो होतो. जड अंत:करणानं पुढील कामास लागलो. माणूस जेव्हा पशू बनतो, तेव्हा तो पशुपेक्षाही नीच कृत्ये करतो. याचेच हे उदाहरण म्हणून देता येईल. अशी किती तरी उदाहरणे मी स्वत: पाहिली अन् ऐकलीदेखील आहेत !

अॅम्यूलन्स निघून गेल्यावर शंकरलाल यादव यांचे घरातील त्या खोलीत गेलो. बडेलाल यांनी घटनास्थळाचा जो पंचनामा करून काही वस्तू जप्त केल्या होत्या त्याची पाहणी केली. अर्धवट जळलेली गोधडी कोपऱ्यात पडलेली होती. ती ताब्यात घेण्यात आली. चुलीतील अर्धवट जळालेली लाकडे, फुटलेल्या बांगड्यांचे तुकडे, मंगळसूत्रातील मणी अशा ज्या वस्तू नजरचुकीने राहून गेल्या होत्या त्या जप्त केल्या.

परकर, झंपर घातलेली, गोल चेहऱ्याची, गौर वर्णाची सरोज तेथे होती. तिची मातृभाषा हिंदी असल्याने मी तिला हिंदीतून विचारले, "चाची को क्या हो गया ? अंगार कैसे लगी ?" मी व माझा स्टाफ युनिफॉर्ममध्ये होतो. आम्हाला पाहून ती बावरून गेली होती. तिची

मन:स्थिती लक्षात येऊन मी तिला पुन्हा म्हणालो, "घबराओ नहीं ! जो तुमने देखा है वह सच सच बताना."

ती सात, आठ वर्षांची चुणचुणीत मुलगी म्हणाली, "आज सुबह चाचीने मुझे जगाया और घरबार झाडू से साफ सूतरा करने को कहाँ। चाची मुझे हमेशा कामपर लगा देती थी। मैंने टालमटोल करने की कोशीश की लेकीन चाचीने मेरा कान पकडकर हाथ में झाडू दिया। गोविंद चाचा को मैंने बताया, तब दोनो में दो दो बाते हुई।" इतके म्हणून ती गप्प बसली. पुढे काय झाले हे तिने सांगितले नाही. म्हणून मी तिला विचारले, "शामबाई के कपडोंपर मिट्टीका तेल किसने छिडकाया और अंगार कैसे लगी ?"

त्या चुणचुणीत पोरीनं माझ्याकडे थोडा वेळ टक लावून पाहिलं व ती म्हणाली, "उनकी दो दो बाते होने लगी उस वख्त मैं बाहर गयी थी। मुझे नहीं मालुम की किसने मिट्टीला तेल छिडकाया और अंगार लगाई। कमरे में जब शोले भडक उठे तो मैंने अंदर देखा। चाचीके कपडोंने अंगार पकड ली थी। 'चाची जल गयी, चाची जल गयी।' ऐसा मैं चिल्लाई, तो कुछ लोग दौडते हुए आये और अंगार बुझाई।"

"उस वख्त तुम्हारे चाचा कहाँ थे ?"

"मुझे नहीं मालुम वो कहाँ थे। मुझे जितना मालूम था मैंने बताया। मेरे चाचा का इसमें कोई दोष नहीं है। चाची तो चुल्हे में जो अंगार है, उससे जली होगी। दोनोके झगडे हुए इसलिये वो झूठा बोल रही है और मेरे चाचाको फसा रही है।" सरोज म्हणाली. सरोजला जादा विचारपूस करण्यात अर्थ नव्हता.

शंकरलाल यादव यांचे घराचे आसपास राहणाऱ्या लोकांना बोलावून घेतले. छोटीबाई चंद्रीकाप्रसाद, नामदेव धर्मुजी लोधी, काशीबाई धर्मुजी यांनी सांगितले की सरोजचे ओरडणे ऐकून ते खोलीत गेले व त्यांनी शामबाईचे जळते कपडे विझविले. त्या वेळी गोविंदलाल हजर नव्हते. त्यांनी हेही सांगितले की शामबाई व गोविंदलालचे भांडण गेल्या

एक-दीड महिन्यापासून होत होते. आसपास राहणारे कालीचरण गोवारी, भगवान खंडारे यांनीही पाहिलेले नव्हते. घटना स्थळाजवळूनच सार्वजनिक रस्ता जात असल्यानं गुन्हा झाला त्या वेळेला या रस्त्यावरून कोणकोण जात असते याची चौकशी करताना असे समजले की अंबीबाई बावने ही दूध घालण्यासाठी या रस्त्यावरून जात असते व गोविंदलाल यादव याचेही घरी तीच दूध घालीत असते. गोळीवाडचात राहणाऱ्या अंबीबाई बावने हिला बोलावून घेण्यात आलं. मळकट हिरव्या रंगाचे लुगडं नेसलेली, बुटक्या बांध्याची, अंदाजे पस्तीस वर्षं वयाची अंबीबाई माझ्यासमोर हजर झाली. तिला मी विचारले, "अंबीबाई गोविंदलाल यांचे घरी तू रतिबाचं दूध घालण्यास आज किती वाजता आली होतीस ? झालेल्या प्रकाराबाबत तू काय पाहिलेस ?"

अंबीबाई म्हणाली, "आज सकाळी आठ वाजण्याच्या सुमाराला दूध घालण्यासाठी गोविंदलाल यांचे घरासमोर आले. दरवाज्यातून आत डोकावून पाहिलं, शामबाई रडत असलेली दिसली. गोविंदलालच्या हातात शिशी होती व तो रॉकेल तेल तिच्या अंगावर टाकीत होता. मला पाहून दूध नेण्यासाठी भांडे घेऊन सरोज बाहेर दारात आली. सरोजला मी विचारलं. 'हे काय चाललं आहे ? दोघाचं भांडण का लागलं आहे ?'

'सरोज म्हणाली, चाचने चाची को दो थप्पड मारे हैं इसलिये वो रो रही है ।'

"मी दूध घालू लागले तेव्हा खोलीत आगीचा भडका उडाल्याचं दिसलं. मी आत वाकून पाहिलं तेव्हा शामबाईची साडी खालून पेटली होती. शामबाईनं काही आरडाओरडा केला नाही याचं मला आश्चर्य वाटतं. गोविंदलालनं मला पाहिलं असावं, तो खोलीतून पळत बाहेर आला व म्हणाला, 'क्या देखती हो, भाग यहांसे' मी परत फिरले तेव्हा सरोज 'चाची जल गयी, चाची जल गयी !' असं ओरडू लागली होती. गोविंदलालने मला फटकारल्यावर मी तेथे थांबले नाही, घरी निघून गेले. मी जे पाहिले ते खरं सांगितलं आहे."

अंबीबाईचा वरीलप्रमाणे जबाब मी लिहून घेतला. ती खरे तेच बोलली होती. तिला खोटे बोलण्याचं काही कारण नव्हतं. तिच्याशिवाय प्रत्यक्ष पाहणारा साक्षीदार कोणी नव्हता. आरोपी गोविंदलाल यास पकडावयाचे राहिले होते. वडेलाल यांनी प्रयत्नांची शिकस्त करून त्यास कन्हान गावातील एका हॉटेलात पकडलं. त्याला अकट केल्यावर तपास कामात आलेल्या शीणाचे काही वाटले नाही. नागपूर येथील मेयो हॉस्पिटलमध्ये जाऊन शामबाई बोलण्याच्या परिस्थितीत आहे काय हे पाहिलं. तिच्या अंगाचा दाह होत होता व तिला कापसाचे लादीवर झोपविण्यात आलं होतं. तिला पुन्हा विचारपूस करून त्रास देणं योग्य नसल्यानं मी परत कामठी ठाण्यास गेलो.

दिनांक २९–५–७६ रोजी मी कामठी पोलीस ठाण्यात हजर असताना फोनची वेल वाजली म्हणून मी रिसीव्हर उचलून कानाला लावला. मेयो हॉस्पिटलमधून फोन आला होता. फोनवरून खबर मिळाली की शामबाई मरण पावली आहे. सायंकाळी ४–३० वाजता ती मरण पावली होती. कोतवाली पोलीस स्टेशन, नागपूर येथेही तिच्या मरणाची खबर देण्यात आली. कारण मेयो हॉस्पिटल तहसील पोलीस स्टेशनच्या हद्दीत येते व अशा पोलीस केसमध्ये दगावलेल्या प्रेताचा पंचनामा ते करतात.

खुनाचा प्रयत्न करणे या सदराखाली या गुन्ह्याची नोंद झालेली होती. शामबाई मरण पावल्याची खबर मिळताच, या प्रकरणाचे खुनाच्या केसमध्ये रूपांतर झाले होते. भारतीय दंड विधान कलम ३०७ जाऊन त्या ठिकाणी कलम ३०२ लावण्यात आले.

तिच्या मृत्यूची खबर मिळताच नागपूर येथील मेयो हॉस्पिटल मध्ये आलो. तहसील पोलीस स्टेशनचे हेड कॉ. इक्बालसिंग यांनी मृतक शामबाईचे प्रेताचा पंचनामा करून प्रेत पोस्टमार्टेमकरिता पाठविलं होतं. मेडिकल ऑफीसर श्री. व्ही. के. गव्हादे यांनी प्रेताचे पोस्टमॉर्टेम करून शामबाई गोविंदलाल यादव हिला, तिचे अंग भाजून

झालेल्या जखमामुळे शॉक बसून मरण आल्याचं मत दिलं. पोष्टमॉर्टेम नोटसमधे असेही नमूद करण्यात आलं होतं की शामबाईचे पोटात तीन महिने पूर्ण झालेला गर्भरू होता. मेडीकल ऑफीसरच्या रिपोर्टावरून तपासात एक नवीन पैलू मिळाला. शामबाईस विवाहानंतर एक महिना काही त्रास नव्हता, नंतर तिला का त्रास होऊ लागला याचं गूढ उकललं गेलं होतं ती गर्भवती आहे हे तिच्या सासरच्या माणसांना माहीत पडलं असावं.

शंकरलाल यादव यांना बोलावून मी विचारले, "गोविंदलाल की शादी कब हुई।" त्यांनी सांगितले, "दिनांक २६-२-१९७६ के रोज ग्राम कन्हान में शादी हुई।"

मी विचारले, "शादीके बाद गौना कब हुआ।" "शादीके एक माह बादही गौना हुआ," त्यांनी उत्तर दिले. मी हे प्रश्न का विचारीत आहे हे त्यांच्या लक्षात आले नाही. आपल्या घराण्याची लाज बाहेर काढण्याची त्यांची इच्छा नव्हती म्हणूनच कुणीही या बाबीचा उल्लेख आपले जबाबात केलेला नव्हता. त्यांची तशी जबानी घेऊन त्यांना जाण्याची परवानगी दिली.

तारीख २६-२-७६ ला शामबाईचे लग्न झाले व ता. २३-५-७६ रोजी ती मरण पावल्यावर पोस्टमॉर्टेममध्ये तीन महिन्याचा गर्भ मिळून आला. लग्न झाल्यावर एक महिन्यानी गर्भदान-समारंभ पार पडला होता. यावरून तिच्या सासरच्या माणसांमध्ये परिवर्तन घडून आले. शामबाईने सुद्धा आपल्या मृत्यूपूर्व जबानीत यावर प्रकाश टाकलेला नव्हता. गोविंदा यादव, शंकरलाल, यशोदाबाई यांनीही ही बाब लपवून ठेवली होती. लोकलज्जेस्तव ते ही गोष्ट उघड करीत नव्हते. लग्न होण्यापूर्वीच शामबाई गरोदर असावी असा संशय आल्यानेच ते शामबाईस नेहमी म्हणत होते की तुझी व तुझ्या आई वडिलांची खानदान अस्सल नाही. संशय येताच तिच्या छळाला सुरुवात झाली होती, तिचा कोणाशी अनैतिक संबंध होता हे कोणीही सांगू शकले नाही. तशी गरज त्यांना वाटली नसावी. 'अस्सल मां-बाप की होंगी तो आज

जलकर मरेगी ' असं गोविंदा का बोलला, त्याचं गूढ समजून गेलं होतं. तिच्या शेवटच्या जबाबात शामबाईने कबुली दिली होती की लग्नानंतर एक महिना तिच्या सौंदर्याचं कोडकौतुक होतं होत. गोविंदा यादव फुलासारख्या आपल्या पत्नीचे कपडे का पेटवू शकला हा पैलू माहीत झाला. खुनाच्या गुन्ह्यात हेतू सिद्ध करावा लागतो. खुन करणारांचा काय हेतू होता हे महत्त्वाचे सूत्र हाती आले होते. किरकोळ झाडलोटीच्या कारणावरून खून झालेला नव्हता. कोणत्याही खुनामागे जबरदस्त हेतू असावा लागतो.

तपासात हाती आलेले दुवे संगतवार जुळवून ता. २२-६-७६ रोजी गोविंदलाल यादव याचे विरुद्ध मी दोषारोप पत्र न्याय दंडाधिकारी वर्ग १ रामटेक यांचे कोर्टात दाखल केले. पिपरी गाव त्या कोर्टाच्या हद्दीत येत असल्याने तेथेच मला दोषारोप पत्र दाखल करावे लागले. विद्वान न्याय दंडाधिकाऱ्यांनी या केसमध्ये सकृतदर्शनी पुरावा असल्याचं पाहून ही केस विद्वान सत्र न्यायाधिशांचे कोर्टात पाठवून दिली.

याच सत्र न्यायाधीशांचे कोर्टात आजपासून ही केस सुरू होणार होती. तपासातील दुवे त्यांच्यासमोर मांडून आरोपी गोविंदा यादव यास त्याने केलेल्या निर्घृण हत्त्येबाबत शिक्षा करवून घ्यावयाची होती. त्याकरिता सत्र न्यायाधिशांचे कोर्टासमोरील बेंचवर बसलो होतो. कोर्टाच्या पट्टेवाल्यानं केसचा पुकारा करताच सरकारी वकील व आरोपीचे वकील श्री. वहाने हे हजर झाले. अंबीबाई साक्ष देण्यासाठी आलेली होती. तिने कधी कोर्टाची पायरी चढलेली नव्हती. ही बाई आरोपीचे वकीलासमोर काय शोभा करून घेते हे सांगता येत नव्हतं. तिला मी म्हणालो, ' अंबीबाई कोर्टासमोर तुम्ही जे पाहिलं त्याप्रमाणं बोला. घाबरून जाण्याचं कारण नाही. '

ती म्हणाली, ' चांदणीसारखी पोर जाळून टाकली त्यानं. मी खोटे बोलले तर शामबाईचा आत्मा मला क्षमा करणार नाही. उलटया काळजाचा गोविंद फासावर चढला पाहिजे. शामबाईला जिवंत जाळलं त्यानं. माझ्या डोळ्यांनी मी पाहिलं आहे. '

दूध विकून पोट भरणारी बाई हे बोलत होती. मला समजलं होतं की त्या गरीब बाईला पैशाचा लोभ दाखविण्यात आला होता. पैशाने काम जमत नाही म्हणून तिला धाकही दाखविण्यात आला होता. यादव समाजाच्या प्रतिष्ठित मंडळींनीही गोविंदा निर्दोष सुटावा म्हणून नाना तऱ्हेचे प्रयत्न केले. 'अंबीबाई हाजीर हैं।' असा पट्टेवाल्याने पुकारा करताच अंबीबाई दबकत दबकत कोर्टाच्या भव्य हॉलमध्ये गेली. तिला साक्षीदाराचे पिंजऱ्यात उभं करण्यात आलं. सरकारी वकीलांचे प्रश्नास तिनं जे पाहिलं त्याप्रमाणं बरोबर उत्तरं दिली. आरोपीच्या वकीलांनी उलट तपासणीत उलट सुलट प्रश्न विचारण्याची कसरत करून पाहिली परंतु ती कसरत त्यांच्याच अंगलट आली, कारण अंबीबाईने भावविवश शब्दात तिनं जो प्रकार पाहिला होता त्याचे वर्णन करून सांगितलं. सायंकाळी पाच वाजता तिची जबानी संपली.

कोर्ट हॉलमधून सरकारी वकील श्री. असगर अल्ली बाहेर पडले. त्यांच्या चेहेऱ्यावर प्रसन्नता स्पष्ट दिसत होती. ते बाहेर येताच मी बेंच वरून उठून त्यांच्यासमोर गेलो. मला पाहून हसत हसतच ते म्हणाले, "अंबीबाईने तो कमाल कर दिया। मुझे यकीन नहीं था की अंबीबाई क्रास एक्झामिनेशन में भी टिक सकेगी। दो दिन में ही बाकी जुटाव कोर्ट के सामने आ जायेंगे।" असे म्हणून ते निघून गेले.

शामबाईचे डाइंग डिक्लेरेशन (मृत्यूपूर्व जबाव) हेड्. कॉन्स्टेबल बडेलाल यांनी पंचांसमोर घेतले होते. तसेच ती मेयो हॉस्पिटलमध्ये अॅडमिट झाल्यावर तहसील पोलीस ठाण्यातील हे. कॉ. इक्बालसींग यांनी वेगळे डाइंग डिक्लरेशन घेतलं होतं. दोन्ही वेळी शामबाईनं तोच जबाब दिला होता. शामबाईचे हात भाजले असल्याने जबाबावर सही किंवा अंगठा ती करू शकली नव्हती. अशा काही तोकडचा मुद्यावर आरोपीच्या वकीलांनी भर दिला तरीपण विद्वान सत्र न्यायाधिशांसमोर आरोपी गोविंदलाल निर्दोष आहे असे त्यांना सिद्ध करता आलं नाही. आरोपीच्या वकीलाचे असंही म्हणणं होतं की शामबाई शुद्धीवर नसताना तिचे बयान लिहिले गेले. आरोपी गोविंदलाल यानं शामबाईचे कपडे रॉकेल ओतून

पेटविले नव्हते तर घरातील चुलीवर तिचा पदर पडल्यानं तिच्या कपडचास अचानकपणे आग लागून त्यात ती भाजली गेली असण्याची शक्यता आहे. शामबाईस जाळून मारून टाकण्यात काय हेतू होता हे फिर्यादी पक्षास सिद्ध करता आलं नाही. त्यांच्या या विधानास पोस्ट मॉर्टेममधील डॉक्टरांचे मत उत्तर होते. या नोटस्‌मध्ये तिला तीन महिन्याचा गर्भ असल्याचा उल्लेख होता. बयान देताना शामबाई शुद्धी-वर नव्हती या विधानास ज्या पंचासमक्ष तिचे बयान घेतले गेले होते त्यांनी ती पूर्ण शुद्धीवर होती असे सांगून टाकले होते.

माणूस जेव्हा पशू बनतो तेव्हा तो पशूपेक्षाही नीच कृत्ये करतो. पशू बनलेल्या गोविंदलाल यादव याने आपली पत्नी शामबाई हिला जिवंत जाळून, तिचा खून करण्याचे पशूपेक्षाही नीच कृत्य केलेले होते. सत्र न्यायाधीशांनी, तारीख १।३।१९७७ रोजी या केसचा निकाल जाहीर केला. त्या दिवशी निकाल ऐकण्यास आलेल्या लोकांनी कोर्टाचा हॉल भरून गेला होता. गोविंदलालचे नातेवाईक व समाजाचे लोक बहुसंख्येने हजर होते. तो निर्दोष सुटणार अशीच त्यांची कल्पना होती. कोणीही गोवींदलाल यास शिक्षा होईल असे म्हणत नव्हतं. माझ्याही मनात या खुनी इसमास शिक्षा होते की नाही याची शंका होती. परंतु सत्र न्याया-धिशांनी त्यास दोषी ठरवून आजन्म कारावासाची शिक्षा दिली. अशा रीतीने पशूपेक्षाही नीच बनलेल्या खुनी इसमास त्याच्या कर्माची फळे भोगावी लागणार होती.



तेरा

# लक्ष्मी आली घरा

ही घटना दिनांक २-११-१९७५ रोजी ऐन दिवाळीच्या लक्ष्मी-पूजनाच्या दिवशी नागपूर जिल्ह्यातील कामठी कोल माइन्स येथे घडलेली आहे. त्यावेळी मी कामठी ठाण्याचा निरीक्षक म्हणून नेमणुकीस होतो. कामठीपासून दहा किलोमीटर अंतरवर कोळशाची खाण आहे. खाणीत काम करणारे मजूर व कर्मचारी यांना राहण्याकरिता कॉलनी बांधलेली आहे. त्यामुळे तेथे टुमदार असे छोटे शहरच बसले आहे. गुरुचरणसिंग अजितसिंग पंजाबी हे कोल माइन्समध्ये सुपरवायझरचे काम करीत असतात. कर्मचाऱ्यांकरिता बांधलेल्या कॉलनीत ते राहतात. दिवाळी सण असल्यामुळे सणाचा बाजार करून ते सायंकाळी घरी परतले. त्यांना पगारही चांगला मिळत असल्याने सुगंधी उटणे, हेअर ऑईल, फटाके असे समान घेऊन ते घरी आले होते. कॉलनीत काली मंदिरात प्रवचन असल्याने त्यांच्या पत्नी कौरबाई यांनी प्रवचनास जाण्याचा बेत केला होता. तसा आपला मनोदय व्यक्त करताच गुरुचरण यांनी मान्यता दिली.

रात्री दहा वाजण्याचा समय असेल. गुरुचरणसिंग आपल्या पत्नी व मुलाबाळांसह काली मंदिरात जाण्यास निघाले. निघताना कौरबाईंनी माजघराचे व बैठकीचे दरवाजे बंद करून कुलपे लावली. बाहेरच्या दरवाज्याला कुलप लावून ते सर्वजण मंदिराकडे निघून गेले.

काली मंदिरातील प्रवचन रात्री बारा वाजेपर्यंत चालू होते. प्रवचन संपताच ते सर्वजण परत घराकडे निघाले.

घरापासून थोड्या अंतरावर आले असतानाच गुरुचरण यांना घराचा दरवाजा उघडा दिसला व आतील लाईट चालू दिसला. ते आपल्या पत्नीस म्हणाले, "घरका दरवाजा तो खुला दिख रहा है और अंदरका लाईट भी जल रहा है !"

कौरबाईचे लक्ष तिकडे जाताच त्यांच्या काळजात धस्स झाले ! त्यांनी आपल्या हाताने कुलूप लावले होते. मग दरवाजा कसा उघडला गेला ? "मैंने तो दरवाजे को ताला लगाया था । यह देखो, चावी भी मेरे पास है " त्या म्हणाल्या.

गुरुचरण चांगलेच हादरले ! घरात कोण घुसले आहे याचा विचार करीत लगबगीने पुढे जाऊन त्यांनी दरवाज्यातून आत डोकावून पाहिले. आत कोणीही नव्हते. त्यांच्या पाठोपाठ पत्नी व मुलेही आली. कौरबाईंनी घरात पाहिले तेव्हा बैठकीच्या व माजघराच्या दरवाज्याच्या कड्या तुटून पडलेल्या होत्या. त्यांनी माजघरात जाऊन पाहिले तेव्हा त्यांच्या दोन ट्रंका उघड्या पडलेल्या होत्या व आतील सामान बाहेर विखुरलेले होते. दागिन्यांचा डबा उघडाच रिकामा पडला होता. दोन्ही ट्रंकांचे कोयंडे मोडून पडलेले होते. चोरट्यांनी त्यांचे दागिने लंपास केले होते. या दागिन्यांत त्यांच्या सोन्याच्या अकरा बांगड्या, चार पाटल्या, सोन्याची चेन असलेले पदक, चार आंगठ्या, वेणीत घालण्याचे चांदीचे फूल, चांदीची पैरपट्टी, मंगळसूत्र, सॅन्डो कंपनीचे लेडीज रिस्टवॉच हे चोरीस गेले होते. गुरुचरण यांनीही आणखी काय माल चोरीस गेला हे पाहिले, तेव्हा त्यांची हिरव्या रंगाची सूटकेस दिसून आली नाही. त्यात ते भिलाई येथे गेले होते त्यावेळी नवीन शिवलेले टेरिकॉटचे कपडे होते. त्यात सहा पॅंटस्, सहा शर्टस् होते. त्यावर भिलाईच्या टेलरची लेबले होती. आणखीही काही किंमती कपडे त्यात होते. चोरीस गेलेल्या मालाची किंमत पंधरा हजार

रुपयांच्या आसपास होती. ऐन दिवळीत लक्ष्मीपूजनाच्या दिवशीच त्यांच्या घरातून लक्ष्मीने काढता पाय घेतला होता ! घराबाहेर विजेच्या रोषणाईच्या रंगीबेरंगी माळा उजेड देत होत्या ! पण त्यांच्या घरात अंधकार झाला होता ! जणू लक्ष्मी त्यांच्यावर रुसून निघून गेली होती.

ही चोरीची वार्ता हा हा म्हणता म्हणता सर्व कॉलनीत पसरली. त्यांचा स्वभाव मनमिळाऊ असल्यामुळे हितचिंतक व मित्रमंडळी जमली होती. गुरुचरण यास या घटनेमुळे धक्का बसला होता व तो सुन्न झाला होता ! काय करावे अशा संभ्रमावस्थेत तो होता. त्याचा मित्र सय्यद-जमा याने धीर देऊन त्यास म्हटले, "गुरुचरण. सोचते क्या हो ? चलो मेरे साथ पोलीस थाने । रिपोर्ट अभी देना पडेगा । मैं साथ में चलता हूँ ।" ते दोघेही कामठी पोलीस ठाण्याकडे निघाले.

दिनांक २–११–७५ ला कामठी ठाण्यात विशेष असा काही रिपोर्ट आलेला नव्हता. यंदाची दिवाळी घरीच साजरी होण्याची चिन्हे दिसू लागली होती पहाटे अभ्यंग स्नानाकरिता उठावयाचे होते म्हणून आम्ही सर्वजण घरी लवकरच झोपलो होतो घड्याळात पहाटे ४ चा गजर लावलेला होता.

मी झोपेत असतानाच बेल वाजू लागली. मला वाटले गजर वाजत असेल. म्हणून मी घड्याळाकडे पाहिले पण रात्रीचे तीन वाजले होते, व बाहेरील बटन दाबले गेल्याने घरात घंटा वाजत होती कोणीतरी आले होते काहीतरी गंभीर स्वरूपाची घटना घडली असावी. हे मी ओळखले दरवाजाजवळ जाऊन मी विचारले. "कोण आहे ?" बाहेरून उत्तर आले, "मैं गुरुचरणसिंह अजितसिंग हूँ । कोयला खदान से आया हूँ । हमारे घर में चोरी हुई है और सब जेवरात चोरी गये है ।"

मी दरवाजा उघडून बाहेर आलो तेव्हा मला दरवाजासमोर दोघेजण उभे असलेले दिसले त्यापैकी एकजण म्हणाला, "मैं गुरुचरण-सिंग हूँ । कोयला खदान कॉलनी में रहता हूँ । हमारे घर चोरी हुई है ।"

"चोरी कैसी हुई, घर के लोग कहाँ थे ?"

"साब, घर के सब लोग मिलकर रात के दस बजे मंदिर में गये थे। आधी रात को वापस आकर देखा तो डुप्लिकेट चावी से किसीने सामने का ताला खोलकर चोरी की है। पंधरह हजार रुपयों का माल चोरी गया है। हम तो लुट गये हैं।"

"घबराओ नहीं, हम पूरी कोशीश करेंगे। आप थाने जाकर ठहरना, मैं तैयार होकर अभी आता हूँ।" असे मी म्हटल्यावर ते दोघेही पोलीस ठाण्याकडे निघून गेले. मी घरात येऊन युनिफॉर्म चढवला. 'गुन्हेगार येती करा, तोची दिवाळी दसरा' ही म्हण पोलिसांच्या बाबतीत पूर्णपणे लागू पडते. गुन्हेगार हाती आल्यावरच त्यांचा खरा दिवाळी दसरा साजरा होत असतो. गुन्हेगारांना जसा काळ वेळ नसतो, तसा पोलिसांनाही नसतो.

घरातील मंडळी जागी होऊ लागली होती. त्यांना "मी कामगिरीवर जात आहे नि लवकरच परत येतो," अशी नेहमीप्रमाणेच लोणकढी थाप मारून घराबाहेर पडलो. लवकरच परत येण्याइतके साधेसुधे काम नाही हे मला माहीत होते, पण उगाच कशाला त्यांना नाराज करा!

पोलीस ठाण्यात आलो तेव्हा गुरुचरण व त्याचा मित्र माझीच वाट पाहत बसले होते. गुरुचरण याची जबानी घेऊन त्यात चोरीस गेलेल्या मालाचे शक्य तेवढे हुबेहूब वर्णन घेतले. हे वर्णन गुन्हेगाराचा गुन्ह्याशी संबंध प्रस्थापित करताना उपयोगी पडणारे होते. तसेच न्यायालयासमोर चोरीस गेलेला माल तो हाच, हे सिद्ध करता येणार होते. प्रथम खबर लिहून झाल्यावर ठाण्याच्या रजिस्टरात गुन्ह्याची नोंद केली. चोरीस गेलेल्या मालाची किंमत १५००० रुपये होती. डोक्यावर कोणीतरी मणाचे ओझे ठेवल्यासारखे वाटत होते. हे ओझे काढून टाकणे तितकेसे सोपे नव्हते!

हेड कॉन्स्टेबल हरी ओम दत्त व काही कॉन्स्टेबल घेऊन मी घटनास्थळाकडे रवाना झालो. रवाना होण्यापूर्वी, जेलमधून कोणी घरफोड्या चोऱ्या करणारा सुटला आहे काय हे पाहून घेतले. तसे

एवढ्यात कोणी सुटल्याचे नजरेस आले नाही. घटनास्थळ हे गुरुचरण-सिंग पंजाबी याचे घर होते. समोरच्या दरवाजाचे कुलूप डुप्लिकेट चावी लावून उघडले होते. कारण कुलपाची अगर लोखंडी कडीची नासधूस झाली नव्हती. बाकीच्या दोन्ही खोल्यांच्या लोखंडी साखळ्यांच्या कड्या काढून दरवाजे उघडण्यात आले होते. माजघरात दोन अर्धवट जळालेली तांबडा दोरा असलेली विडीची थोटके मिळाली. फिर्यादीच्या घरात विडी ओढणारे कोणी नव्हते. चोरट्यांनीच विड्या ओढून ती थोटके माजघरात टाकली होती. ती थोटके मी जप्त केली.

नागपूरहून श्वानपथकातील बॉबी कुत्री बोलावली परंतु अपराध्यांनी टोपी, चपला अशा तीव्र वासाच्या वस्तू घटनास्थळावर सोडल्या नव्हत्या; तसेच पावसाची सर येऊन गेली म्हणून ती कुत्री मार्ग काढण्यात असमर्थ ठरली. चान्स प्रिंटस् म्हणजे बोटांचे ठसे पाहून घेतले. पण एक–दोन ठिकाणच्या पुसट ठशांशिवाय प्रिन्टस् कोठे मिळून आले नाहीत.

डोक्यात विचारचक्रे फिरू लागली. अवघ्या दोन तासांच्या अवधीत गुन्हा झाला होता. रात्री दहा ते बाराच्या दरम्यान घरातील मंडळींच्या हालचालीवर पाळत ठेवण्यात आली होती. घराबाहेर ते जाताच गुन्हेगारांनी आपले काम केले होते. डुप्लिकेट चावीने कुलुप उघडण्यात आले होते. यावरून चोरट्यास घराच्या कुलपाची माहिती होती, म्हणूनच डुप्लिकेट चावी आणली गेली. फिर्यादी गुरुचरण यांच्या घराच्या आसपासचा त्यांचा परिचित व घरात येणारा–जाणारा कोणीतरी माणूस यात सामील असला पाहिजे, यात शंका उरली नाही. त्यामुळे कॉलनीतील शेकडो लोकांकडे विचारपूस झाली. गुरुचरण यांच्या घराच्या आजूबाजूच्या क्वार्टर्समध्ये झडत्या घेतल्या परंतु काही हाती आले नाही. अपराध्यांना पकडून खरी दिवाळी साजरी करण्याचा मनोदय होता, जिद्द होती. कंबर खचून चालण्यासारखे नव्हते. 'गुन्हेगार येती घरा, तोची दिवाळी दसरा' हे एकच पालुपद डोक्यात घुमत होते.

कोयला खदानमध्ये बाहेरगावचा कुणी आला तर तेथील सेक्यूरिटी गार्डच्या चौक्यांवर त्याची नोंद होते. मी सेक्यूरिटी गार्डकडे मोर्चा

वळवला. गेटावर नोंदी असलेल्या इसमांच्या हालचालीचा पडताळा पाहिला. नंतर कोयलाखदान ऑफिसात जाऊन कोणी बाहेरगावचा कर्मचारी आला काय याची चौकशी करता, गुरुप्रसाद नारायणप्रसाद शर्मा हा ता. २-११-७५ रोजी आल्याची नोंद मिळाली हा गुरुप्रसाद पूर्वी कामठी कोल माइन्स मध्येच नोकरीवर होता नतर त्याची बदला न्यूटन चिखली, जिल्हा छिदवाडा (मध्य प्रदेश) यथे झाल्याने तो तिकडं गला होता त्याचा काही पैसा कामठीच्या कंपनीकडून येणे होता म्हणून तो त्या दिवशी आला व ऑफसातून रक्कम घऊन गेला, इतकी माहिती कळली

तो आपला शिलकी पैसा नेण्यास आला होता म्हणून संशय यण्याचे कारण नव्हते दुसरे असे की तो पूर्वी यथला कर्मचारी होता. गुरुचरण यास मी बोलावून सहज विचारले. "क्या आप गुरुप्रसाद नारायणप्रसाद को जानते हो? दो तारीख के रोज यहाँ वह आया था!"

"जी हां, उसे मैं जानता हूँ। हमारे कॉलियरीमेंही (खाणीत) वह काम करता था। दो तारीख के रोज सुबह ग्यारह बजे हमारे घरपर भी हमें मिलने को आया था। लेकिन उसपर शक करना बेकार है।"

"क्या, वह अकेलाही आया था??"

"जी हां, अकेलाही आया था। थोडी देर बैठकर न्यूटनचिखलीका हाल सुनाकर चला गया।" गुरुचरण म्हणाला.

त्याच्या सांगण्यावरून माझ्या मनात आशेचा (म्हणजे संशयाचा) किरण चमकून गेला. हेड कॉन्स्टेबल हरी ओमदत्त, कॉन्स्टेबल किसन अशा दोघांना मी छिदवाडा जिल्ह्यातील न्यूटन चिखली येथे जाऊन गुरुप्रसादची माहिती काढून त्याचा या घरफोडीत हात आहे काय, हे शोधण्यात सांगितले.

न्यूटन चिखली, दमुवा हा भाग कोळशाच्या खाणींचा आहे पराशियापासून जवळच आहे. पराशिया येथे पोलीस ठाणे असल्याने हेड

कॉन्स्टेबल हरी ओम व कॉन्स्टेबल किसन ही जोडगोळी पराशिया येथे गेली. पराशिया पोलीस ठाण्यात त्यांना माहिती मिळाली की गुरुप्रसाद यास कामावरुन काढून टाकले असून तो अट्टल गुन्हेगार बनला आहे! त्याने दमुवा येथील पोस्टऑफिसातून पैशाची थैली, जीमध्ये अडीच हजार रुपये होते, ती चोरली आहे व त्या गुन्ह्यात तो फरारी आहे पराशिया येथील पोलीस स्टाफला तो पाहिजे होता न्यूटन चिखली, दमुवा, पराशिया या ठिकाणी त्याचा शोध घेण्यात आला. परंतु तो मिळाला नाही. सतत दोन–तीन दिवस फिरूनही त्याचा ठावठिकाणा मागमूस मिळेना. हरी ओमदत्त याची दाढी वाढली होती म्हणून दाढी करण्यासाठी न्हाव्याच्या दुकानात तो गेला. दाढी करता करता न्हाव्याने "आप महाराष्ट्र के पोलीस इधर कैसे आये? क्या काम था?" अशी विचारपूस केली. हवालदार हरी ओम यांनी "गुरुप्रसाद याचा ठाव-ठिकाणाचा पत्ता काय?" म्हणून विचारले. त्याने माहिती दिली की, "नागपूर येथील चित्रा टॉकीजच्या पाठीमागे राहणारा एक रिक्षावाला आहे त्याच्या घरी गुरुप्रसाद मिळू शकेल." अचानकपणे ही माहिती मिळून गेल्याने हरी ओम दत्त यांना हायसे वाटले. दिनांक ६–११–७५ रोजी ते नागपूरला आले.

त्या दिवशी पोलीस ठाण्यात मी हजर होतो. कोल माइन्सवरून कामठीस नुकताच येऊन बसलो होतो.

टेबलावरील फोन खणाणला. मी रिसीव्हर उचलला. "मी कामठीहून पोलीस स्टेशन ऑफिसर बोलतो आपण कोण?" तिकडून उत्तर आले–" नागपूरहून हरी ओम दत्त बोलतोय. पराशियाहून मी व किसन परत आलो आहो नागपुरातच चित्रा टॉकीजच्या मागे एका रिक्षावाल्याच्या अड्ड्यावर गुरुप्रसाद मिळण्याची शक्यता आहे. आपण स्टाफ घेऊन चित्रा टॉकीजजवळ या."

"मी आता निघालोच. पोलीस व्हॅनमधून येतोच आहे. तुम्ही चित्रा टॉकीजच्या शेजारी चौक आहे, तिथे थांबा." असे म्हणून मी रिसिव्हर खाली ठेवला.

पोलीस व्हॅनने स्टाफसह मी नागपूरला जाऊन हेड कॉन्स्टेबल हरि ओम यांना चित्रा टॉकीजजवळ भेटलो. तेव्हा त्यांनी पराशिया येथील सर्व हकीकत निवेदन केली. पराशिया ठाण्यात गुरुप्रसादवर चोरीचा गुन्हा दाखल असल्याचे रेकॉर्डही असल्याचे सांगितले. चित्रा टॉकीजच्या मागे रिक्षावाला राहतो, त्या ठिकाणी गुरुप्रसाद मिळण्याची शक्यता होती हे खरे; पण रिक्षावाल्याचे नाव माहीत नव्हते, त्याचे घर नेमके माहीत नव्हते.

खाजगी कपड्यात असणाऱ्या दोन कॉन्स्टेबल्स्ना त्या भागात फिरून पत्ता आणण्याची कामगिरी दिली, ती त्यांनी चोखपणे बजावली. किसन रिक्षावाल्याचे घर त्यांनी दाखवले. रात्रौ अकरा वाजता त्या घरावर छापा घातला. किसनशिवाय घरात कोणी नव्हते. त्याच्या घरात हिरव्या रंगाची सूटकेस होती. त्यात गुरुचरण याने वर्णन केलेले कपडे जसेच्या तसे होते. त्या कपड्यांवर भिलई येथील टेलरची लेबलेही होती.

किसनला अटक करण्यात आली. "गुरुप्रसाद कोठे आहे ? त्याचा व तुझा संबंध काय ?" म्हणून मी विचारले. तेव्हा तो म्हणाला, "गुरु-प्रसाद माझ्याकडे ३ तारखेला आला होता त्याने ही बॅग ठेवण्यास दिली होती. फवारा चौकाजवळ पुंडलीक राहतो त्याच्या घरी गुरुप्रसाद झोपत असतो."

किसन याने आम्हास पुंडलीकाचे घर दाखवले. रात्रीची दोन वाजण्याची वेळ होती. पुंडलीकच्या, घराचे दार आतून बंद होते. किसन यानेच पुंडलीकला आवाज दिला. घरात खडबड सुरू झाली. पोलीस आल्याचा आतील माणसांना सुगावा लागला असावा. पुंडलीकच्या घराच्या कौलावरून कोणीतरी पळाल्याचा आवाज झाला.

दरवाजा जोरदार धक्क्याने उघडून मी व स्टाफ घरांत घुसलो. पुंडलीक व आणखी एक इसम घरात होता. त्यास नाव विचारता त्याने त्याने आपले नाव 'दयाराम' असे सांगितले. अचानक पडलेल्या पोलि-सांच्या छाप्यामुळे पुंडलीक भेदरून गेला होता. "गुरुप्रसाद भाग गया,

भाग गया!" असे म्हणून त्याने कौलांकडे बोट केले वर पाहता गुरुप्रसाद कौले काढून घराच्या छपरावर चढलेला दिसला! पोलीस पाठलाग करतील म्हणून त्याने तेवढ्यात घराच्या मागील बाजूस उडी मारली! ती उडी शेजारच्या घरातील जनावरांच्या गोठ्यातील पत्र्यावर पडल्याने धाड् धाड् असा मोठ्याने आवाज झाला!

रात्रीच्या निवांत वेळेस एकदम आवाज झाल्याने आजूबाजूचे लोक जागे झाले. पुंडलीकचे घर पोलिसांनी घेरले असल्याने मागील बाजूस जो स्टाफ होता, त्यांनी गुरुप्रसादचा पाठलाग सुरू केला होता...

इकडे घरात दयाराम यांच्या पँटच्या खिशात चांदीचे फूल–वेणीत घालतात ते मिळून आले. "बाकी माल कुठे आहे?" असे दरडावणीच्या स्वरात मी विचारले. "गुरुप्रसाद घेऊन पळाला आहे. त्याच्याजवळ हातरुमालात गुंडाळलेले दागिने आहेत." दयारामने सांगितले.

गुरुप्रसाद निसटून गेला होता. तो सापडला नाही तर होतातोंडाशी आलेला यशाचा घास निघून जाणार होता.

थोड्याच वेळात कॉन्स्टेबल किसन याने येऊन सांगितले, "साब, गुरुप्रसाद पकडा गया है। फवारा चौक में उसको पकडा है।"

बहाद्दरांनी कमाल केली होती! पुंडलीक व त्याचा साथीदार दयाराम यांनाही आम्ही हातकड्या घातल्या. तेथून फर्लांगभर अंतरावर फवारा चौक आहे तेथे गेलो. पोलिसांनी गुरुप्रसाद यास पकडून ठेवले होते. त्याच्या झडतीत त्याने सूटपँटमध्ये एका हातरुमालात गुंडाळून ठेवलेली पोटली मिळाली. ती सोडून पाहता सोन्याचे सर्व दागिने मिळून आले!

रात्रीचे तीन वाजले होते. दयाराम याने सराफा बाजारात चांदीची पैरपट्टी विकली होती, ते दुकान दाखविले. तेथून चांदीची पैरपट्टी जप्त करण्यात आली. रिस्टवॉच विकले होते, तेही ठिकाण त्याने दाखविले.

या घरफोडी चोरीतील चोरीस गेलेला १५००० रुपयांचा सर्वच माल जप्त करण्यात आला.

गुरुचरणसिंग व त्यांच्या पत्नीने माल आपलाच असल्याचे ओळखून सांगितले. त्यांच्या घरची लक्ष्मी परत घरी आली होती.

तपास पूर्ण करण्यात आला. गुरुप्रसाद यास हा तांबडा दोरा असलेली विडी ओढण्याची सवय होती व चोरी करताना त्यानेच ती दोन थोटके टाकलेली होती.

गुरुप्रसाद यास अटक केल्याची वार्ता टेलिफोनवरून पराशिया पोलीस ठाण्यास देण्यात आली. गुरुप्रसादने पोस्ट ऑफिस दमुवा येथून अडीच हजार रुपये असलेली बॅग पळविल्यामुळे त्या पोस्ट मास्तरवर खात्यामार्फत चौकशी चालू होती.

गुरुप्रसादने तपासात कबूल केले की "रक्कम असलेली बॅग, पोस्ट मास्तरांचे लक्ष नाही हे पाहून मी पळविली होती."

गुरुप्रसादला अटक केल्यामुळे पराशिया पोलिसांनी धन्यवाद दिले.

या केसचे दोषारोपपत्र गुरुप्रसाद, किसन रिक्षेवाला, पुंडलीक व दयाराम अशा चारही आरोपींविरुद्ध रामटेक येथील न्यायालयात दाखल करण्यात आले व केसचा निकाल लागून या चारही आरोपींना दोषी ठरवून शिक्षा ठोठावण्यात आल्या.